


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)






महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








तेवीस वर्षे संपूर्ण महाराष्ट्र गाजवणारा




नोव्हेंबर '६७
मूल्य रु. ४

## श्रेयनामावली—

- आठ बहुरंगी नयनमनोहर पुष्पचित्रे : रातराणी, निशिगंधा, शेवंती, केतकी, नटमोगरी, जाईजुई, कृष्णकमळ, सुरंगी—चित्रकार दीनानाथ दलाल.
- राजकीय व्रतवैकल्ये : फुडारी लोकांसाठी खास फर्मायेश—एक दुरंगी 'अ' विचारमाला.
- 'तुमचे भविष्य, यांच्या हाती' : नेत्यांकडून यंदा तुमचे काय होईल याचे सचित्र उत्तर.
  '...दिशा' – याने भीक कशी मागावी ? भिक्षांदेहीचे चित्रमय मर्मभेदी 'बे'रंगी धडे.
- कथा : वि. स. खांडेकर, ● पु. भा. भावे ● अरविंद गोखले ● वामन चोरघडे ● अच्युत बर्वे ● व्यंकटेश माडगूळकर ● गोपाळकृष्ण भोबे ● प्रा. विजया राजाध्यक्ष ● प्रा. सदानंद रेगे ● शरदचंद्र वासुदेव चिरमुले ● अरविंद ताटके.
- इरसाल विनोदी कथा : पु. ल. देशपांडे ● जयवंत दळवी ● रमेश मंत्री ● पद्माकर गोवईकर ● व. पु. काळे ● वा. रा. सोनार.
- ललित साहित्य : प्रा. मं. वि. राजाध्यक्ष ● प्रा. म. वा. धोंड ● चित्रकार द. ग. गोडसे ● प्रा. म. ल. वराडकर ● का. वा. नायक ● वसंत देशमुख.
- अप्रतिम काव्यनाट्य : कान्त
- 'अहा भारत विराजे': पर्यटन वर्षाचे आमच्या वासुनाक्यावरून घडविलेले 'बिग' दर्शन—मंगेश तेंडुलकर, सुधीर बावकर, दत्ता गांगनाईक आणि इतर अनेक.
- 'जुना थेटर . . . .' के. टी. देशमुख यानी विगेतून घडविलेले मराठी रंगभूमीचे दर्शन.
- 'साहित्यिक कवड्या'— कोंडबा व ह. शि. खरात ● पुष्पचित्र मालिकांचे काव्यालंकार — अशोक परांजपे.

संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक श्री. दीनानाथ दलाल, दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. या प्रतीस किंमत ४ रु. + रजि. पोस्ट १ रु. वार्षिक वर्गणी, दिवाळी अंकासह रु. १२. अंकांत प्रसिद्ध झालेली मतें ही चालकांचीहि अधिकृत मते असतातच असे नाही.

Registered with the Registrar of Newspapers For India under No. RN 1612/57
DIPAVALI : Dalal Art Studio, 40-42, Kennedy Bridge, Bombay-4.

Gram : Dalalart
टे. नं. ३५७७६५

अनुक्रमणिका









# ही सद्भावनांची अंजुळी !

चालू वर्षीच्या 'वर्षा'वतरणाने भरतभूमी सुजलाम् सुफलाम् होणार असा आशेचा अंदाज [illegible]त्र केला जात आहे. तो साकार झाल्यास गेल्या दोन–तीन वर्षांच्या कठिणाईतून सर्व सामान्य म[illegible]साला उसंत मिळेल व खरीखुरी 'दिवाळी' साजरी करण्याचा उत्साह त्याला जाणवेल !

आज तरी हे स्वप्नच आहे ! अन्नटंचाईच्या राक्षसाचा धुमाकूळ चालू आहे. आणि मनातल्या 'मांड्या-वर' तूर्त निभावून न्यावे लागत आहे. भारताचे केविलवाणे तोंड अन्नासाठी दाहीदिशांकडे पहात आहे !

'सैन्य पोटावर चालते' अशी एक विख्यात म्हण आहे. त्याचा अर्थ असा नव्हे की सैन्य नुसते अन्नावरच चालते. किंबहुना अन्नब्रह्माइतकीच बौद्धिक आहाराचीही आवश्यकता असते. मर्त्[illegible]याचे मन गोंधळते, घावरते, मरगळते, तेव्हा त्याला फिरून सजीवता आणण्याचे, चैतन्यदायी करण्याचे आणि साक्षात्कारी बनविण्याचे कार्य साहित्य संस्कृती आणि कला या शक्तीच करीत असतात. या शक्तीनी दिलेल्या प्रेरणेतूनच मराठी साहित्यातील असे अमृतकण संचित करून सादर करणे हे मौलिक कार्य दीपावली वार्षिक गेली तेवीस वर्षे करीत आहे. याही वर्षी ती उज्ज्वल परंपरा वर्धिष्णु करण्याचे हेतूने दीपावलीचा हा नव-रसानी नटलेला, पुष्प चित्र मालिकानी खुललेला आणि विनोदाची झालर ल्यालेला असा सर्वांगपरिपूर्ण अंक प्रसिद्ध करताना आम्हाला अत्यंत आनंद होत आहे.

दीपावली–वार्षिक अंक निर्मितीचा हा जगन्नाथाचा रथ श्रेष्ठ साहित्यिक, टीकाकार, कवि, चित्रकार, मर्मज्ञ रसिक, हितचिंतक आदि सर्वांनी आपुलकीने केलेल्या साह्यानेच ओढून नेणे आम्हाला सहजच साधले. दीपावलीस त्यांचे असीम प्रेम निरंतर लाभो हीच इच्छा. याहून मागणे लई नाही.

दीपावली–वार्षिक इतके नयनरम्य स्वरूपात सादर करण्यात मे. टॉम ॲंड बे या जाहिरात कंपनीचे मॅनेजिंग डायरेक्टर व आमचे दोन तपाचे जिव्हाळ्याचे स्नेही श्री. गणेशपंत तांबे यानी मोलाचे सहाय्य केले. मित्रवर्य श्री. अच्युतराव बर्वे यांचे सक्रिय प्रोत्साहनानेच उत्साहाचे उधाण वाढते राहिले. संपादन कार्यात श्री. गोपाळकृष्ण भोबे तर मुद्रण कार्यात श्री. चंद्रकांत दळी यानी खूपच परिश्रम घेतले. "नौदल' अंकापासून 'आमच्यातलेच एक' बनलेले श्री. यशवंतराव दातार यानी व्यंगचित्रासंबंधी व अवांतर कार्य खरोखरच आपुलकीने केले. जाहिरात विभागाचे श्री. श्री. स. दाभोळकर यांनी घेतलेल्या परिश्रमांचा आवर्जून उल्लेख करतो.

दीपावली वार्षिक सुबकपणे छापणारे 'जन्मभूमी' प्रेसचे संचालक व कामगार बंधू; बहुरंगी चित्रांची उत्कृष्ट छपाई करणाऱ्या 'आशा प्रिंटरी'चे श्री. भाई व सुरेश मालपेकर; फोटो–ऑफसेट छपाईची कि[illegible] कुशलपणे हाताळणारे जगदीश्वर प्रिंटिंग प्रेसचे श्री. भालचंद्र फाटक व त्यांचे सहकारी; दर्जेदार तिरंगी ब्लॉक्स बनविण्यात कुश[illegible]चे श्री. मोहनरा[illegible] कामत; इतर ब्लॉक्सही तितकेच चांगले व तत्परतेने करून देणारे श्री. विष्णुपंत कडव आणि अं[illegible]चेकांप्य[illegible]होचविण्याचे अत्यंत महत्वाचे काम वर्षानुवर्षे आत्मीयतेने व व्यवहार कुशलतेने बजावणारे श्री. बाबुराव बागवे तसेच इतरत्र[illegible] ठिकठिकाणी ते मौलिक कार्य पार पाडणारे आमचे वितरक या सर्वांना मन:पूर्वक धन्यवाद !

स्टुडिओतल्या सर्वच सहकाऱ्यांनी साह्याची परंपरा उज्ज्वल करण्याचे व्रत चालविले आहे. ते व्रत खरोखरच कठीण ! ते घरचेच असल्याने 'आभा[illegible]' त्यांना आवडणार नाहीत.

अंकातील 'तुमचे भविष्य यांच्या हाती' या उपहास मालिकेची कल्पना 'शंकर्स विकली'वरून सुचली असे नमूद करताना कृतज्ञ आहोत.

या अंकासाठी आपुलकीने, एका शब्दासरशी साह्य करणारे आमचे सर्व लेखक, मित्र, जाहिरातदार, एजंट आणि असंख्य रसिक यांचे आगामी संवत्सरानिमित्त अभिष्टचिंतन !

– दी[illegible]नाथ दलाल


| प्रकाशन स्थळ | ऑफसेट छपाई | रंगीत चित्र छपाई | ब्लॉक्स | छपाई |
|---|---|---|---|---|
| दलाल आर्ट स्टुडियो, ४०।४२, केनेडी ब्रिज, मुंबई–४. | जगदीश्वर प्रिंटिंग प्रेस, [illegible]यवाडी, मुंबई–४. | आशा प्रिंटरी, खेतवाडी, मुंबई–४. | बॉम्बे प्रोसेस स्टुडियो, फोर्ट, मुंबई–१. प्रभात प्रोसेस स्टुडियो, ठाकुरद्वार, मुंबई–४. | स्टेट्स पीपल प्रेस, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई–१ |


पुढील अंक क्रिकेट पुरवणीसह १ डिसेंबरला नेहमीप्रमाणे प्रसिद्ध होईल.



दुःखाच्या आरशात त्याना
नुसते स्वतःच्या सुखाचे
रूप पहावयाचे होते.
आणि हे सुख
मोठे होते. प्रत्यक्ष सुखा-
पेक्षाही मोठे होते. ही
दोन्ही सुखे छबूताई भोगीत
होत्या. ह्या सुखाचे त्याना
व्यसनच जडले होते....



—पु. भा. भावे

फारशी भपकेदार दिसणार नाही, पण तिची श्रीमंती जात सहज लक्षात येईल अशी एक मऊ रेशमी साडी नेसून छबूताई बाहेर जायला निघाल्या. निघता निघता जेवणघर आवरायची त्यानी गड्याना आज्ञा दिली व पायात चपला सरकावल्या. भोजनोत्तर गुंगीने भारलेले विष्णुपंत छातीवर वर्तमानपत्र घेऊन आरामखुर्चीत पेंगत पडले होते. ते छबूताईंच्या हालचालीने चाळवले आणि म्हणाले, “कुठे निघालीस ?”

‘जरा बाहेर जाऊन येते.” छबूताईनी उत्तर दिले.

चाळीशीला दोनच वर्षे कमी असलेल्या आपल्या बायकोला अधिक प्रश्न विचारण्याची विष्णुपंताना आवश्यकता वाटली नाही. तिच्या डौलदार, पण किंचित् सुटलेल्या देहाकडे त्यांनी एकदा किलकिल्या दृष्टीने पाहिले व डोळे मिटून घेतले.

दार उघडून छबूताई घराबाहेर पडल्या. प्रतिदिनी दोन-चार घरी तरी डोकावल्याविना छबूताईना चैन पडत नसे. त्यांचा स्वतःचा संसार तसा अतिशय संपन्न होता. पैसा-अडका, मुले-बाळे, घरदार, मोटारगाडी आणि सज्जन नवरा ! पण केवळ तेवढ्याने त्यांचे समाधान होत नव्हते. शेवटी चार माणसांची चौकशी केली नाही तर नुसत्या स्वतःच्या संपन्नतेचा काय उपयोग ! गेल्या चार दिवसात पाहुण्यांच्या वर्दळीपायी ही संधि छबूताईना मिळाली नव्हती. म्हणून साचलेल्या उत्साहाने त्या वाट कापू लागल्या. आज कुठे कुठे जायचे ते आधीच त्यानी मनोमन ठरविले होते. प्रथम त्या देशपांड्यांकडे जाणार होत्या, मग धारपुऱ्यांकडे, मग दिघ्यांकडे, मग मैनाताईंकडे, मग. . . ! ह्या भेटींच्या नुसत्या कल्पनेमुळे सुद्धा छबूताईंचे मन आनंदाने बुडबुडले आणि त्यांच्या पायांनी अधिक गति घेतली. तोच त्याना शेजारी एक उसासा ऐकू आला. छबूताईनी पाहिले. वातुळ देहाच्या सीताकाकू मोठाले उसासे सोडत वाटेने चालल्या होत्या. त्यांचे केस पांढरे झाले होते. व त्यांनी गुडघ्यास फडके बांधले होते. वेदनेच्या गुंगीत त्या कशातरी चालल्या

अनुक्रमणिका

गेल्या. छबूताईकडे त्यांचे लक्ष नव्हते. तेव्हा छबूताईच त्यांना सामोऱ्या झाल्या. आणि गळ्यातील माळ चाचपीत म्हणाल्या,

"कुठे निघालात, सीताकाकू ?"

सीताकाकूंनी एकदा डोळे बारीक करून छबूताईकडे पाहिले. व श्वास घेत घेत त्या उत्तरल्या, "पोळ्या करायला !"

"अयाऽई ! अजून पोळ्या करता तुम्ही ?" छबूताईंनी सीताकाकूंच्या सुरकुतलेल्या देहावर आपादमस्तक दृष्टि फिरविली. सीताकाकूंनी शांत स्वरात सांगितले,

"करते. आताच दोन घरच्या पोळ्या करून आले. अजून दोन घरच्या करायच्या आहेत."

"च्. . . च्. . . ! हे दुसऱ्याच्या घरी पोळ्या करायचं का तुमचं वय आहे ?"

"काय करणार बाई ? गेली चार वर्सं घरातली माणसं अंथरूणाला खिळून आहेत. त्यांच्यानं काही काम होत नाही."

"ठाऊक आहे मला !" छबूताई ओल्या स्वरात बोलू लागल्या, "तरी पण ह्या ऐन उन्हाच्या वेळी. . ."

"उन्ह, आमच्या जन्मालाच लागलं आहे ! तुम्ही भाग्यवान् आहात, छबूताई !" सीताकाकूंचे हे शब्द ऐकून छबूताई सुखावल्या व म्हणाल्या,

"माझं एक ऐकाल सीताकाकू ?"

"बोला."

"मी तुम्हाला माझी मोटर पाठवत जाईन. तुम्ही मोटारीतून पोळ्या करायला जात जा !"

ह्यावर डोळे बारीक करून सीताकाकू मोठ्याने हसल्या आणि म्हणाल्या,

"काय बोलता काय छबूताई ! फुटाणे विकायला कुणी हत्तीवरून का जात असतं ! लोक हसतील मला !"

"हसायला काय झालं ? तिकडे अमेरिकेतले कामकरी असेच आपआपल्या मोटरीतून कामावर जातात ! तशाच तुम्हीही जा !"

"नको-नको. तुम्ही मोटरीत बसता त्यातच आम्हाला आनंद आहे ! आम्ही पुढच्या जन्मी बसू मोटरीत !" हे उत्तर छबूताईंना अपेक्षितच होते. तरी त्या म्हणाल्या,

"मग नाही ऐकत तुम्ही माझं ?"

"कसं ऐकायचं ?" सीताकाकूंनी मान हलविली आणि त्यांनी छबूताईंच्या डोळ्यात निरखून पाहिले. त्यांची मान नकारार्थी हलतच राहिली. छबूताईंनी दृष्टि वळविली व त्या म्हणाल्या,

"कठीण वाटलं नको. एवीतेवी आमच्या बंडूला मॉंटेसरीत पोहोचवायला मोटर जातच असते !"

"मॉंटेसरी ?" सीताकाकूंनी भुंवया उंचावल्या.

"हूं !"

"म्हणजे शाळाच ना ?"

"हूं !"

"बंडूचं वय काय आहे ?"

---



## डॉ. राम मनोहर लोहिया

राजकारणातील अहंकार व दुराग्रह यांची राखरांगोळी करणारा साक्षात् अग्नीच असा हा महान नेता मृत्यूशीही झुंजत झुंजतच पंचत्वात विलीन झाला त्या थोर दाहक व्यक्तिमत्वाला दीपावलीचे अभिवादन !

---

"नुकतीच तीन वर्षं पूर्ण झाली त्याची !"

"आणि एवढ्याशा पोराला तुम्ही शाळेत पाठवता !"

"नाही पाठवलं तर पोळ्या कराव्या लागतील ना त्याला !" मनात आलं ते छबूताई बोलून गेल्या आणि सीताकाकूंकडे पहात राहिल्या. सीताकाकूंचा चेहरा लवमात्र बदलला नाही. शांत स्वरात त्या म्हणाल्या,

"सगळ्यांच्या वाटच्या पोळ्या देवानं मलाच लाटायला लावाव्यात आणि तुम्हाला आणि तुमच्या बंडूला नेहमी सुखात ठेवावं !" आशीर्वाद दिल्यासारखे हात उचलून सीताकाकू चालू लागल्या. छबूताई त्यांच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पहात होत्या. ती आकृति दुःखाची आणि दैन्याची ओतप्रोत मूर्ति होती. त्या आकृतीकडे पाहून छबूताईंना एक विचित्र समाधान वाटलं. पराया दुःखाच्या आरशात स्वतःचं सुख पाहिलं म्हणजे ते एक वेगळा आनंद देतं. तो आनंद छबूताई ह्या क्षणी भोगत होत्या. त्या आनंदाच्या उकळीसरशी हळू हळू पावले टाकणाऱ्या सीताकाकूंना हाक मारून त्या म्हणाल्या, "काकू, थांबा थांबा !" काकू उसासा टाकून थांबल्या आणि म्हणाल्या,

"काय ?"

"हे काय ?" दोन रुपयांची एक नोट छबूताईंनी सीताकाकूंच्या हातात कोंबली. क्षणभर त्या नोटेकडे सीताकाकूंनी पाहिले व मग ती नोट छबूताईंच्या पुढे धरीत त्या निर्णायक स्वरात म्हणाल्या, "नकानको. मला माझ्या कष्टाचं खाऊ द्या ! माझ्या डोक्यावर नको हे ओझं !"

सीताकाकूंचं ते बोलणं ऐकून छबूताईंच्या छातीत पुन्हा फडफड झाली व नोट सीताकाकूंच्या मुठीत दावत दावत त्या म्हणाल्या,

"दोन रुपयांचं कसलं आलं आहे ओझं ! जा, वाटेत कुठंतरी रिक्षा, नाहीतर टांगा करून पुढे जा !"

आपल्या पांढुरक्या दृष्टीनं पुन्हा एकदा सीताकाकूंनी छबूताईंच्या डोळ्यात रोखून पाहिलं. आणि त्या म्हणाल्या, "बरं! नाहीच मिळाला टांगा–रिक्षा तर माझ्यापेक्षा जास्त थकल्या-भागलेल्या कुणाला देऊन टाकीन ही नोट !"





सीताकाकूंचं हे बोलं छबूताईंना आवडले नाही. एका स्वयंपाकिणीचा हा बाणेदारपणा त्याना कुठेतरी दुखावून गेला. किंचित् शुष्क स्वरात त्या म्हणाल्या,

"तुम्ही आता त्या नोटेचं काहीहि करा, पण मला एक सांगा."

"काय ?" सीताकाकूंनी विचारले.

"देशपांडेबाईंच्या घरी मोठी भानगड झाली म्हणे! गेले चार दिवस त्या फार काळजीत आहेत म्हणून ऐकलं !"– छबूताईंचा स्वर चितातुर होता.

"होय ?" सीताकाकूंनी केवळ प्रश्नार्थक उद्गार काढला.

"तुम्हाला असेलच की ठाऊक ! तुम्ही त्यांच्याकडे पोळ्या करायला जाता ना !" छबूताईंच्या स्वराला धार आली.

"जाते !" सीताकाकूंनी मान हलविली.

"मग त्यांची लिलू एकाएकी नाहीशी झाली ते ठाऊक नाही तुम्हाला ?" चार-दोन क्षण सीताकाकू स्तब्ध राहिल्या. मग आपली थकलेली मान हलवीत त्या म्हणाल्या,

"काय करायचं आहे ठाऊक होऊन, छबूताई ? आज त्यांच्यावर प्रसंग आहे."

"म्हणूनं तर मी तिकडे जाते आहे !"

"कशाला जाता ? तुम्ही भाग्यवान् आहात ! तुम्ही नका जाऊ सध्या देशपांड्यांकडे."



"असं कसं ! हीच तर वेळ आहे त्यांच्याकडे जाण्याची !"

"होय ?" पुन्हा सीताकाकूंनी छबूताईंच्या डोळ्यात डोळे घातले, आणि मग त्या ताठरलेल्या स्वरात म्हणाल्या,

"मग जा तर ! अशीच नाडल्या-पीडलेल्यांची आठवण ठेवत जा. तुम्ही दैववान् आहात. तुमच्या मुलीचं वेळेवारीच लग्न झालं आणि देशपांड्यांची लिलू मात्र. . ."

बोलता बोलता सीताकाकूंनी आपला म्हातारा देह वळवला. आणि मुठीत नोट रगडीत थरथरत्या चालीनं त्या चालू लागल्या.

छबूताई त्यांच्याकडे पहात राहिल्या. लिलूचे काय झाले हे ह्या म्हातारीने नीटसे सांगितलेच नाही. म्हणजे काहीतरी झाले होते, एवढे छबूताईंच्या स्वच्छ लक्षात आले. पण झाले होते तरी काय ? ते आता दामिनीबाईंकडे गेल्याविना कळण्यासारखे नव्हते. तशी दामिनीबाईंची आणि त्यांची मैत्री होती. देशपांडे कुटुंबाचे आणि देशमुख कुटुंबाचे तसे परस्परांकडे येणे-जाणे होते. सुमाचा आणि लिलूचाही तसा स्नेह होता. पण देशपांडे मंडळीना तोरा भारी होता. दामिनीबाई तर चांगल्याच गर्विष्ठ होत्या. त्याना आपल्या रूपाचा गर्व होता, पैशाचा गर्व होता, शिक्षणाचा गर्व होता. त्या गर्वालाच त्या मानीपणा म्हणत. तरी छबूताईंनी त्यांच्याशी निभवून घेतलं होते. दामिनीबाई अनेक दृष्टींनी छबूताईंपेक्षा वरचढ होत्या. देशपांडे कुटुंब देशमुख कुटुंबापेक्षा वरचढ होते. लिलूही सुमापेक्षा रूपाने उजवी होती. ह्या आपल्या वरचढपणाची सगळ्या देशपांडे मंडळीना जाणीव होती. तरी देशमुख-देशपांडे कुटुंबांची मैत्री होती, हेही खरेच!

पण ती मैत्री कशी होती ? तर आजकाल असते तशी ! ह्या मैत्रीतही एक धागा स्पर्धेचा होता. देशमुखांनी घोडा घेतला तर देशपांडे उंट घेतील ! देशपांड्यांनी उंट घेतला तर देशमुख हत्ती घेतील ! एरव्ही बोलणे-चालणे गोड ! पण सुमाचे लग्न ठरले, तेव्हा देशपांडेबाईंचा चेहरा कडू झाला. सामान्य रूपाच्या सुमाचे लग्न जमले, आणि सुंदर लिलूचे नाही, ह्याचे त्यांना मनोमन वैषम्य वाटले होते. पण ह्याला कोणी काय करावे? लिलूला आपल्या रूपाचा अणि शिक्षणाचा फार गर्व होता. ती मुलांमागून मुले नाकारीत होती. कुणाचे रूप कमी म्हणून, तर कुणाचा पैसा कमी म्हणून, तर कुणाचे कूळ कमी म्हणून! त्यातून शेवटी आता हे निघाले ! ज्या कुणाचा हात धरून लिलू पळाली असेल, त्याचे तर रूप-कूळ वगैरे सगळे उत्तम असेल नव्हे का ! एखाद्या सतारवादकाचे ! एखाद्या ड्रायव्हरचे ! एखाद्या सिनेनटाचे !

– ह्या कल्पनेसरशी छबूताईंचे अंग शहारले. तो शहारा दुःखाचा होता की सुखाचा देव जाणे ! पण त्या स्वतः सुरक्षित होत्या. सुखी होत्या. त्यांची मुलगी सुखी होती. सुरक्षित होती. ही आग लांब भडकली होती. तिचा चटका त्यांना लागलेला नव्हता. त्यांना नुसते पहायचे होते. दुःखाच्या आरशात त्याना नुसतं स्वतःच्या सुखाचे रूप पहायचे होते. आणि हे सुख मोठे होते. प्रत्यक्ष सुखापेक्षाही मोठे होते. ही दोन्ही सुखे छबूताई भोगत होत्या. स्वतःच्या सुखातले सुख आणि दुसऱ्यांच्या दुःखातले सुख! त्या सुखाचे छबूताईंना व्यसन

अनुक्रमणिका

जडले होते. खरखुरं दुःख त्यांच्या ाटचाला आजवर कधी आलेच नाही. सुखाच्या पाठीवर वरीच वर्षे त्याना मूल झाले नाही. प्रथम त्यांनीच मूल होऊ दिले नाही. आणि पुढे मग ते झाले नाही. तेवढे काही चिंतेचे दिवस त्यांनी पाहिले. पण ती चिंताहि शेवटी संपली. अगदी पस्तशीत त्याना हा वंडू झाला. एक सुंदर मुलगी, आणि एकच गोजिरवाणा मुलगा. छवूताईंचे सुख परिपूर्ण झाले. नाही—आंतडे तोडणारे दुःख त्यांनी कधी भोगलेच नाही. दुःख भोगले सीताकाकूंनी ! दारिद्र्याचे दुःख, अपत्यहीनतेचे दुःख, अपंगतेचे दुःख ! आणि आता दुःख देशपांडेवाईंच्या वाटचाला आले. तिकडेच त्या चालल्या होत्या. सीताकाकूंची आणि छवूताईंची तशी काही तुलनाच नव्हती. सीता-काकू बोलून चालून अगदी सामान्यांतल्या होत्या. पण दामिनी देश-पांडे काहीं सामान्यांतल्या नव्हत्या. त्या चांगल्या सुखी आणि सुखवस्तु होत्या. पण शेवटी दुःख त्यानाही चुकविता आले नाही. आणि दुःख तरी कसले ? अगदी लज्जास्पद दुःख ! एकापरीने मरणापेक्षाही भयंकर दुःख! दामिनी देशपांड्यांच्या दुःखाचा छवूताई घोळवून घोळ-वून विचार करीत होत्या. देशपांडेवाई आता कशा दिसत असतील ? नेहमी-सारखे वाक्यागणिक हसणे आता त्याना शक्य होत असेल का ? त्या क्लबात जात असतील की नाही ? आपले स्वागत त्या कशा रीतीने करतील ? आपल्याशी कशा रीतीने बोलतील ? आपण त्यांच्याशी काय बोलायचे ? छवूताई झपाझप पावले उचलीत होत्या. व झपाट्याने विचार करीत होत्या. वाटेवरच्या तुरळक रहदारीचे त्यांना भान नव्हते. दामिनीवाईंच्या दुःखाची त्यांना गुंगी चढली होती. त्या गुंगीतच एक सुख होते. तोच एक स्वयंप्रेरिका मागून आली. आणि शिंग देत छवूताईंच्या पुढ्यात थांबली. छवूताईंनी दचकून वर पाहिले. चाकावर हात ठेऊन रेवावाई त्यांना म्हणत होत्या,

"काय छवूताई, लिफ्ट देऊ का ?" मोजा चढविलेल्या रेवाबाईंच्या उजव्या हाताकडे छवूताईंनी एक धावती दृष्टि टाकली व त्या हसून म्हणाल्या,

(पान २१० वर पहा)



### कविताकानन

सृजनशीलता डोकवे अंकुर येति सुरेख
कुरण नव्हे ते राखले कविताकानन देख
गालावरती चोळला कितिही सावण फेस
वात्रटिका उगवती जसे दाढीवरले केस

—कोंडवा




—वि. स. खांडेकर

सृष्टि-निर्मितीच्या परिश्रमांनी परमेश्वर शिणून गेला. विश्रांतीकरिता तो दूर एकांतात जाऊन बसला. थोड्या वेळाने लवंडला — पर्वत शिखराची उशी करून आणि आकाशाची चादर अंगावर ओढून.

पण काही केल्या त्याचा डोळा लागेना ! अपूर्व आनंदानेही मनाला अस्वस्थता येते. तसे त्याचे झाले होते.

दीर्घ काळाने निद्रेत त्याच्या डोळ्यांवर मोरपिसे फिरविली. पण झोपेतही त्याला आपल्या अद्भुत निर्मितीचीच स्वप्ने पडत होती. मधेच बालकासारखा तो खुदकन् हसत होता.

तो जागा झाला, तेव्हा जिकडे-तिकडे आनंदीआनंद नांदत आहे असे त्याला दिसले. एवढी विशाल सृष्टि; पण सारी कशी सुतासारखी सरळ चालली होती.

एखाद्या महाकवीने स्वतःचे काव्य गुणगुणत त्याचा रसास्वाद घ्यावा, त्याप्रमाणे आपण निर्मिलेल्या प्रत्येक गोष्टीचे कौतुक करीत परमेश्वर फिरू लागला.

तो एका सुंदर उद्यानापाशी आला. फुलपांखरांचे रंग उन्हात झगझगत होते. त्यांचे नाजुक चिमणे पंख जणू जरतारी वस्त्रे फाडून बनविले होते.

आम्रवृक्षाच्या पर्णभारातून कुहू ऽ कुहू असे मधुर स्वर येत होते. छे ! ते सूर नव्हते. अमृताचे चिमणे कारंजे त्या पर्णभारात थुई-थुई नाचत होते.

उंच आकाशात आपले विशाल पंख पसरून गरुड भरारी घेत होता. त्याच्या लेखी वर सूर्य प्रकाशत नव्हता ! ती एक दीपज्योती होती; आणि आपण सहज पंख हलवले तरी ती विझून जाईल असे त्याला वाटत होते.

परमेश्वर एका फुलपांखरापाशी गेला. त्याने प्रश्न केला—'बेटा, तू सुखी आहेस ना ?'

फुलपांखराची हसरी मुद्रा एकदम मलूल झाली. तिरसटपणाने ते उत्तरले, 'मी एक दुर्दैवी प्राणी आहे साधुमहाराज.'

या चिमण्या जिवाला एवढे कसले मोठे दुःख झाले आहे ते परमेश्वराला कळेना! तो वत्सल स्वराने म्हणाला, 'देवानं तुला किती सुरेख पंख दिले आहेत?'

'पण ते गरुडासारखे मोठे कुठं आहेत ?'

'फुला-फुलातला गोड मध तुला चाखायला मिळतो ना ?'

'पण एवढा मध चाखून मला काही गोड गाता येत नाही. ती कोकिळा पहा कशी—'

या वेड्या फुलपाखराऐवजी आपण कोकिळेलाच हा प्रश्न विचारायला हवा होता, असे परमेश्वराच्या मनात आले. आम्रवृक्षाखाली जाऊन मायेने भरलेल्या स्वराने त्याने विचारले,

'बेटी, तू सुखी आहेस ना ?'

'सुख ? ते कसं असतं हे मला ठाऊक सुद्धा नाही, साधु महाराज!'

'म्हणजे ?'

'काय सांगू कपाळ तुम्हाला ? कुहू—कुहू हे गोड सूर मी काढते असे साऱ्या लोकांना पूर्वी वाटायचं. कित्ती कित्ती कवींनी काव्ये सुद्धा रचली माझ्यावर ! पण आता माणसं शहाणी झाली ना ? त्यांनी एक शोध लावलाय?'

'शोध ? कसला शोध ?'

'कुहू—कुहू हे जे गाणे आहे ते मी गात नाही म्हणे ! माझा नवरा गातो असं या शहाण्यांचं म्हणणं आहे !'

परमेश्वर हसत म्हणाला, 'अग जे नवऱ्याचं मोठेपण तेच बायकोचं मोठेपण!'

'तुम्ही बाल ब्रह्मचारी दिसताय साधुमहाराज. तुम्हाला संसाराचा अनुभव कुठनं असणार? अहो, नवरा म्हणू नये आपला नि साप म्हणू नये धाकला!'

पुढे काय बोलावे ते परमेश्वराला सुचेना पण कोकिळा थोडीच गप्प बसते! नंतर ताव्रातावाने म्हणाली, 'देवाइतकं वाइट्ट कुणी नाही या जगात. हा काळा रंग कशाला दिला त्यानं मला.

(पान २९५ वर पहा)



अनुक्रमणिका



# एकेकांचं मराठी : मी आणि सोन्या बागलाणकर

—पु. ल. देशपांडे



"....यापुढे बायाबापड्यांच्या मराठीत लिहिलं पाहिजे." मराठी साहित्य संमेलनातील एक अध्यक्षीय आदेश.

"काही झालं तरी जातीय अहंकारापासून मुक्त नाही लेको तुम्ही."

"सोन्या, तुला काय किंवा मला काय जो काही पगार मिळतो त्यात जातीय वितीय तर सोड पण कसला चिमूटभर तरी अहंकार परवडतो का ? लेका परवा ठाकूरद्वारचा भिकारी खेकसला माझ्या अंगावर ! 'मधी मधी काय उभे राहता ? साली भीक नाही घालायची ऐपत तर निदान आमच्या धंद्याच्या आड तरी नका येऊ..' सोन्या हे भिकाऱ्याचे शब्द आहेत ! —मी अक्षर न बोलता बाजूला झालो— समोरच्या फूटपाथवर तुम्ही त्या होमिपाथीवाल्या डाक्टरकडे साबुदाणे घ्यायला गेला होता तेव्हा."

"साबुदाणे घ्यायला नव्हतो गेलो. स्वागत समितीचा सभासद नोंदवला त्याला."

"कसली स्वागत समिती —"

"हीच. लामणगांव मराठी साहित्य संमेलन."

"असल्या नांवाचं गांव आहे आपल्या देशात ?"

"तुला काय वाटलं तुझ्या देशात फक्त पुणं आणि मुंबई ही दोनच गांवं आहेत ? जातीय अहंकार म्हणतो मी तो हाच ! तिथे आहे ती संस्कृती ! तिथे बोलता ती भाषा."

पुष्कळ वेळा सोन्या बागलाणकर काय बोलतो ते त्याचं त्याला तरी कळतं की नाही देव जाणे. सुमारे एक डोशा संपवून दुसरा यायला लागतो तितका वेळ सोन्या बडबडत होता. त्यावरून मला एवढंच उमगलं की हल्ली जी काही मराठी म्हणून भाषा लिहिली जाते ती







बहुजनसमाजाची नाही.

"ती फार तर तुझ्या पुण्यामुंबईची असेल." सोन्या.

"सोन्या पुण्याची आणि मुंबईची मराठी फारच निराळी. पुण्याच्या मराठीत मस्त ठसका असतो लेका. आपल्या अंतू रानडयाची मेव्हणी आली होती, चाळीत, आठव. मुंबईची एक तरी पोरगी तसलं मराठी बोलेल काय? उगीच पुण्यामुंबईची मराठी एकाच गाठोडयात बांधू नकोस." अंतू रानडयाची मेहुणी हा उल्लेख सोन्याच्या जिथे लागला त्या जागेला मराठीत जिव्हार म्हणतात. कारण त्यानंतर समोरचा डोसा तो क्षणभर नुसताच निरखून पाहू लागला. धनाजीला (की संताजीला) कोणाचा तरी घोडा पाण्यात दिसत होता किंवा कोणाच्या तरी घोडयाला कोणीतरी पाण्यात दिसत होतं तशी अंतू रानडयाची मेहुणी त्याला डोश्यात दिसत असावी. घारे डोळे आणि पिंगट केस. सोन्या पंधरवडाभर आउट होता. रविवारचा आमचा ठरलेला मद्राशी चुकवून तिला मॅजिस्टिकला मॉर्निंग शो दाखवायला घेऊन गेला होता. असो.

"तू भलतीकडे भलते विषय काढतोस !" (डोश्यात दिसणारी अंतूची मेहुणी पुनरपि गुप्त जाहली). "हे संमेलन गाजणार आमचं. तुमच्या पुण्यामुंबईच्या—"

"पुन्हा पुण्यामुंबई—"

"अरे वाय् पुण्यामुंबई आय् मीन् तुम्ही हे जे तुमच्या तथाकथित सुसंस्कृत समाजाच्या—"

"तथा कसले थित म्हणालास ?"

"कथित– म्हणजे ज्याला आपण मराठीत सो कॉल्ड् सभ्य किंवा कल्चर्ड समाज म्हणतो त्याच्या मराठीला जे तुम्ही स्टॅंडर्ड म्हणता– त्यालाच आमचे अध्यक्ष सुरुंग लावणार आहेत ! म्हणून तर आम्ही संमेलन लामणगांवला घेतलं आहे."

"तुम्ही म्हणजे ?"

"म्हणजे आज ज्यांना, मराठी भाषेला संस्कृत भाषेच्या सोवळयात गुंडाळून ठेवली आहे याची खात्री पटली आहे त्यांनी !"

"मजाच आहे की च्यामारी ! मराठी संस्कृतच्या सोवळयात गुंडाळली आहे हे माहितीच नव्हतं मला."

"तुला कशाला माहिती असेल !"

"खरंच आहे. आपली तर सेकंड लॅंग्वेज पाली होती. तुम्ही संस्कृतवाले."

"खा त्रे उप्पीट खा !" असहाय झाल्यासारखा चेहरा करून सोन्या म्हणाला. मद्राशाचं रुपया दीड रुपयाचं साप्ताहिक ऋण चुकवून आम्ही हॉटेलाबाहेर आलो.

त्यानंतर सोन्या विजेसारखा अधून मधून चमकायचा. हातात एक पावतीपुस्तक. सभासद नोंदणी. प्रतिनिधींची सोय, असल्या वादळात नुसता भिरभिरत होता. थोडक्यात म्हणजे, सोन्या बागलाणकर लामणगांव मराठी साहित्य संमेलनात अथपासून इतिपर्यंत गढला होता. पण सोन्या बागलाणकरचा मला एक बाबतीत फार हेवा वाटतो. ज्या नोकरीतून त्याला त्याचं अन्नोदक मिळतं तेवढं सोडून

## हिरवे पान

**नाशिकचा कविपुंगव प्रेमळ येई कधीहि कोपा न**
**गाई कविता सुंदर चोळित पंचम चुना, नको पान**
**मैफलीतही रंगे, वाटे साधा परंतु सोपा न**
**तारेतच ही माडी चढावया नच निवृत्त सोपान**

**–कोंडवा**



दरवेळी अथपासून इतिपर्यंत गढण्यासारखं काही ना काही तरी सार्वजनिक काम त्याला मिळत असतं. अर्थात् साहित्य आणि राजकारण ही मात्र त्याची विशेष आवडती क्षेत्रं ! आता हे कुठलं तरी लामणगांव साहित्यसंमेलन त्याने लावून घेतलं होतं. म्हणजे जळी स्थळी काष्ठी पाषाणी त्याला फक्त अध्यक्ष, उपाध्यक्ष, स्वागताध्यक्ष, विषयनियामक समिती ह्याखेरीज काही म्हणजे काहीही दिसणं शक्य नव्हतं. बाकी तसं बघायला गेलं तर सोन्या बागलाणकर म्हणजे काही कोणी—मोठा लेखक किंवा वक्ता-बिक्ताही नव्हे. पण कशाने तरी त्याचं चार लोकात नांव आहे एवढं निश्चित् ! वर्तमानपत्रात देखील एखाद्या पत्राखाली 'असे संस्थेचे कार्यवाह श्री. एस्. व्ही. बागलाणकर कळवतात' असं दहापांच वेळा मी वाचलंय ! सोन्या म्हणजे साधारणत: ज्याला 'एवंगुणविशिष्ट' म्हणावे त्यातला आहे.

आणि एके दिवशी वर्तमानपत्रात सोन्याच्या लामणगांव साहित्य संमेलनाचा वृत्तांत प्रकटला. अध्यक्ष भाषण करीत आहेत असा फोटोही होता. स्टेजवरच्या कोपऱ्यात एक चष्मेवाला ठिपका दिसत होता तो सोन्या असावा असे मला वाटले. 'शुद्धलेखनाची अडगळ दूर करा' असा अध्यक्षीय संदेशही होता. माझं वर्तमानपत्री वाचन साधारणत: मथळयावरच सरतं. अगदीच तसं विशेष असल्याखेरीज मी मजकुरात तोंड घालत नाही. पण 'शुद्धलेखनाची अडगळ दूर करा.' हे वाचून उत्साह वाढला. मराठी शुद्धलेखन आणि इंग्रजी स्पेलिंग ह्या मुलांच्या प्रगतीच्या मार्गावरच्या धोंडी आहेत हे माझं जुनं मत. त्याला आता मराठी–लामणगावच्या का असेना—साहित्य संमेलनाच्या अध्यक्षाकडून पुष्टी मिळाली म्हटल्यावर आपण खूष. आणि सोन्याची माझी त्यानंतर पहिली भेट आमच्या मद्राश्याच्या हॉटेलात झाली त्यावेळी – मी सोन्यापुढे तावातावाने ही खुषी व्यक्त केली.

"आपण खूष हं सोन्या तुझ्या अध्यक्षावर ! हवंय कशाला शुद्धलेखन. विचार शुद्ध पाहिजेत. काय ? हे ऱ्हस्व लिहा ते दीर्घ लिहा. करायचं काय ! अध्यक्ष भलता भारी निवडलात लेको तुम्ही. मास्तर लोक खूष असतील. अरे वह्या तपासायचा त्रास केवढा चुकला. खरं म्हणजे मराठी ही आपली मायबोली. काय ? म्हणजे ज्याची माय जशी बोलते तशी बोलायची भाषा. तिच्यावर संस्कृताचा ससुरवास कां म्हणून ! बोले तैसा चाले त्याची जरा वंदावी

पाऊले; तर बोले तसा चिहे त्याची कां नाही वंदावी पाऊले ?" मी इतका बोलत होतो आणि सोन्या बागलाणकर जणु काय मद्राशाच्या रेडियोवरून कोणीतरी तामीळ भाषेत 'खोबरेल तेल शुद्ध करण्याच्या क्रिया' ह्या विषयावर बोलत असावं अशा निर्विकार मनाने समोरचा डोशा कुरतडून खाऽऽत्र बसला होता. सोन्याची ही एक अत्यंत इंटरेस्टिंग संवय आहे. आपण एखाद्या विषयावर आंतडं किंवा जे काही पिळवटून बोलता येण्यासारखं असेल ते बोलावं. सोन्याला जर इंट्रेस्ट नसेल तर तो जन्मजात बहिरा असल्यासारखा बसतो. बोलणं हा केवळ त्याचा एकट्याचा जन्मसिद्ध हक्क आहे आणि आम्ही मात्र त्याचे नुसते श्रोते ! तो बोलत असताना आमच्या समोरचं उप्पीट थंड होऊन त्याच्या गारगोट्या झाल्या तरी आम्ही ह्यांची विद्वत्ता ऐकताना इकडलं तिकडे करायचं नाही. आणि इथे मी चांगला हर्ष म्हणावा असला आनंद व्यक्त करतोय तर सोन्या संथपणाने डोशा रवंथ करतोय. शेवटी एकदाची त्याला वाचा फुटली.




सोन्याची प्रेरक शक्ति !

पांचवारीत गुंडाळलेली सुशा कोरफडे...

"बोबू मंमी वावांटो" तोंडात मसाला डोशा कोंबलेल्या अवस्थेत सोन्या बागलाणकर म्हणाला. त्याच्या एकूण आविर्भावावरून त्या स्वरव्यंजनयुक्त ध्वनीचा अर्थ 'बोल तू मग मी सांगतो'. असा असावा हे मी ताडले. नशीब उप्पीट खात नव्हता. सोन्या उप्पीट तोंडात ठेवून बोलतो त्यावेळी नुसते घुत्कार असतात.

"झालं तुझं एकदाचं खाऊन ?"

"साले काजू म्हणून जळके शेंगदाणे घालतात–ए-कॉफी लाव दो."

"सोन्या माझा मुद्दा राहिला—"

"कायं तुझा मुद्दा ?" सोन्या संथपणाने पुसता झाला. बाकी इतकी चिचोळी एंट्री असलेला मेंदू मी तरी पाहिला नाही. मराठीचं शुद्धलेखन ह्या विषयावर मी त्याच्याशी दोन डोशे आणि एक उप्पीट इतका वेळ बोलत होतो पण त्याच्या मज्जातंतूवर फक्त 'उप्पीटात जळके शेंगदाणे कां ?' ह्याखेरीज दुसरी रहदारी नव्हती.

"सोन्या तुमच्यासारखे आम्ही साहित्यवाले नाही, मंजूर. म्हणून काय शुद्धलेखन म्हणजे काय हेही आम्हाला कळत नाही ?"

"काय झालं शुद्धलेखनाचं—" सोन्याच्या आवाजात चक्क गारठा होता.

"श्राद्ध ! ! अरे मराठीचे अभिमानी वगैरे बिल्ले लावून हिंडता लेको. मराठी लेखनात एवढी क्रांती झाली तुम्हाला पत्ता नाही?"

"क्रांती काय, रोज होते ! तो पेपर उघड. कुठल्यातरी पानावर कसली तरी क्रांती झाली असेल. काल परवात कुणाची एकसष्ठी वगैरे झाली असली तर बघ. त्याने कसली तरी केली असणारच ! अरे क्रांती काय विमाव्यवसायात सुद्धा होते आताशा—"

सोन्याचं हे बोलणं ऐकून मी थक्क झालो. हा आज असा इतका तिरका कां चालतोय् मला कळेना. क्रांतीबिन्ती ही सोन्याची मनमुराद बागडायची कुरणं. वास्तविक मी आपला चारचौघं वागतात तसं वागणारा. सोन्या म्हणजे त्याच्याच भाषेत सांगायचं तर मूर्तीभंजक ! आंतर्जातीय विवाहविवाह प्रकरणात सोन्या बागलाणकर बॅंडवाल्याच्याही पुढे. लाल बावटे धरून दुकानापुढे माणसंबिणसं दिसली की सोन्या खूष. एकदा असल्या उत्साहाने स्वत:वर बिलामत ओढवून घेतली होती. कुठल्याशा कापड दुकानाच्या नोकरांचा वाटतं संप होता. संपावर एक दोन नोकर लाल बावटे धरून उभे होते. कुठे काही असलं दिसलं की सोन्या धावलाच. किंबहुना रस्त्यात जरा गर्दी दिसली की सोन्या घुसलाच. संपवाल्यातल्या दोघांपैकी एक बावटा धरून होता आणि दुसऱ्याने बोर्ड धरला होता. सोन्याने बोर्डावरचा तो 'हलकट मालकाच्या कुटिल कारवाया. कामगारांचे रक्त पिणारा नराधम' वगैरे मजकूर नेहमीप्रमाणे मोठ्याने वाचला. सोन्याला रस्त्यातली कुठलीही पाटी हळू वाचताच येत नाही. भिंतीवर चिकटवलेल्या नाटका-सिनेमाच्या जाहिरातीदेखील मोठमोठ्याने वाचतो. इथे 'हलकट मालकाच्या कुटिल कारवाया' हे जोरात वाचल्यावर चार लोक जमले. सोन्याला आवेश चढला. बोर्डावरचा सगळा मजकूर ठणकावला. बावटेवालाही खूष. सोन्याने त्याची चौकशी सुरू केली. सकाळपासून बिचारा चहासुद्धा न घेता उभा होता. संपावरचे बाकीचे दोनचार लोक होते ते बावटा धरायची ड्यूटी करायला आलेच नाहीत. सोन्याला दया आली. त्याला आणि त्याच्या बोर्डवाल्या सोबत्याला चहापाणी करायला पाठवलं आणि स्वत: बावटा घेऊन उभा राहिला. आणि पुढली तपशील गाळून मुद्दा सांगायचा म्हणजे तो तिथे चहा पीत राहिला आणि पोलिसांनी सोन्याला उचलला. पोलीसला चूक उमगली की काय झालं देव जाणे. सोन्या












छगेच सुटला. पण दुसरे दिवशी ऑफिसात लालवावटा आणि क्रांती याखेरीज विषय नव्हता. असला हा सोन्या मला 'क्रांती काय रोज होते'–म्हणून सांगतो. म्हणजे दुसरीकडे क्रांती करता करता सोन्याने स्वतःचीच क्रांती केली होती. कदाचित् मला अगदीच हा समजून तो विषय टाळत असावा असं मला वाटलं आणि मी थोडसं चिडूनच म्हटलं—

"सोन्या–लेको तुम्ही आम्हाला प्रश्न विचारता त्यावेळी आम्ही आमच्या अक्कलेच्या गंजिफाकाग्री सगळी फाटकी भोकं अख्खा शर्ट वर करून तुम्हाला दाखवायची आणि तुम्ही मात्र आमचे प्रश्न शिशुवर्गातल्या कारट्याचे असल्यासारखी ट्रीटमेंट देऊन दुर्लक्ष करायचं काय ? साला झकास न्याय आहे—बरोबर आहे—तुमची प्रोफेसर बिफेसर लोकांत ये–जा आम्ही कारकुंडे ———"

कसा कोण जाणे पण हा वाण सोन्याला लागला आणि तो झटक्यात रिंगणात आला.

"हे बघ मानवाला सर्वात जर—" मी ओळखलं की सोन्या आता सीरिअस आहे. सोन्याने माणसासारख्या माणसाला एकदा का 'मानव' म्हटलं म्हणजे ओळखावं की सोन्याची गाडी निघाली. त्यानंतर मग त्याच्यापुढे नुसता डोशाचं काय अख्खा उडपी आणून सहस्त्र डोशे चरं चरं करीत बसवा, सोन्याची गाडी विषय सोडून जरा इकडे तिकडे जायची नाही.

"हे बघ मानवाला जर काही कबूल करायला सर्वात मोठी लाज वाटत असेल तर ते म्हणजे आपला पार बुर्जा कसा उडाला है–"

"कबूल. पण आपला विषय मराठी भाषेचं नवं शुद्धलेखन हा आहे. त्याचा तुझा बुर्जा उडण्याशी काय संबंध ?"

सर्व विषयात नापास झालेल्या मुलाचं प्रगती पुस्तक हातात धरून त्याचा बाप ज्या चेहऱ्याने आपल्या त्या कुलदीपकाकडे पाहतो तस्से सोन्या बागलाणकराने माझ्याकडे पाहिले. आत तव्याच्या काळजात-देखील डोशाने चर्रं करून सोन्याच्या विकलावस्थेतल्या चेहऱ्याला सिनेमात 'ढूम ढूम डीम ह्यंऽऽई' करतात तसा ब्याकग्राउंड म्युझिकचा इफेक्ट दिला. क्षणभर स्तब्धता झाली. खिडकीपलीकडून कावळ्याचं 'काव' देखील ऐकू आलं. आणि मग 'भगवान् उवाच'—

"गेल्या महिन्यात मी भयंकर बिझी होतो तुला ठाऊक आहे." लामणगांव साहित्यसंमेलनात आम्ही स्वतःला पुरून घेतलं होतं. गाढवच आम्ही!" सोन्या आत्मनिर्भत्सना देखील कडक शब्दात करतो. हा एक त्याचा गुण मला आवडतो. मागे अशाच एका प्रसंगात 'तुला जगातल्या सर्वश्रेष्ठ गवड्याचं नांव ठाऊक आहे का ?' असा प्रश्न विचारून लगेच 'त्याला सोन्या बागलाणकर म्हणतात' असं उत्तरही आपलं आपणच दिलं होतं.

"फुक्कट एक महिन्याची लीव्ह नासून टाकली."

"पण संयुक्त चिटणीस झालास तो ?" मी विचारलो.

"झालो !–पण कां ? तर ह्या साहित्यसंमेलनांना येत असलेलं जत्रेचं स्वरूप जाऊन काहीतरी सॉलिड व्हावं ही इच्छा."









इथे मी सोन्याला छेडणार होतो पण म्हटलं जाऊ द्या. लामणगांव-सारख्या रेल्वेपासून सत्तर बहात्तर मैल दूर असलेल्या आणि एस. टी-च्या रस्त्यापासून पुन्हा दोन अडीच मैल जिथे वन् टू करीत जावे लागते असल्या गावात साहित्यसंमेलन भरविण्यात साहित्य जनता-सन्मुख करणे वगैरे हेतु असले तरी सोन्याचा हेतु तेवढाच नव्हता. सर्व कार्यात सोन्याची प्रेरकशक्ति ही पांचवारीत गुंडाळलेली कुठली तरी कन्याकुमारीच असते. ऑफिसमध्ये सोन्या 'लामणगांव' म्हणाला तेव्हा सुशा कोरफडे (तथा पॅकिंग सेक्शनची साधना) म्हणाली होती..."म्हणजे अय्या आमच्या गावात आहे संमेलऽऽऽन ?" आणि पुढला कथाभाग सोन्याच्याच शब्दात सांगायचा म्हणजे "लाइक ए फूल ह्या कोरफडीचे पंचवीस रुपये मी भरून तिला प्रतिनिधी करून घेतलं. आणि इथे ही वेस्ट इंडीजची टेस्ट म्याच बघायला थांबली. सोबर्सचा गेम पहाते. स्वत:ला अगदी ती इंद्र नरेंद्र की कोण समजते. आणि वर लामणगांवला माझ्या आजीला भेटायला विसरू नका हं बागलाणकर ऽऽ हे ! हिच्या आजीला भेटा ! !"

"जाऊ दे सोन्या. संमेलनाचं बोल."

सोन्याने एकदा हातरुमालाचा बोळा करून कपाळ घासले. नको असलेले विचार पुसायची त्याची आपली ही एक पद्धत आहे.

". . . . तर लामणगांवचं हे संमेलन गाजलं हे तर तू पेपरात वाचलंच असशील."

"सोन्या—न गाजलेलं असं एखादं संमेलन असतं का रे तुमच्यात?"

सोन्याच्या कानी माझा प्रश्न गेला नसावा. कारण माझ्या प्रश्नाला उत्तर न देता सोन्याने आख्यान चालू ठेवलं.

"तू हे जे शुद्धलेखनाचं म्हणतोस ते तिथेच निघालं. आणि अध्यक्षांनी 'जे मुखी ते लेखी' हा नारा दिला.

"काय दिला ?"

"नारा."

"नारा ?"

"म्हणजे मिरवणुकीत ओरडायला एखादी लाईन लागते त्याला नारा म्हणतात— उदाहरणार्थ..." त्याला आठवेना.

"इन्किलाब झिंदाबाद.." मी सोन्याची सुटका केली.

"राइट. तसं जे मुखी ते लेखी !"

"म्हणजे ?" मी

"म्हणजे बोलावे तसे लिहावे." सो. बा.

"पूर्वी आम्हाला एक, करावे तसे भरावे नावाचा, धडा होता." मी थोडंसं विषयाला सोडून बोललो हे लक्षात आलं माझ्या. म्हणून लगेच सावरून म्हटलं—"वा, हे चांगलं झालं. म्हणजे आपण जसं बोलतो तसं लिहायचं. म्हणजे वा. म्हणजे शुद्धलेखनाची भानगड मिटली. वा ! माझ्या तर्फे अध्यक्षाचं अभिनंदन कर. तू एक झकास लेटर ड्राफ्ट कर तुझ्या जरा हाय मराठीत. मी सही ठोकतो. असा अध्यक्ष पाहिजे. सोन्या ह्या अध्यक्षाला त्याच्या मास्तरनी पिटलेला असणार— हे ऱ्हस्वच कां ? तें दीर्घच कां ? इथला अनुस्वार कुठे नि तिथला स्वल्पविराम कुठे ? असं छळून. वस्. अध्यमहाराजांचा विजय असो." मला वाटलं सोन्या गाल वाकडा होण्याइतपत तरी हंसेल. पण कुठलं काय ?

"हे पहा हुरळून जाऊ नकोस. मी स्वत: अभिनंदनाचं भाषण तिथे लामणगावलाच ठोकलं. वेस्टिंडीजच्या मॅचिस बघताहेत साल्या !" (सोन्याच्या बोलण्यात पुष्कळदा प्रकटच्या मागचं स्वगत. मुंबई 'ब'-च्या मराठी गाण्यामागून कुठल्यातरी इंग्रजी बातम्या ऐकू येतात तसं येतं.)

"मी... मी अध्यक्षांचे हे विचार क्रांतिकारक कसे आहेत ते सांगितलं. एवढंच काय यापुढे 'शुद्धलेखन मुर्दाबाद' – 'बोलू तैसे लिहू' वगैरे हे देखील दिले—"

"नारे ?"

"यस् ! लोकांकडून जाहीर प्रतिज्ञा घेतली की यापुढे सगळी पुस्तकं बिस्तकं वायाबापडयांच्या मराठीत—"

"कुणाच्या ?"

"वायाबापडयांच्या—"

"म्हणजे ?–"

"म्हणजे कामं ऐक. आपलं साहित्य आहे ना ? ते लोकाभिमुख पाहिजे."

"अच्छा." लोकाभिमुखाची भानगड खरं तर मला कुठली नव्हती. पण म्हटलं मरू दे.

"तेव्हा भाषा कशी पाहिजे. जशी आपण बोलतो तशी.— हा संस्कृतचा सासुरवास कां म्हणून ?– तर मराठी भाषेवरचं संस्कृतचं वेगड उडवून द्या हा ठराव माझ्या आधी अंबुजादेवी आजरे यानी मांडला. आणि मी ठरावाला पाठिंबा द्यायला उभा राहिलो."

"सोन्या ठराव सौ. की कु. ?"

"कू." सोन्याचा सुस्कारा काउंटरपर्यंत ऐकू गेला असेल.

"म्हणजे तूं काय सांगितलंस? की संस्कृतसारखं हे ऱ्हस्व दीर्घ वगैरे लफडं नको म्हणून."

"होय !"

"अंबुजादेवी काय करते रे —"

"तिला कशाला काय करायला हवंय. बापाचा विड्यांचा कारखाना आहे लेका ! घो घो पैसा – डोळे काय – वा !"

"बाकी विडी—कारखानदारांच्या घरातून सोन्याचा धूर निघतो नाही ?" मी आपला सुचलेला विनोद बोलून टाकला. सोन्या थोडासा अंबुजा-लोचन-स्मरणात गढला असावा. गप्प होता. त्याला जाग आणली. "ते मरू दे—तुझं भाषण सांग."

"अंबुजा आजरेच्या विचारानाच मी दुजोरा दिला."

मी मनात म्हणत होतो की त्या विडीवाल्याच्या लेकीने ह्या सोन्याला कसल्या तरी वाग्याने त्या लामणगावांत आवळलं असणार. सोन्याला काय स्त्री स्वरात "अय्या इथे चपला कुठे ठेवायच्या ?" हा प्रश्न देखील शिरशिरी आणतो. अंबुजादेवीने मराठीभाषा तामीळ कड-बोळी काढून लिहावी म्हटलं असतं तरी ह्या येड्याने ठरावाला पाठिंबा दिला असता. उपजतच घायाळ माणूस हा !

"मी स्वच्छ सांगितलं—" सोन्या अंबुजेच्या नयनांबुज स्मरणा-तून बाहेर आला. "की शुद्धलेखन हा एका विशिष्ट संस्कृतीच्या लोकांनी लादलेला विचार आहे."

"पण सोन्या हे विशिष्ट संस्कृतीतल्या असं आडवळणी कशाला बोललास ? सरळ सांगायचं की शुद्धलेखन हा भटाबामणांचा कावा आहे."

"हे पहा–मी एका विशिष्ट पातळीवरून बोलत होतो. अंबुजा आजरे ! (सोन्याच्या मेंदूतल्या रेडियोतली स्टेशनं एकमेकात घुसली) मी सरळ सवाल केला–शुद्ध म्हणजे काय ?

सगळे चूप ! हिंदीत जर पानी शुद्ध तर मराठीत तेच पानी अशुद्ध कां ? नव्हतं हे शुद्ध तर व्हतं हे अशुद्ध कां ?"

"साली आयडिया ! शुद्धवाले बेशुद्ध झाले असतील." माझा हा विनोद सोन्याने दुर्लक्षिण्याइतका वाईट नव्हता.

"अरे स्पष्ट विचारलं ! कोणासाठी लिहिता ? आज तुमचा सगळा वाचक खेड्यापाड्यात विखुरला आहे. शेताच्या बांधावर आहे–मोटेवर आहे– खळ्यात आहे–मळचीत आहे. त्याना काही कळेल अशा भाषेत लिहा–अंबुजा आजरेच्या टाळ्या ह्या कानात आहेत!" पुराव्यादाखल सोन्याने दोन्ही कान इकडून तिकडे फिरवले.

**नाश्त्यावरचा परिसंवाद !**

**"बरं कां, आमचा त्यो किर्लु-स्करांचा आन्ना नव्हं ?"**

'हे खर हां सोन्या. अरे काय लिहितात अक्षर कळत नाही. अरे कालच गोष्ट वाचत होतो. निम्मे शब्द हाताबाहेरचे. तिच्यी हुर्यात करारल्यागत झाल. बैल दिकून कसनुस करायल्ली. अस्सं लिहिलं होतं. आपल्या माहितीचा बैल हा शब्द निघाला फक्त. काही कळेल असं लिहा लेको."

सोन्या क्षणभर गप्प झाला. माझ्या बोलण्यात काहीतरी गफलत झाली असावी.

"अरे हेच ते बायाबापड्यांचं मराठी—"

"पण सोन्या बाया बाया आणि बापड्या बाप-ड्यात जाम फरक असतो की—"

"मित्रा हे तुला कळतं—ते त्यावेळी मला कळत तर—"

"म्हणजे ?"

"म्हणजे काय ते वाच. जसं बोलतो, तसंच लिहिलं पाहिजे हा ठराव पास झाला आणि लामणगाव मराठी साहित्यसंमेलनाचा संपूर्ण अहवाल तिकडल्या लोकांनी छापून प्रसिद्ध केला तो वाच. तरी मला पहिल्यापासून शंका होती—"

"कसली—"

"तिथल्या शाळामास्तरला ह्या अहवाल लिहायच्या कामावर बसवलं होतं —तो काहीतरी घोळ करणार याची."

"तो कशाला कडमडायला आला लामणगाव साहित्यसंमेलनात ?"

"वा ! तांबडे गुरुजी लामणगांवचे भूषण ना? इमानी माणूस. व्यासपीठावरून येणारा प्रत्येक शब्द सरपंचाच्या थुंकीसारखा झेल-णारा. 'बोलावे तसे लिहावे'चे बोर्ड घेऊन पोरांची मिरवणूक काढली त्याने ! त्यातच जिल्हा परिषदेचे अध्यक्ष आलेले, बघून दोन चार बोर्ड 'विना सहकार नही उद्धार' 'तीनच मुले तर सौख्य फुले'चे बोर्डही त्यातच घुसवले."

"म्हणजे साहित्य संमेलनात मिरवणूक वगैरे होती–"

[पृष्ठ १९२ वर पहा]



लावलेलं दार. . .स्वतंत्र,
निवांत, सुसज्ज बेड....दोघं न
बोलता अेकमेकाना
बिलगली. . . उबदार खोली . . .
पांढरी शुभ्र चादर....
सुखातिशयाने तिने
अस्पष्टसा चित्कार काढला....



—अरविंद गोखले

त्याला भेटायला जाण्यासाठी तिने लगबगीने सारा साज केला; आणि मग एकाएकी तिचं मन मरगळून गेलं. दीर्घ विरहानंतर आज तो भेटणार याचा हर्ष अनावर होत असतानाच, सगळा दिवस फरफटत घालवावा लागणार या जाणीवेने तिच्या पायातलं बळ गळत होतं. दहाएक आठवड्यानंतर तो दिवसभर भेटून मग परत दोनतीन महिने नाहीसा होणार होता. दोनएक वर्षं असं चाललं होतं. अन् आणिक दोनएक वर्षं तरी असाच क्रम चालू ठेवणं भाग होतं. चोरट्या भेटी, चुटपुटते स्पर्श. इथे तो कॉलेजात होता तेव्हां ठीक होतं. रोज निदान तो दिसत तरी असे. ओढ लागली तर गाठ घेता येई. तो जवळपास आहे या जाणीवेने धीर येई, आधार वाटे. पण त्याने दुसऱ्या गावी नोकरी धरली, पुढचा कोर्स घेतला. ते शिक्षण पुरे होऊन चांगली नोकरी मिळेपर्यंत लग्नाचा विचारहि शक्य नव्हता. तोवर सारं लपवून, लीवूनच. आता कचेरीच्या कामासाठी त्याने ठराविक दिवशी ह्या गावी यायचं. मामांकडे मुक्काम टाकायचा, बारा वाजेपर्यंत काम उरकून तिला कॉलेजच्या कॉरिडॉरमध्ये गाठायचं. मग भेट झाली की संध्याकाळपर्यंत भटकत राहायचं. कॅफे, कालव्याचा कट्टा, आमराई, देवळाची ओवरी, ग्रंथालयाची गॅलरी, स्टेशनवरची वेटींग रूम ! ओळखीच्या लोकापासून लपून. दोघांचं विश्व उमलेल असा एकान्त. खूप बडबडायचं नि न बोलता एकमेकांना डोळ्यात साठवून घ्यायचं. मागच्या भेटींची उजळणी करायची, पुढचे बेत ठरवायचे. हाती आलेले सुवर्णक्षण कृपणासारखे खेळवायचे. अन् मग चोरटा निरोप घ्यायचा. पुन्हा भेटीचा वायदा करून. मधला तुटीचा काळ लवकर सरेल अशी समजूत घालीत. स्वत:शीच आपली ओढ आवरीत व जगापासून प्रेमकहाणी छपवून ठेवीत !

आज तो प्रेमाचा परिसाचा दिवस उजाडला होता. कितीतरी काळ ती या दिवसाची वाट पहात होती. या दिवसा

अनुक्रमणिका

साठी मधले सारे दिवस दान करायला तयार होती. ठरल्याप्रमाणे तो येईल की नाहीं अशी आशंकेने ती मध्येच व्याकूळ होई व तो नक्की येईल ह्याची ग्वाही स्वत:स्वच पुन्हा पुन्हा देई. त्याच्यावर, त्याच्या वर्तनावर, व्यक्तिमत्वावर तिची श्रद्धा होती. तो वेडा वागायचा नाही, शब्द मोडायचा नाही असा तिला विश्वास होता. त्याचीहि फरफट होत होती. त्यालाहि या चोरटेपणाचा वीट आला होता. पण काही काळ थांवणं भागच होतं. तेवढा काळ गेला की....

ती पुन्हा पुन्हा अधीरी होई. त्याची मुद्रा, आकृति आठवे. तिला त्याचा स्पर्श जाणवे, वास येई, अन् ती अधिकच वेडी-पिशी होई. भेटीची घटिका जवळ येत चालली आणि तिची अस्वस्थता अनिवार झाली. आठवडा, चार दिवस, तीन दिवस, उद्या ह्या वेळेला, एवढी रात्र गेली की– तिला खूळ लागलं. तो भेटल्यावर काय बोलायचं, कसं वागायचं ह्याची ती वारंवार उजळणी करू लागली. त्याच्यासह कुठे जायचं... कुठे जायचं त्या जागाहि ठरलेल्या होत्या! आलटून पालटून त्या वास्तू तिला दिसत राहिल्या; अन् मग तिचा आवेश ओसरून जाऊ लागला. काळजास भोवळ येऊ लागली. तो हवा–पण त्या जागी जाणं नको!–सार्वजनिक ठिकाणी प्रेमाचं कूजन करायचं, कुणी नाहीसं बघून एकमेकांना बिलगायचं, ओळखीचं दिसताच तोंड लपवायचं, परक्यांनी पाहिलं तर निगरगट्टपणा दाखवायचा! सारी बाजारी, उपरी संकेतस्थळं. चोरटी, उष्टी! स्वत:चं घरकूल राहिलंच, पण निवान्त, निर्धास्त आडोसाहि नाही. तिला स्वत:चीच कींव आली, शरम वाटली. अन् परत तो दिसावा, भेटावा म्हणून ती कासावीस झाली. त्याच्यासह...पुन्हा तिला कससंच झालं. अशा ओढाताणीतच ती भेटीच्या क्षणाला सज्ज होत होती.

मनाच्या अधू अवस्थेत ती त्या दिवशी अधीरपणे कॉलेजात गेली. उगाच लेडीज रूममध्ये रेंगाळली. लेक्चर्स प्रॅक्टीकलला गेलो नाही म्हणून कुणी चौकशी करेल म्हणून 'बाहेर कामाला जायचंय–' असं एक दोघी मैत्रिणींना तिने सांगितले. अन् मग धडधडणारी छाती पदराने घट्ट लपेटीत कॉरिडॉरच्या टोकाला येऊन ती उभी राहिली. कॉलेजकडे, रोजच्या आयुष्याकडे पाठ फिरवून. आजचा दिवस अभ्यासाचा, मैत्रिणींचा, वाचनालयाचा, घरच्यांचाहि नाही. आज फक्त...

अपेक्षेप्रमाणे तो वेळेआधी आला. एका हाताने गळ्याजवळचा घाम रुमालाने पुशीत व दुसऱ्या हातात कागदपत्रांची बॅग सावरीत. पठाणी वहाणा, काळी पँट, पांढरा बुशकोट. कोरलेल्या मिशा, रुंद जवडा, रसरशीत मुद्रा, कॉफी रंगाचे डोळे. मिष्कील, मनस्वी. त्याच्या दर्शनाने तिच्या उरात लोट उठले. सगळी मरगळ विसरून ती फुलपांखराने पंख पसरावे तशी हसली. हात पुढे करीत नकळत त्याला सामोरी गेली.

"बराच वेळ वाट पहात होतीस?"

"दीड महिना–" दीड महिन्याच्या विरहाचा शीण सरल्यासारखे डोळे मिचकावीत ती म्हणाली.

"दीड महिना इथे उभी होतीस?–" तो हंसून तिच्या पुढे झालेल्या हाताला स्पर्श करीत मिष्कीलपणे म्हणाला, "पहाटे स्टेशनवरून मामांच्या घरी जाताना मी मुद्दाम इथून गेलो. ही आपली भेटीची जागा पहायला—तेव्हा तर तुझी नुसती सावली होती उभी–पहाटेच्या दंवात भिजलेली—"

ती हसायचं विसरून एकदम त्याच्या फुलत्या चेहेऱ्याकडे बघत राहिली. त्याला असं काव्यात्म बोलणं सुचलं की ती अगदी विरघळून जाई. त्याच्या उत्कट प्रीतीने भारावून जाई. आत्ताहि ती अशीच स्वत:ला हरवून बसली. नकळत त्याच्यासह चालू लागली.

कॉलेज कंपौंड ओलांडून दोघंहि हमरस्त्यावर आली. कॉलेज विद्यार्थी, प्राध्यापक येत–जात होते म्हणून दोघंहि गप्प होते. रस्ता जरासा शांत दिसताच त्याने

## जमे–नांवे



**जसें नांव व्यायास केले न कांहीं**
**तसे नांव ठेवावयालाहि नाहीं**
**जरी नांव केलें न केली वढाई**
**जरी नांव गेले न केली लढाई**
**जमेलाहि नाहीं नि नांवे विचारी**
**प्रपंचताही राहिला ब्रह्मचारी**

**–कोंडश्या**

विचारलं,

"बोल दोस्त, काय केलंस हे, मधले सत्तेचाळीस दिवस? म्हणजे दहाशे अठ्ठावीस तास, म्हणजे–किती मिनीटं ग–का तेवढी युगं होतात तुझ्या लेखी? गणित घेतलंयस ना तूं? की मानसशास्त्र?"

तो असं विचित्र, विनोदी सदा बोलायचा. नवे नवे विषय, खेळ काढायचा. विरहाची वेदनाहि मधुर करायचा. तिला त्याचं फार कौतुक वाटलं. अशा पुरुषाचा कायमचा केव्हा सहवास मिळतो यासाठी ती कासावीस झाली.

"का ग–बोल ना?" तो चाल मंद करीत मोठ्यांदा म्हणाला. ती दचकली. वाटलं, कुणी ऐकलं. इकडे तिकडे बघत म्हणाली,

"झाली कामं सगळी? जेवण केलंस?"

"खूप खाणं झालंय मामांकडे. अन् उरली सुरली भूक सरली आता. एक दोन कामं रात्री उरकून सकाळच्या गाडीने वापस—"

"रात्री गाडीत जागा मिळाली?–"

"अजिबात नाही. सगळा बाक रिझर्व्ह होता, पण तूच तो अडवलास असं वाटत होतं!–ए–मोझीच चौकशी काय चालवली आहेस. तुझी हकीगत सांग ना. अभ्यास काय चाललाय, गाणं कुणाचं

ऐकलंस, वडिलांचा संतापी स्वभाव काय म्हणतोय, तुझ्या अंगठ्याला लागलं होतं... थांब, आपण कुठेतरी निवांत बसू या–" तो परत थबकत म्हणाला.

कुठेतरी निवांत !–तीहि थबकली–पण कसल्याशा धास्तीने, मगापासून, केव्हा-पासून तरी ही अस्वस्थ भावना काळजात घर करून होती. म्हणूनच आपण सकाळ-पासून बेचैन होतो? आत्ताहि अबोल बनलो आहोत ?

"कुठे जायचं?- तूंच ठरंव–" तो फूट-पाथच्या कडेला थांवला व तिच्याकडे तोंड करून म्हणाला. ती त्याची नजर चुकवून रस्त्यावरील रहदारी बघू लागली. कुठे जायचं?–सगळी ठिकाणं लखकन् तिच्या डोळ्यापुढे उभी राहिली. कॅफे, कालव्याच्या कट्टा, आमराई, देवळाची ओवरी, ग्रंथालयाची गॅलरी, स्टेशनवरची वेटींग रूम ! ओळखीच्या लोकांपासून लपून. दोघांचं विश्व उमलेल असा एकान्त.. सारी बाजारी, उपरी, संकेत स्थळं–चोरटी उष्टी ! तिचा चेहेरा गोरामोरा झाला. आणि भर उन्हात गर्दीच्या जागी आपण अवघडून उभे आहोत हे उमगून तिच्या हातापायाना घाम फुटला.

"सांग ना !–कॅफेत जायचं?- गेल्या खेपेस त्या स्पेशल रूममध्ये बसलो होतो तसं? तुला लिंबू सरबत आवडतं ना ?"

"नंको–नको–" ती एकदम निरिच्छेने म्हणाली, "मला अगदी तहान नाही–अन् तुझंहि खाणं झालंय ना ? काय करणार तिथे जाऊन ?" गेल्या खेपेस काय केलं हे तिला स्मरलं. सरबताचे ग्लास पुढे ठेऊन एकमेकांच्या बाहुपाशात बसून राहिलो. तिला एकदम त्याच्याकडे झुकावं, त्याच्या मिठीत जावं, असं वाटलं. किती जवळ तो होता. अन् कितीतरी रात्री तिने बिछान्यावर तळमळत एकटीने काढल्या होत्या ! होटेलच्या स्पेशलरूममध्ये बसून निदान....

पण मग तिला कॅफेत शिरताना चहा घेत बसलेली गिऱ्हाईकं कुतुहुलाने बघत होती ते आठवलं. नोकर तर फडकं मारायला, पाणी द्यायला, काही हवंय विचारायला सतरादा खोलीत डोकावायचा. अन् झुलत्या दाराच्या फटीतून टक लावीत एक म्हातारा कोपऱ्यात कायमचा बसून होता. छे, कॅफेची खोली म्हणजे उघडा बाजार. लोकांना कुजवुजण्याला, बोटं दाखवायला संधी. रेडीयो गजंत असताना नि चौफेर सारे चहा भुरकत असताना एका आडोशाला बसून मनातलं बोलायचं नि मिठीत जायचं हे किती कळकट. असभ्य ! अन् तिला तर आपल्या प्रीतीला, प्रणयाच्या खेळाला पारिजातकाच्या फुला-सारखं जपायचं होतं. शुभ्र, नाजूक, टवटवीत दंवबिंदूत न्हायलेलं.... "नको त्यापेक्षा कालव्याकडे जाऊ—".

ती निघाली पण तो मागे रेंगाळत होता. तिला वाटलं, त्याला कॅफेतच जायचं आहे. आपल्याला जवळ घ्यायचं आहे. त्याची आतुरता ती समजू शकत होती. वाटलं, विसरावं सारं, व वागावं तो म्हणेल तसं. आज वर्ष दीड वर्ष गर्दीतल्या एकां-तातच प्रणयाचे क्षण ओरबाडत आलो की— ती माघार घेणार तोच तो पुढे होत म्हणाला,

"कालव्याच्या कट्ट्यावर नको–त्यापेक्षा ग्रंथालयाच्या गॅलरीत बसू. नाहीतर स्टेशनवर जाऊ—"

"कालव्याकडे कां नको? तुला तर तिथे आवडतं ना ? कट्ट्यावर झाडाची फुलं सडा घालतात. नि पाण्यात आपली प्रतिबिंबं हलून हालतात—"

"–पण त्या बाजूला म्हणे नवं बांधकाम सुरू झालंय. अन् त्याचा ठेकेदार आहे माझ्या ओळखीचा—"

तिचा चेहेरा उतरला. लोक पाहतील, ओळखीचं भेटेल, भोवती गर्दी असेल–चोरटा कारभार नि बाजारी मामला ! – या अवाढव्य शहरात कुणी बघणार नाही, बोलणार नाही अशी हक्काची, शांत जागा जरा वेळहि मिळू नये ?

न बोलता दोघंहि वाट फुटेल तिकडे चालत राहिली.

उन्ह वाढलं होतं. रस्त्यावरची रहदारी विरळ होत होती. दुकानातून गर्दी दिसत नव्हती. सगळीकडे दबलेली शांतता पस-रत होती. जो तो मनुष्य आपापल्या कामात गढला होता. जी ती वास्तू जागच्या जागी होती.

तिला परत तीव्रतेने वाटलं, की आपण अगदीच वेड्यासारखं वागतोय आज. ओझरत्या स्पर्शावर नि ओरबाडलेल्या भेटीवरच आपल्याला हा लग्नापर्यंतचा काळ काढला पाहिजे. इतके दिवस नाही का दिसेल त्या आडोशाला थांबलो, प्रेम व्यक्त केलं, मनोराज्यं बांधली?–त्यावरच आपली प्रीति बहरत गेली. सारी प्रणेरी








जोडपी असंच करतात. ज्याना घरचा विरोध असेल नि बाहेर थारा नसेल त्यानी असंच वागायला हवं. त्यात कसला निर्लज्जपणा, उथळपणा? आपण प्रीतीला दृष्ट लागू नये म्हणून पूर्ण एकान्त मागतो आहे.– उपरा प्रणथ नको म्हणून वासनेला वाट शोधतो आहे... कां! काय झालंय आपल्याला?

"तुला काय वाटतंय ते कळतं मला ..." तो तिच्याकडे न पाहता सरळ म्हणाला, "तुला असं लोकांनी वेगळ्या नजरेनं बघावं हे आवडत नाही. त्यात कमीपणा वाटतो. अपमान वाटतो. विशेषतः आपण परोपरीचं प्रेम करूं लागल्यावर. लग्नाची वचनं दिल्यावर–तुला घाईतलं आलिंगन त्रास देतं. चोरटेपणाचा, पापी भावनेचा त्यातला भाग तुला त्याज्य वाटतो—"

आपल्या मनातले भाव त्याने सरळ, स्वच्छ सांगितल्याने तिचं मन मोहरून आलं. एकदम आधार, उत्साह जाणवला. त्याच्याकडे न बघता ती म्हणाली,

"हे जे अपरिहार्य होतं ते आपण आता ओलांडलंय असं मला वाटतं. तसं पोरकट आता वागू नये असं वाटतं. आपण थांबायला तयार आहोत–पण भेट होईल तेव्हा शांत, एका जागी निर्धास्त बसावं, मनातलं बोलावं, मिठीत गुंतून पडावं– हो, विश्वास असल्यावर अन् भविष्य अटळ असल्यावर काय हरकत आहे सगळ्या गोष्टींना?"

भर रस्त्यात त्याने तिचा डावा पंजा पकडला. अन् तिनेहि तसाच तो राहू दिला.

वळणापाशी दोघं थांबली तेव्हा ती म्हणाली,

"तू इथे हॉटेलात कां उतरत नाहीस?'

"सांगितलं ना तुला, मामांना आवडायचं नाही म्हणून? अन् मामांची नि माझ्या बॉसची ओळख आहे. मी इथे आलो नि बाहेर राहून गेलो तर त्याला लगेच समजेल—"

मग कुठे जावं? समोरचा रस्ता स्टेशनकडे जात होता. उजव्या दिशेला दूरवर आमराई होती. ग्रंथालयाची थंड, काळोखी इमारत जवळच होती — एकदम एक कल्पना येऊन तो म्हणाला,

'हॉटेलचंच म्हणतेस ना?–मग चल की, एखाद्या हॉटेलमध्ये एक खोली घेऊ आजच्या दिवसापुरती–त्यात काय झालं? करतात असं कित्येक. इतके दिवस कसं सुचलं नाही?– चल. नवरा बायको म्हणून नांव नोंदवायचं. दिवसाचे दहा पाच रुपये. संध्याकाळी परतायचं. खोलीचं दार लावलं की कुणाची कटकट नको—"

क्षणार्धात् तिचे डोळे चमकले. पती-पत्नी म्हणून कुणाला तरी उघड सांगायचं, कुठल्या तरी रजिस्टरमध्ये लिहायचं, ही कल्पना तर एकदम आवडली. जगापासून अलग व्हायला व त्याच्यासह एकान्त करायला ती उत्सुक होती. हो – त्याच्यावर विश्वास असला तर काय पर्वा आहे? तिला ती बंद खोली, छपरी पलंग, गुदमरलेले श्वास आताच दिसू लागले. तिने हसून होकार दिला व त्याचा हात धरला.

तेवढ्यात तो म्हणाला, "पण तिथे गेल्यावर उगाच आलो म्हणून नाराज व्हायचं नाही. एखाद वेळेला खोली मिळायची नाही.–कदाचित् थांबावं लागेल एखादी रिकामी होईपर्यंत. आपल्या सारखंच कुणी तास दोन तास भाडं भरून आत गेलं असेल–सामान न घेता गेलो म्हणजे नौकर हसून बघणार. शिवाय इतर पॅसेंजर्स भेटणार–पण तिकडे लक्ष द्यायचं नाही —"

"मग नको–नको बाबा—" ती त्याचा हात सोडून व पदर सावरून घाईने म्हणाली. लॉजिंग हाऊसमधले लुंजू, मॅनेजरने विचारलेले प्रश्न, खोट्या जोडप्यांची ये–जा, नौकरांनी हसून लावून घेतलेलं खोलीचं दार, शेजारच्या खोल्यांतून. . .न पाहिलेली सारी दृश्यं पटापट तिच्या डोळ्यापुढे येऊ लागली. ह्यापेक्षा वेटिंग रुम परवडली. कॅफेतली स्पेशल रुम बरी. ती श्वास टाकीत म्हणाली, "आमराईतच जाऊ या—"

आमराईतलं ठराविक ठिकाण टाळून तो बाजूच्या एका, नवी पालवी फुटलेल्या,



अनुक्रमणिका

झाडाशी तिला घेऊन आला. जरा नवीन, वेगळं वाटावं, मगाचंच विसरावं, आता परत मोहरून यावं म्हणून. वाजूल पडलेल्या डहाळीने बुंध्यापासची जागा साफ करीत व तियेच ती डहाळी खोचीत तो म्हणाला, "बसा, राणी सरकार–"

ती पदर मोकळा करीत बसली. चोहोकडे बघत म्हणाली, "खरंच, हीच जागा बरी आहे. एकीकडची, बरीचशी शांत—"

मग ती एकदम थांबली. जीभ आत ओढली गेली व तोंड – झालं. गेल्याच आठवड्यात म्हणे तिच्या कॉलेजातली कुणी मुलगी आपल्या मित्राबरोबर इथे आली होती तिन्हीसांजेची. तेव्हा एका गुंडाने—— "

"का ग, अगदी बोलत नाहीस?" त्याने तिला गुदगुल्या करीत म्हटलं. तिचे ओठ अधिकच घट्ट झाले. पण ती जरा त्याच्या जवळ सरकली.

बराच वेळ कुणी बोललं नाही. सूर्य वर आला होता. तळपत होता. दूरवर एक म्हैस रवंथ करीत उभी होती. कुठून कुणी कुठेतरी धावत असल्याचा आवाज येत होता. दुरच्या मोटरगॅरेजमध्ये मध्येच ठोकाठोक होत होती. पण आंब्याच्या झाडाखाली अगदी शांत होतं. वाजूचं वारुळ रिकामं होतं. झाडाची पानं निश्चल होती. फांद्यांवर एकहि पक्षी नव्हता.

मग तो मृदुपणे म्हणाला, "आज तुझा मूड बिघडलाय अगदी. इतक्या दिवसानी थोडा वेळ भेटायचं, तेसुद्धा तू—"

तिला एकदम भरून आलं. त्याच्या खांद्यावर डोकं विसावत ती म्हणाली,

"तसं नाही रे– चुकलंच माझं– खरं सांगते, मी ह्या दिवसाची फार वाट पहात होते. नेहमी फार फार वाट पहाते रे. तुझ्या भेटीचे दिवसच माझ्या आयुष्यात जणू उगवतात. त्यातले सगळे क्षण मी खूप मजेत असायला हवं खरं—"

तो नुसता तिच्या हातातल्या एकट्या बांगडीशी खेळत राहिला.

तीच पुढे म्हणाली, "पण आजकाल मला वाटतं, की थिल्लरपणा नको. चोरटेपणा नको. दोघांनी भेटावं ते शांत जागी. एकान्तात. कुणी न येईल अशा ठिकाणी– खूप खूप बोलण्यासाठी–कदाचित् माझी शरीराची ओढंहि वाढली असेल. पण भेटशील तेव्हा तूं सगळा हवास असं वाटतं! –"

तिला वाटलं, तो तिला जास्त जवळ घेईल. कदाचित हसून थट्टा करील. पण तो एकदम स्वत:ला सावरीत म्हणाला,

"अग–मी विसरलोच. किती सोपं– अन् सोयीचं – चल, चल——"

ती दचकून म्हणाली, "काय झालं रे! कुठे जायचं ?"

वेळ न दवडता तो उठलाच. "ती कॉलनी आहे ना! तिथे माझा मित्र राहातो. एकटाच. अगदी चांगला दोस्त आहे. सारा दिवस कामावर असतो नि अगदी संध्याकाळी घरी परततो. गेल्या खेपेला आम्ही सिनेमाला गेलो होतो तेव्हा रात्री मग त्याच्याकडेच मी झोपलो."

"त्याचं काय?"

"त्याच्याकडे जाऊ. मी त्याला तुझ्याबद्दल बोललोय एकदा. तो काही म्हणायचा नाही. तो भेटायचाहि नाही आता. किल्ली शेजाऱ्याकडे ठेऊन जातो तो. ते लोकहि मला माहित आहेत—"

तिला जरा विचित्र वाटलं. पण तो निघाला तशी तीहि चालू लागली. त्याचं झरझर चालणं, खुपीने तिचा हात दाबणं, सारं पाहून तीहि स्वतःला उत्तेजित करू लागली. विचित्र पण जास्त विचार नको आता. दोन एक तास फुकट गेले. आणिक दोन अशीच तास उरले आहेत. तेहि असेच दवडले तर पुन्हा दीड एक महिन्याचा विरह अधिकच असह्य होईल. त्यापेक्षा परक्या ठिकाणीहि का होईना, पण एकांतात विसावल तर... तिला खरोखरीच एकदम हलकं फुलकं वाटलं. रक्त सळसळलं. त्याने रिक्षा थांबवली तेव्हा आपण होऊन ती आत बसली.

रिक्षा चालू होताच त्याने तिला विळखा घालून म्हटलं, "आता नाराजी नाही ना?"

"ती बाजूला होत म्हणाली, "नाही. पण नीट बसलं तरच आपण नवराबायको दिसू—"

दोघंहि हसले व रिक्षा कॉलनीत शिरताच उतरले. बाजूच्या एका पुऱ्या होत असलेल्या रिकाम्या बंगलीशी तिला उभी करून तो म्हणाला, "तूं इथेच थांब. मी तो मित्र आहे का बघून येतो. तो नसला तर किल्ली मिळवून येतो. म्हणजे तडक आपल्याला त्याच्या ब्लॉकमध्येच जाता येईल—"

तो घाईने गेला व ती मजेत उभी राहिली. नुकत्याच साडी नेसू लागलेल्या दोन मुली समोरच्या घरात झोपाळ्यावर झोके काढीत होत्या. बाजूच्या बंगल्याच्या पन्हाळीत एक मांजर कमान करून उभं होतं. व खालून एक कुत्रं जीभ काढीत त्याच्याकडे उड्या मारीत होतं. मागच्या इमारतीला दिलेल्या रंगाचा मंद वास मध्येच येत होता. बाकी सारं तटस्थ होतं. गहिरं वाटत होतं. त्यातच ती रमली. कमानदार मांजर, झोके घेणाऱ्या मुली व्हार्निशचा वास— त्याचा वास तिला आठवला. त्याच्या स्पर्शासाठी ती आतुर झाली. त्याच्याशी काय बोलायचं ते ठरवू लागली. स्वतःच्या संसाराचं रूप पाहू लागली.

बऱ्याच वेळाने तो आला. संथपणे, पण तशाच उत्साहाने. त्याच्या हातात किल्ली नव्हती हे पाहून तिने घाईने विचारलं, "काय झालं रे?

"अग, तो मित्र कामावर गेला नाही. घरीच आहे. त्याचे दोस्त जमले आहेत नि रमीचा डाव रंगला आहे—"

"जाऊ दे मग—" ती नाराजीने म्हणाली, "आपलं नशीबच—"

"नाही—नाही—" तो तिला थबकून म्हणाला, "आपलं नशीब जोरावर आहे..."

"म्हणजे?" ती भुवया वर उचलीत म्हणाली, "तरीहि त्याच्याकडे जायचं?"

"त्याच्याकडे नाही— मी त्याला एका बाजूला नेऊन माझा प्रॉब्लेम सांगितला...

तो मोठा हुन्नरी आहे. मोठा विश्वासूही हं. तो म्हणाला, त्यात काय आहे, मी करतो व्यवस्था—"

"कसली व्यवस्था?"

"मागच्या आळीत तिची दूर दूरची मावशी राहते. तिच्या नातवाचा शिक्षणाचा खर्च तोच करतो. तिला आपली अडचण सांगून—"'

"तसलं कशाला . . ."

"अग, लगेच आम्ही जाऊन आलो. जागा छान आहे. अन् म्हातारीहि तयार झाली. म्हणाली, मी कथेला निघालेच आहे... बसा ना तुम्ही खुशाल. आम्ही सावत्र भावंडं असून जरा घरगुती भांडणाबद्दल आम्हाला खाजगी बोलायचंय म्हणून मी सांगितलं—मित्र परत गेला नि मी इकडे आलो. चल आता—"

डाव्या हाताखली बॅग. उजव्या हातात घेत व डाव्या हाताने तिचं मनगट पकडीत तो निघाला. ती मुकाट निघाली. मित्राची भेट झाली नाही हे बरंच झालं. ती स्त्री-अशी परकी आहे हे पण चांगलंच म्हणायचं. असं दूर, कॉलनीतल्या स्वच्छ वातावरणात, रिकाम्या, निवांत जागी, दोन अडीच तास त्याच्या संगतीत घालवायचे ही कल्पना घोळवीत ती परत टवटवी आणू लागली.

मागिल्या आळीतील एक बैठ्या, चाळीवजा बंगल्याशी दोघं आलो. तिचा हात सोडून तो एका बिऱ्हाडाच्या दाराशी गेला. किलकिलं दार वाजवीत म्हणाला, "मावशी—"

वयस्क, अंगाने सुटलेली, तोंडात विडा कोंबलेली स्त्री दारात आली. हसून म्हणाली, "या—या—"

तो पुढे व्हायच्याऐवजी मागे वळून तिला म्हणाला, "ये लवकर—"

दोघं आत शिरले व दाराजवळच्या खुर्च्यांवर बसले. मावशी शाल घेत, वहाणा घालीत म्हणाल्या, "आरामात बसा. तुमचंच घरं आहे. समजा. . .आत बेडरुम आहे, पंखा आहे, पाणी आहे—मी जाते—रात्री सातला येईन—मजा करा—" विडा चघळीत, विचित्र हसत ती लगबगीने, आपल्या मागे दार ओढून घेत, बाहेर पडली.

लावलेलं दार, स्वतंत्र निवांत जागा, सुसज्ज बेडरुम—दोघं न बोलता जागच्या जागी एकमेकाकडे पाहात क्षणकाल बसून राहिले.

अखेर तो उठला किलकिलं दार करून बाहेर पहात म्हणाला, "बाई कशी पहात होती, बोलत होती!—पण जागा तर छान आहे. तुला आवडेल अशी. कुणी बघणार नाही, बोलणार नाही—"

तिने न बोलता बिऱ्हाडाभर नजर फिरवली. खरंच किती स्वच्छ, सुबक जागा होती. नटवलेली, निवान्त!—असंच आपलं घरकूल करायचं. अन् ते होईपर्यंत इथेच यायचं. असेल बाई विचित्र—पण आहे म्हातारी. दूर, एकटी राहाणारी. अन् रस्त्यावरच्या गलिच्छ नजरा नि बाजारी जागा ह्यापेक्षा इथे किती एकान्त आहे. . . .

त्याने दार लावलं तेव्हा तिने डोळे मिटून घेतले. जवळ येऊन तिला त्याने आलिंगन दिलं तेव्हा तर ती सारंच विसरली.

बेहोष अवस्थेत एकमेकाना बिलगून दोघं आतल्या खोलीत आली. पडदे लावलेली ऊबदार खोली. पांढरी शुभ्र चादर घातलेला पलंग, भिंतीला मोठा आरसा, टेबलावर राधाकृष्णाची मूर्ति — त्याची मिठी घट्ट झाली. सुखातिशयाने तिने अस्पष्टसा उद्‌गार काढला. किती दिवस वाट पाहिली. किती रात्री तळमळत काढल्या. कुठे कुठे वणवण केली. आता काही क्षण तरी कसला अडथळा नाही. आता मनातलं मोकळं करता येईल. शरीरं जवळ येतील——

बाजूच्या कोचावर बसून खूप बोलायचं, हसाय रडायचं—अन् मग पलंगावर विसावायचं, असं मनोमन योजून दोघं उंबऱ्याजवळून हालले. पण तेवढ्यात भिंतीपलीकडून, शेजारच्या बिऱ्हाडात कुणी कुणाशी बोलल्याचा भास झाला. ती दचकून दूर झाली व तो भिंतीला टेकला.

'. . .त्या येरडीने कुणी नवी पोरगी गटवलेली दिसत्येय. नक्की खाजगी धंदा करणारी तरुणी आहे ही— अन् तो इसमहि पक्का दिसतोय. हे असे लोकच अनाचार वाढवतात—त्या वेश्येचा धंदा जोरात चाललाय बाकी—नव्या बाया, नवी गिऱ्हाईकं—"

तापलेल्या तेलासारखे ते शब्द त्याच्या काळजात ठिपकले. जे ऐकले त्याने तिचं शरीर थंडगार पडलं. दोघं भेदरून एकमेकांजवळ आले, न बोलता—न विलगता समोरासमोर उभे राहिले.

आणिक काही ऐकू आलं नाही. सगळीकडे शांत होतं. खोली बंद होती. राधाकृष्णाची मूर्ति भिंतीवरच्या आरशात दिसत होती. पलंगावरच्या चादरीला चुण्या पडल्या होत्या. एकाएकी तो जागचा हालला. बाहेरच्या खोलीत आला. बॅग उचलून, चपला घालून, घोगऱ्या आवाजात म्हणाला, 'चल इथून...'

काळीज कालवंडलं होतं. पायतलं बळ गळालं होतं. पण त्याच्या रुक्ष स्वराने व तिरीमिरी वागण्याने तिला धीर आला. मान खाली घालून ती मागोमाग निघाली.

घर बंद करून, मागील आळी ओलांडून दोघं कॉलनीबाहेर निघाले. एकमेकांशी न बोलता, कुठेच न पाहता. कमानदार मांजर व जीभ काढणारा कुत्रा, झोके घेणाऱ्या साडीतल्या मुली व ब्हॉनिशचा वास —काही जाणवत नव्हतं. आमराईतली डहाळी, कालव्यातल्या सावल्या, कॅफेतलं सरबत—काही आठवत नव्हतं. सारं सरलं होतं. वेगळंच, उथळ नि थिल्लर घडलं होतं. चोरटं, उष्टं! तिने आपल्या प्रीतीला धीर गंभीर स्वरुप द्यायचा यत्न केला, भेटींना श्रद्धेचं बळ आणू पाहिलं—पण तिला बाजारबसवीची कळा आली. प्रेमाला पापाचं अस्तर लागलं—

दीड एक महिन्याच्या विरहानंतर भेटीतला दीड एक तास ती दोघं नुसतं चालत होती, स्वतःच्या सावल्या तुडवीत मूकपणे, निर्मनुष्य रस्त्याने जात होती.








# सतत
# २९ वर्षे
## आपल्या सेवेंत !




**मे. एच्. साळवे, कदम आणि कं.**
**निपाणी (जि. बेळगांव)**






अनुक्रमणिका



**रडवेली होत ती म्हणाली,**
**हे कसलं आयुष्य**
**माझ्या नशिबी आलं!**
**तिकडे त्याच्याशी मी**
**एकनिष्ठ नाही. इकडे तुला**
**धडपणे सुखही**
**देऊ शकत नाही....**
**संसार करते त्याचा पण**
**मनात असतोस तू....**




—अच्युत बर्वे

आज तरी ती ऑफीसला येईल असे मला वाटत होते. वास्तविक गेल्या सोमवारीच ती कामावर रुजू व्हावयास हवी होती. आज येईल, उद्या येईल अशी मी वाट पहात होतो. पण तिचा पत्ता नव्हता. पंधरा दिवसांच्या बोलीने रजेवर गेलेली दुर्गा तीन आठवडे उलटून गेले तरी अजून परतली नव्हती. 'हा सोमवार जाऊन त्याच्या पुढच्या सोमवारी मी ऑफीसमध्ये ठेवलेली आहे' हे निरोपाच्या वेळचे तिचे शब्द अजूनही माझ्या कानात रेंगाळत होते. बोलल्याप्रमाणे ती येईल ह्याविषयी माझी खात्री होती. पण माझा अंदाज चुकला. काय झाले असावे ते माझ्या लक्षात येईना. तिने रजा वाढवून घेतली म्हणावे तर तशा आशयाची चिठ्ठीचपाटीही ऑफीसला आलेली नव्हती. मग काय झाले असावे! मनात शंकाकुशंकांची गर्दी होत होती आणि मी अस्वस्थ होत होतो. एकीकडे तिचा मला राग येत होता आणि दुसरीकडे तिच्या दृष्टीसुखासाठी मी अधीरा होत होतो. वाट पहात होतो आणि निराश होत होतो. आजही असेच झाले. ऑफीस सुरू होऊन अर्धापाऊण तास झाला तरी तिचे टेबल रिकामेच राहिले. काहीशा चिडीनेच मी माझ्या टेबलावरचे कागद पुढे ओढून घेतले आणि त्यात डोके खुपसले. थोडा वेळ काम केले असेन नसेन तोच शेजारच्या सेक्शनमधला रेगे माझ्या नावाने हाक मारीत टेबलाशी येऊन उभा राहिला. घाबऱ्याघुबऱ्या आवाजात सांगू लागला, "उत्तम, फार वाईट बातमी आहे. आताच कळली."

"काय झालं?"

"दुर्गा राजे—" आणि माझ्याकडे पहात तो एकदम गप्प झाला. खुर्चीवरून ताडकन् उठत मी विचारलं, "काय म्हणालास? काय झालं?"

"सांगतो सांगतो. ऐकलं ते सांगतो– खरं खोटं देव जाणे."

"काय असेल ते सांगून टाक लोकर."

"दुर्गा राजेचा नवरा वारला."

"शक्य नाही."

"ऐकलं ते तुझ्या कानावर घातलं."

मी मटकन् खुर्चीवर बसलो. संवेदना बधीर झाल्या. डोक्यात काही शिरे

की काही कळेना. वघीर झालेले देहाचे मुटकुळे खुर्चीवर घेऊन मी तिच्या रिकाम्या खुर्चीकडे आणि आजूबाजूला वेडयासारखा पहात राहिलो. वातमी आता टेवलाटेवला-वरून पुढे सरकत होती. दवल्या आवाजात तर्ककुतर्कांना सुरुवात झाली होती. चोरून चोरून नजरा माझ्याकडे वळत होत्या. हे सगळे असह्य होते. पाय लटपटत होते तरी मी उभा राहिलो. कुणाकडे न पाहता खुर्च्याटेवलांचा आधार घेत सेक्शनवाहेर पडलो. ऑफीसच्या वाहेर आलो आणि भिंतीला टेकून डोळे मिटून स्तब्ध उभा राहिलो. प्रसंगी काय करावे, कसे वागावे काही लक्षात येईना. पण इथे असं सहकाऱ्यांच्या नजरेच्या टप्प्यात उभं राहण्यातही अर्थ नव्हता. भिंतीचा आधार सोडून मी पावले पडतील तसा चालू लागलो. डोके भणभणत होते आणि वेड्यावाकड्या विचारानी मन भेलकांडत होते. ऐकले ते अघटित होते. जवरदस्त धक्का देणारे होते. त्याचा हा असा अचानक शेवट आणि तिची माझी—

तिची माझी संगत वरेच दिवसांची होती. तसं ती ऑफीसला आली त्याच दिवशी तिनं माझं लक्ष वेधून घेतलं होतं. पण त्यावेळी धीटपणा करून ओळख करून घ्यायचं जमलं नाही. फक्त जमेल तसं आणि जमेल तेव्हा मी तिच्याकडे लक्ष टाकीत होतो. मी असा मधून मधून तिच्याकडे पहातो हे तिच्या लक्षात आलं असावं. कारण आमची नजरानजर वरेच वेळा होऊ लागली. चुटपुटके हंसणेही सुरू झाले. हलके हलके पण निश्चितपणे माझी प्रगति होत होती. पण प्रगतीचा हा वेग कमालीचा संथ असावा. मनात अंकुरत होते ते पालवण्यापूर्वीच करपले गेले. तिच्या चिठ्ठीने सगळे संपवून टाकले. इतर सहकाऱ्यांवरोवर मलाही आमंत्रण होते. मन घट्ट करून लग्नाला जायला हरकत नव्हती. पण गेलो नाही. लग्नानंतर ती नेहमीप्रमाणे ऑफीसला येऊ लागली आणि एकदा मी दिसलो तेव्हा तिने सहजपणे विचारले, "लग्नाला कां नाही आला?" तिचा प्रश्न एकून मी गोंधळलो. मला वाटलं होतं की कोण आलं, कोण गेलं हे लग्नसोहळ्यात गुंतलेल्या तिच्या लक्षातही येणार नाही. पण तिने वरोवर लक्षात ठेवलेले दिसत होते. तिची नजर चुकवत मी म्हटलं, "उगाच."

"खोटं."

मी हसलो आणि गप्प राहिलो. पण विचारलेला प्रश्न असाच सोडून द्यायला तिची तयारी नसावी. माझ्याकडे पहात तिने म्हटले, "सांगा ना कां नाही आला".

"ते तुम्ही विचारू नये; मी सांगू नये."

"मग तर मला कळलंच पाहिजे."

तिच्या लग्नाला न जाण्याचे कारण स्पष्टपणे तिला सांगणे उचित नव्हते. त्याचा आता काही फायदाहि नव्हता. त्यामुळे तिच्या प्रश्नाचे उत्तर द्यायला मी टाळाटाळ करीत होतो. पण 'मग तर मला कळलंच पाहिजे' असं म्हणून उत्तराच्या अपेक्षेने ती माझ्याकडे पाहू लागली. उत्तर देण्याशिवाय गत्यंतर नव्हते. तिची नजर टाळून मी म्हटलं, "तुम्ही मला आवडत होता—"

"मग हे आधी कां नाही सांगितलंत?"

मी चमकून तिच्याकडे पाहिलं. तिची नजर एकदम खाली वळली. धीर येऊन मी विचारलं, "सांगितलं असतं तर काय झालं असतं?"

"विचारून तर पहायचं होतं" आणि भावनेच्या भरात नको ते आपण वोलून गेलो हे लक्षात येऊन ती म्हणाली, "वाकी तुम्ही म्हणता ते खरं आहे. आता ह्या गोष्टी वोलण्यात काय अर्थ आहे!" आणि घाईघाईत ती दुसरीकडे निघून गेली. तिने सारवासारव करायचा प्रयत्न केला होता. पण तिच्या स्वराने तिला दगा दिला होता. ज्या गोष्टी वोलण्यात अर्थ नाही असे वाटत होते त्याच गोष्टींना आता अचानक अर्थ प्राप्त झाला होता. जमिनीवर टेकलेल्या फुग्याला फुंकर मारून तो पुन्हा हवेत उडवावा तसे झाले होते. सहज म्हणून ती वोलली असेल पण



सिद्धी व प्रसिद्धी

गजांत लक्ष्मी खेळे अंगी
तरी कुरकुरे हा व्यासंगी
आणिमा, गरिमा, लघिमा सिद्धी
गदिमा जाणे एक प्रसिद्धी

—कोंडवा

तिच्या वोलण्याने माझे मन चाळवले गेले. जे संपले असे मी समजत होतो तिथे अजून हुंकार होता. तिच्या ओठातून वाहेर निसटलेल्या ह्या अनपेक्षित हुंकाराने सगळे वदलून गेले. कुणाला सांगता येणार नाही असे नाजुक नाते ह्या हुंकारापोटी जन्माला आले. मनोमनी मी ते जपू लागलो.

पहाता पहाता हे नाते पालवू लागेल आणि वघता वघता त्याला आकार येईल असे मला वाटत होते. पण ते चुकले. तिच्या-माझ्यामधले हे नाजुक नाते संकोचाच्या दडपणाखाली गुदमरू लागले. अगदी अचानकपणे ती माझ्या वाजूला फिरकेनाशी झाली. तिच्या येण्याजाण्याच्या वाटेवर मी उभा राहिलो तरी मान खाली घालून ती अंगावरून पुढे जाऊ लागली. हे चमत्कारिक होते. जे थांवले होते त्याला तिनेच चालना दिली होती. आणि आता चालू झालेले ती संपवू पहात होती. आलेल्या गतीला खीळ घालून ती मला अगतिक करीत होती. असे वागताना तिने स्वत:पुरते पाहिले होते. पण आता हा तिच्या एकटीचा प्रश्न नव्हता. निदान मला विश्वासात घेऊन ह्यावावतीत तिने माझ्यापाशी वोलावयास तरी हवे होते. तिच्या ह्या अशा तुटक वागण्याने मला किती यातना होत असतील ह्याची तिला कल्पना नसावी. पण आता असा तडफडत वसायला मी तयार नव्हतो.

अनुक्रमणिका

सोक्षमोक्ष लावून टाकावा म्हणून मी तिला गाठली आणि म्हटले, "दुर्गा, मला तुझ्याशी बोलायचं आहे." माझे हे धाडस तिला अनपेक्षित असावे. कावरीबावरी होत तिने विचारले, "काय?"

"माझं काय चुकलं?"

"मी कुठे काय म्हटलं?"

"काही म्हणत नाहीस म्हणूनच विचारतो" तिच्याकडे पहात विचारलं,

"मला का टाळतेस?"

"असा गोंधळात टाकणारा प्रश्न कशाकरता विचारता?"

"इतःपर मी गोंधळात राहू नये म्हणून—"

एवढ्यात आमच्या अंगावरून कुणीतरी निघून गेले. चाहूल लागून ती म्हणाली, "कुणी ऐकेल."

"मग कुणी ऐकणार नाही अशा ठिकाणी जाऊ" आणि मी चालू लागलो. माझ्याबरोबर ती चार पावले आली. पण मग रेंगाळली आणि थबकली. पण मी थांबलो नाही. ऑफीसच्या बाहेर आलो आणि रस्त्यावर येऊन उभा राहिलो. माझ्याविषयी तिला काही वाटत असले तर ती येईल असा माझा अंदाज होता. आणि तो बरोबर ठरला. ती ऑफीसच्या बाहेर आली आणि मी कुठे आहे ते शोधक नजरेने पाहू लागली. मी दिसलो तेव्हा सावधपणे इकडे तिकडे पहात ती माझ्या दिशेने येऊ लागली. आम्ही हॉटेलात येऊन बसलो तेव्हा ती म्हणाली, "भीति वाटते".

"कसली?"

"मी अशी कधी कुणाबरोबर हॉटेलात जात नाही."

"मीही जात नाही."

"तुमची गोष्ट निराळी आहे."

"कशी?"

"तुम्ही पुरुष अहा. शिवाय मोकळे अहा."

"मी मोकळा आहे म्हणून कुणी सांगितलं?"

"म्हणजे!"

"सांगतो" आणि विचारलं, "सांगू?"

"सांगा ना—"

"मीही बांधलेला आहे. तुझ्याचसारखा." आणि एकदम बोलून गेलो,

"तुझ्याशी. दुर्गा, त्या दिवशी तू बोललीस त्या क्षणापासून— " पण मला पुरतं बोलू न देता माझ्या तोंडावर आपला हात ठेवीत ती म्हणाली, "नका ना– नका असं बोलू."

"कां?"

"कसं सांगू!" स्वतःशीच बोलल्याप्रमाणे ती म्हणाली, "त्यांचं माझ्यावर किती प्रेम आहे! किती चांगले आहेत ते!" आणि एकदम भानावर आल्याप्रमाणे माझ्याकडे वळून ती म्हणाली, "त्या दिवशी तुम्ही दिसलात आणि नको ते मी बोलून गेले. विसरून जा ते."

"कसं शक्य आहे?"

"कां नाही?" प्रश्नाला उत्तर नसते त्या वेळेला प्रश्नाला प्रतिप्रश्न तरी येतो किंवा विषय बदलायची धडपड सुरू होते. त्याच मार्गाचा अवलंब करीत तिने विचारले, "तुम्ही ह्या सरकारी नोकरीत कशाकरता खितपत राहता?" तिने हा प्रश्न नेमका कशाकरता विचारला असावा ते माझ्या लक्षात येईना. ती विचारीत होती ते अनेक वेळा माझ्याही मनात येऊन गेले होते. त्या दृष्टीने माझे प्रयत्नही चालू होते. पण त्या दिवशी ती ते बोलली आणि अचानकपणे सगळे बदलून गेले. तिच्या सहवासाला मुकून महत्वाकांक्षेच्या मागे लागायला मी आता तयार नव्हतो. हे सगळे तिला सांगावे असे मनात आले. पण त्यामुळे आणखी बिनसायला नको असा विचार करून मी विचारले, "मला दुसरीकडे कोण नोकरी देणार?"

"कुणीही देईल. तुमच्या सारख्या उमद्या पुरुषाला कुणीही नोकरी देईल." तिचे बोलणे ऐकून मला एकदम हसू आले.

"हसायला काय झालं?"

"सांगतो." आणि म्हटलं, "उमदेपणावर पोरगी मिळते, नोकरी नव्हे. आणि काहीजणाना हवी ती मुलगीही मिळत नाही". माझ्या बोलण्याचा आशय तिच्या लक्षात आला असावा. पण तिने तिकडे लक्ष दिले नाही. उपदेश केल्याप्रमाणे म्हटले, "माझं ऐका–तुम्ही एखादी चांगली नोकरी शोधा."

"कशाकरता?"

"म्हणजे मी दृष्टीआड होईन–"

"आणि तुझ्या दृष्टीसुखासाठी मी तडफडत राहीन."

"अं!" ती एकदम गोंधळली. पर्याय सुचवताना तो असा उलटेल ह्याची तिला








कल्पना नसावी.• स्वत:ला सावरून घेत ती म्हणाली,

"मग तुम्ही एखादी चांगली मुलगी बघा आणि तिच्याशी लग्न करा."

"म्हणजे काय होईल?"

"मला विसरून जाल. तिच्या सह-वासात माझी आठवणही होणार नाही." अगदी सहजपणे बोलल्याचा आव आणून ती हे मला सांगत होती. पण हे सांगताना तिला होणाऱ्या यातना तिच्या चेहऱ्यावर मला दिसत होत्या. तिच्या डोळ्यांत पहात मी विचारलं, "दुर्गा, लग्न झाल्यावर असं विसरता येतं?" पण माझ्या प्रश्नाचं उत्तर न देता ती पुढ्यातल्या टेबलावर पाण्याने रेघोट्या ओढीत राहिली. तिला बोलती करावी म्हणून मी म्हटलं, "सांग ना—"

"किती अडचणीत टाकणारे प्रश्न विचारता!" माझ्याकडे बघून ती केविल-वाणे हंसली आणि म्हणाली, "निदान तसा प्रयत्न तरी करायला हवा."

"कशाकरता?"

"ते तुमचं लग्न झालं की तुम्हाला कळेल."

"मग एव्हाना ते मला कळायला हवं, होतं."

"म्हणजे!" आणि माझ्या बोलण्याचा आशय लक्षात येऊन घाईघाईत ती म्हणाली, "नको नको. असं बोलू नका. अशी मला गुरफटवू नका. अशी बांधू नका. स्वत:ला असे बांधून घेऊ नका. नका ना—"

"जशी तुझी मर्जी."

"रागावलात?"

"त्याचं तुला काय?"

"रडवेली होत ती म्हणाली कां असं लागट बोलता! कां अशी दुखवता!" तिच्या डोळ्यात पाणी बघून मी एकदम गहिंवरलो. तिचा हात हातात घेत मी म्हटलं, "दुर्गा, कां अशी छळतेस! कां अशी दुराव्याने वागतेस!" आणि अगदी नकळतपणे आमच्या हाताची बोटे एक-मेकात गुंफली गेली.

तिच्या-माझ्यामधले हे नाजुक रहस्य जपणे मोठे कठीण काम होते. खिशात जाईजुईसारखे नाजुक फूल ठेवावे पण ते चुरगळू नये म्हणून वारंवार जपावे एव-ढेच नव्हे तर फुलाच्या सुगंधाची चाहूल इतराना लागू नये म्हणून पराकाष्ठा करावी तसे हे होते. हे अवघड होते. पण ते करणे आवश्यक होते. तसे मुळी तिचे आणि माझे ठरलेच होते. तिचे आणि माझे संबंध नक्की झाले आणि हे ओघा-नेच आले. मर्यादांची आम्हाला जाणीव होती आणि मर्यादेचा परीघ ओलांडायचा नाही असे न बोलताच आम्ही ठरवून टाकले होते. ती बांधलेली होती आणि मी मोकळा होतो; पण त्यामुळेच ह्या मर्यादांचे काटेकोरपणे पालन करणे हे माझे काम होते. ते कठीण होते. अवघड होते. फार कठीण होते. फार अवघड होते. ती माझी होती आणि माझी नव्हतीही.

(पान १९५ वर पहा)



अनुक्रमणिका




—प्रा. मधुकर वासुदेव धोंड

लावणी ही संज्ञा एवढ्या व्यापक—की भोंगळ—अर्थाने योजिली जाते की, तिच्यात विविध प्रकारची रचना समाविष्ट होते. सर्वसाधारणपणे शाहीर या नावाने ओळखल्या जाणाऱ्या कवनकारांनी पोवाडे सोडून इतर जी जी रचना केली ती सर्वच लावणी या ऐसपैस नावाने ओळखली जाते. राम जोशी, अनंतफंदी इत्यादी तमासगिराप्रमाणेच कीर्तनकारही असल्यामुळे त्यानी देवतांच्या स्तुतिपर व उपदेशपर रचना केली आहे. प्रशराम हा वारकरी होता. "अभंग झाले आहेत, आता लावण्या पोवाडे करावेत," असा स्वप्नात दृष्टान्त झाल्यामुळे तो शाहिरीकडे वळला. त्यामुळे त्याच्या रचनेवर संतांच्या, विशेषतः तुकारामाच्या, काव्याची छाया पडलेली आहे. शाहिरांनी तत्कालीन इतर कवींप्रमाणे पौराणिक कथा, धावे, तीर्थक्षेत्रवर्णने, स्तोत्रे, भूपाळ्या, कृष्णलीला यासारख्या विषयांवरही रचना केलेली आहे. त्या काळी स्त्री-गीत म्हणूनही एक विशेष काव्यप्रकार होता. त्यात गर्भवतीचे डोहाळे, गरोदर स्त्रीच्या जीवनात दर महिन्यास होणारी शारीरिक व मानसिक स्थित्यंतरे, न्हाणुलीचे कौतुक, निपुत्रिकेची दुःखे, सवतीची भांडणे इत्यादी विषय असत. शाहिरांनी तसलीही रचना केलेली आहे. पोवाडे रचणाऱ्या शाहिरांनी पोवाड्यांबरोबरच दुष्काळ, दंगे, राजक्रांतीसारख्या तत्कालीन कुतूहलाच्या विषयांवरही कवने रचलेली आहेत. भेदिक लावणीकारांनी अध्यात्मातील व पौराणिक कथातील कूटांवर लावण्या केलेल्या आहेत; त्याच प्रमाणे या कूटांना प्रणयाचा साजशृंगार चढवून वरवर शृंगारिक वाटणारी रचनाही केलेली आहे. तमाशात म्हटली जाणारी कवनेही एकाच प्रकारची नसतात. सुरुवातीचे गण, नंतरची गौळण व त्यानंतरची लावणी ही कवने विषय, आशय, गाण्याचा ढंग वगैरे सर्वच बाबतीत वेगळी असतात. तमाशातील वगात मथला कथाभाग सांगणारी वगाची लावणी किंवा टाकण ही तर या सर्वांहून वेगळीच असते. या सर्वांना लावणी ही अस्ताव्यस्त संज्ञा दिलेली असली, तरी या सर्वांचीच उत्पत्ती व परंपरा एकच असणे शक्य नाही. लावणीची उत्पत्ती व परंपरा शोधायची असेल, तर या विविध प्रकारच्या कवनांच्या गुंतावळीतून एकाचाच धागा हाती धरून तो सोडवण्याचा प्रयत्न केला पाहिजे. अशा प्रयत्नांतूनच हा सगळा गुंता संपूर्ण उलगडण्याचा संभव आहे. आपण ज्या लावणीची परंपरा पाहणार आहोत, ती तमाशात नृत्याभिनयासह सादर केली जाणारी किंवा बैठकीत गायिकेकडून आदा करून लावणीच्या ढंगात गायिली जाणारी शृंगारिक रचना. याहून अन्य प्रकारची जी रचना त्याची परंपरा अन्यत्र शोधली पाहिजे.

## लावणी आणि नृत्याभिनयाची जोड

तमाशातील लावणी व बैठकीतील लावणी यात आज जेवढे अंतर दिसते तेवढे पूर्वीच्या काळी नसावे. तेव्हा बैठकीतील लावणी

तमाशातील लावणीप्रमाणेच नृत्याभिनयासह गायिली जात असली पाहिजे. पन्नास पाउणशे वर्षांखाली बैठकीतही गायिका ख्याल-ठुमऱ्या उभ्यानेच गात असत आणि गाताना पायात चाळ बांधून काहीशा नाचतही असत. 'गीतं वाद्यं तथा नृत्यं त्रयं सङ्गीतसंज्ञकम' या संगीताच्या व्याख्येवरून पूर्वीच्या काळी संगीतात वाद्याच्या साथी एवढेच नृत्यही आवश्यक मानले जात असे हे स्पष्ट आहे. या नृत्यात हावभावाचाही समावेश होत असे, हे सङ्गीतशास्त्रात नृत्त व नृत्य यात जो भेद मानला आहे, त्यावरून स्पष्ट होते. नृत्त म्हणजे शुद्ध नाच. 'रसभावविहीनं तु नृत्तमित्यभिधीयते.' नृत्य म्हणजे हावभावयुक्त नाच. 'रसभावव्यंजकादियुतं नृत्यमितीर्यते.' बैठकीतील लावणी ही तमाशातील लावणीप्रमाणेच नृत्याभिनयाच्या साथीसहच गायिली जात असली, तरी तमाशातील रंगत व बैठकीतील रंगत सारखीच नसणार. तमाशातील कड्यां ढोलकीची साथ, सोंगाड्याशी संवाद, झीलकऱ्यानी उंच नेलेला सूर वगैरे रंग बैठकीत नसणार. पण त्यांची उणीव दुसऱ्या गोष्टींनी भरून निघत असावी. बैठकीचा बंदिस्तपणा, थाट, खाजगीपणा आणि तियल्या श्रोत्यांची श्रीमंती यानी तिथे एक वेगळाच रंग जमून येत असावा. याप्रमाणे तमाशातील लावणी व बैठकीतील लावणी यात काहीसा भेद असला तरी गायन, नर्तन व अभिनय ही तिन्ही अंगे या दोन्ही प्रकारात असल्यामुळे, या दोन्ही प्रकारांच्या लावणीची परंपरा एकत्रच शोधणे चुकीचे ठरणार नाही. तेव्हा या प्रकारांच्या लावणीचे दर्शन प्राचीन वाङमयात घडते की काय हे पाहू.

## ज्ञानेश्वरीत असलेले वर्णन

ज्ञानेश्वरीच्या १७ व्या अध्यायात तमाशाचे एक उत्कृष्ट वर्णन आलेले आहे. त्यात तमाशा, लावणी किंवा तत्सम असा अन्य कोणताही शब्द आलेला नसला, तरी ते वर्णन वाचताना आजचा तमाशा ठसठशीतपणे डोळ्यांसमोर उभा राहावा, एवढे ते चित्रदर्शी आहे. हे वर्णन तामस दानाच्या संदर्भात आले आहे. चोरी, वाटमारी, जुगार इत्यादी वाममार्गांनी धन जोडायचे आणि तमाशात दौलतजादा करण्यात उधळायचे, हेही दानच--पण तामस. याचे वर्णन ज्ञानेश्वर पुढीलप्रमाणे करतात--

मग म्लेंच्छांचे वसैठे । दांगाणें ह्रान कैकटें ।
कां सिद्दवीरें चौहटे । मगरिचे तै ।।२९३।।
तिहीं तिहीं ठाइं मीळनी । समो सांजवेळ कां रजनी ।
तेव्हंलि उदारां होणें धनीं । चोरियेचां ।।२९४।।
पात्रें भाट नागारी । सामान्या स्त्रिया जुवारी ।
जियें भूत्तिवंतें भुररी । भूलावेया ।।२९५।।
रूपनृत्याची पुरवणी । तयां पुढें डोलेभारणी ।
गीत भाटीवं श्रवणीं । कर्णजपु ।।२९६।।
तेया ही वरि अलुमालु । घे फूलागंधाचा परिमलु ।
तवं भ्रमाचा तो वेतालु । अवतरे चि ।। २९७ ।।
येयां ऐसेन जें जें देणें । तें तामस दान मी ह्मणें ।।२९८।।

ज्ञानेश्वरकालीन भाषेच्या अज्ञानामुळे या ओव्यांतील अनेक शब्दांचे ज्ञानेश्वरीच्या संपादकानी व कोषकारांनी चुकीचे अर्थ केलेले आहेत. ते शब्द म्हणजे पात्र, नागारी, रूपनृत्य व कर्णजप हे. ज्ञानेश्वरीतील शब्दांच्या अर्थनिश्चितीचा सर्वांत अलीकडील व चिकित्सक प्रयत्न म्हणजे प्रा. वेलिंगकरांचा 'ज्ञानेश्वरीचें शब्दभांडार' हा कोष. त्यात या शब्दांचे अर्थ पुढीलप्रमाणे दिलेले आहेत: पात्र=भूमिका घेणारा; नागारी=गारुडी, सर्प धरणारा; रूपनृत्य=रूप व नृत्य; जप=धार्मिक हेतूने वारंवार उच्चारणे, कर्णजप=नेहमी कानावर येणारे शब्द. परंतु ज्ञानेश्वरकालीन महानुभाव वाङमय, नाट्यशास्त्र व संस्कृत-कोष यांच्या साहाय्याने या शब्दांचे अर्थ पुढीलप्रमाणे निष्पन्न होतात: पात्र=नर्तकी; नागारी=पवाडे गाणारे, रूपनृत्य=नाट्यनृत्य; जप=कुजबुजणे, कर्णजप=कानगोष्ट. या शब्दांचे हे अर्थ प्रस्तुत ओव्यांच्या संदर्भात चपखल जमतात आणि त्यात तमाशाचे पुढीलप्रमाणे दृश्य दिसू लागते:

म्लेंच्छांची वस्ती, रानाजवळील मोकळा माळ, कैकाडी लोकांची वस्ती, शिवीर किंवा शहराचा चव्हाटा यासारख्या ठिकाणी संध्याकाळी किंवा रात्री नर्तकी, भाट, पवाडे गाणारे नागारी, वेश्या, जुगारी यांसारखे भुरळ घालणारे आपले खेळ मांडतात. ते पाहण्याकरिता चोरीमारी करून धन संपादन केलेले लोक गोळा होतात. त्यांच्यासमोर नर्तकी संपादणी बतावणीसह नृत्य करून त्यांना उत्तेजित करतात, डोळे मोडून त्यांना विव्हल करतात, शृंगारिक गीते गाऊन त्यांना पेटवतात, भाट-नागारी त्यांची लटकीच स्तुती करून त्यांना फुगवतात आणि मग त्यांच्यातीलच एखादी नर्तकी वा वेश्या एखाद्या उल्लू श्रोत्याच्या जवळ येऊन त्याच्या कानात कुजबुजते. कानात कुजबुजते वेळी तिचे डोके त्याच्या नाकाजवळ आल्यामुळे तिच्या केसांतील फुलांचाच नव्हे तर तिच्या केसांचा व अंगाचाही वास त्याच्या मस्तकात शिरतो आणि त्याच्या मनात मोहाचा वेताळ संचारतो. तो तत्काळ आपल्या कमरेचा कसा सोडून लोकांना नाडून मिळविलेली सर्व संपत्ती तिच्यावरून ओवाळून टाकतो. असे हे तामसदान.

कर्णजप याचा चुकीचा अर्थ केल्यामुळे या वर्णनातील एक अर्थपूर्ण तपशील ज्ञानेश्वरीच्या संपादकांच्या दृष्टीतून निसटला आहे. यातील २९६--९७ ओव्यांच्या सांप्रदायिकांच्या साखरे प्रतीत अर्थ दिला आहे, तो असा: "अशा लोकानी त्यांच्या पुढे नृत्यगायन केल्यावर अथवा भाट लोकांनी स्तुति केलेली ऐकल्यावर तीच त्यांच्या कानात नेहमी गुणगुणत असतात. त्याहीनंतर जेव्हा पुष्पे अगर सुगंधी द्रव्ये यांचा सुवास घेतात, तेव्हा तल्लीन होऊन केवळ भ्रमाचे मूर्तिमंत वेताळ बनतात."

गाणे ऐकता ऐकता श्रोता फुलांचा वास घेतो आणि त्याच्या मनात मोहाचा वेताळ संचारतो, यातील फुलांचा वास घेणे व मोहाचा वेताळ संचारणे यांचा कार्यकारणसंबंध तितकासा स्पष्ट नाही. परंतु कर्णजप याचा कानातील कुजबुज असा अर्थ घेतला की, तो

(पान २०१ वर पहा)










दीपावली
१९६७

मुग्ध होय चंद्रमा, चित्त धुंद सांवळी
कृष्णकमल प्रेमिका, घेऊनी पातली







अनुक्रमणिका




—वामन चोरधडे

*" एकाचे दोन, दोनाचे चार, चारांतून चार असं काही तरी होत असतं. मला कळत नाही फारसं त्यातलं पण त्यातले सगळे काढून दोनच उरवावयाचे म्हणजे—जा गडे."*

सईचा हात हळूच असा माझ्या हातावर टेकला. तिच्या बोटांची, स्निग्ध तळव्याची ऊब जाणवली मला. काहीतरी आठवल्यासारखा, निजले–झोपलेले जागे झाल्यासारखा मी भानावर आलो. सावरल्यागत मी तिच्याकडे पाहिले.

तिच्या डोळ्यात ओल होती, सुखाची आस पाणावली होती. कित्येक वर्षात हे असे कधी तिने माझ्याकडे बघितलेच नव्हते. मागे फार मागे, कधीतरी असे ती बघायची; पण ते अंधारात, सारीकडं निजानीज झाल्यानंतर; मुलां-लेकरांच्या अंगावर पांघरूण घातल्यानंतर, डोळ्यांवर येणारे त्यांचे झोपलेले केस बाजूला सारल्यानंतर, सगळीकडे बघून स्थिरस्थावर झाल्यानंतर. त्यावेळी तिचे डोळे दिसत नव्हते, पण त्यातली आस काजव्यासारखी चमकायची अन् अशीच ऊब जाणवायची !

पण गेली पांच-दहा वर्षे या असल्या बघण्यातला अर्थ आमच्या गांवी नव्हता. ना माझ्या ना तिच्या. या अर्थाची गरज पडेल असे वाटेनासे होत आले होते. मोलाची वस्तू वाऱ्या-उन्हापासून जपायला रेशमाच्या बासनात गुंडाळून ठेवावी तसा तो अर्थ उगीच आपला जपायचा !

मी सईकडे चमकून पाहिले. या उघड्यावर, दुपारच्या गार वाऱ्यात, एकमेकांकडे असे पाहूनं घ्यायचे—

"असं कां बघता माझ्याकडे ?"

"तू बघतेस म्हणून ! सई, जरा मला एक चिमटा काढून बघ ग !"

"चिमटा तुम्ही काढायचे पूर्वी."

"आत्ता जर तुला चिमटा काढला, तर तोल जाईल दोघांचा, आणि ही समोर बघ या कड्याच्या खाली अथांग दरी..."

"आजवर गेला नाही तोल आणि आत्ताच जाईल की, नुसती सबब ?"

सबब ! उगीच कुठेतरी चरचरल्यासारखे जाणवले. अशी जाण झाली की—छे ! ती होऊ देता नये. कित्येक वर्षांनंतर त्या रेशमी वस्त्राची गाठ सोडून त्यातला तो अर्थ शोधण्याचा क्षण !

या क्षणासाठी केवढी धडपड करावी लागली, हे माझे मला माहीत, तिचे तिला माहीत ! तिला मुलां-लेकरातून, नोकराचाकरातून, लेक-नातवातून, कासव अंग चोरतो, तसे आवरून घ्यावे लागले. स्वतःला आणि मला मिळेल तसा, वांचेल तसा पै-पैसा ट्रंकेच्या तळात दडवून ठेवावा लागला. गेल्या पंचवीस वर्षांच्या संसारात सईने कधी स्वतःच्या सुखाचा शब्द काढला नाही. उलट सगळ्या संसारासाठी ती मुखाने राबली—इतक्या सुखाने की ते सुख मला दुखवायचे !

तळातली मासळी वर यावी आणि किरणांची तिरीप पडून तिच्या पोटाची चांदी क्षणभर लखलखावी तशी, अगदी सहज, कधीतरी सई नातवाला घास भरवताना मुलांना विचारायची—

"बाबी, अनंता, हे काश्मीर कुठं आहे रे ? तिथं उन्हाळ्यातही हिरवंगार वाटतं का रे ?—अन् का हो, विमानात बसलं की भीति वाटत असेल नाही ? अन् थंडी पण वाजत असेल—अन् का ग माले, पहिल्या वर्गाच्या प्रवासाला खूप म्हणजे किती भाडं पडतं ग ?"

असे ती काही बोलली की माझे मीपण हबकून जायचे ! ओशाळल्यागत दोन दोन तीन-तीन दिवस तिच्याकडे बघायचे देखील मी टाळायचा. माझी लाचारी लक्तरासारखी उघडी पडायची आणि तरीही उसनं अवसान आणून, ज्यांना ती प्रश्न विचारायची त्यांना बाद करून, असाच तिचा हात हातात घेत तिच्याशी मी बोलायचा,

"सई, प्रवास करावासा वाटतो नाही ? थोडा धीर धर. माझ्यावर विश्वास ठेव. वाटतं ग, फार वाटतं.... असं वाटतं की ही ढगाची पालवी आपल्या हातानं बाजूला करावी, तारकांची फुलं अलगद खुडावी नि त्यांची वेणी करून तुझ्या केसात माळावी. तरी सई, मला वाटतच राहील की मी तुझ्यासाठी काही करीत नाही, काही केलंच नाही. पण तू माझी म्हणून सांगतो, गेले ते दिवस जाऊ दे. हा आत्ताचा दिवस मनावर घेऊ नकोस. पण आजे आज करताना असाच एक उद्या येणार आहे, सई आणि तसा तो आला की तो गारवा, ती रिमझिम, ती सळसळ, असा तुला उचलून घेईन. जमिनीवर पाऊल टेकू द्यायचा नाही तुला."

"माझं काश्मीर, माझं विमान, माझी गंगा, माझा काशी-विश्वेश्वर सारंच तर इथं-आहे."

आणि मग शब्दांवाचून अर्थ गवसायचा. मृगाची पहिली सर ओंजळीत सुगंध घेऊन तोल सावरीत उभी असल्यागत कसे खूप खूप छान वाटायचे. आसमंत वितळतो आहे आणि त्याच्या पल्याड कुठेतरी अशा दोन प्रकाशरेखा—

अनुक्रमणिका



माझ्या घामाने, प्रेमाने, जबाबदारीने शेवटी असा एक लहानसा 'उद्या' मी मुठीत धरून आणला आणि ती मूठ सईसमोर उघडी केली. मोठ्या मोठ्या डोळ्यांनी ती उघडी मूठ तिने न्याहाळली. आजुबाजूला कोणी नव्हते.

"सई! हे हजार रुपये, अगदी तुझे–तुझ्या मालकीचे, याला कुणाची दीठ लागलेली नाही. याहून अधिक असायला हवे, पण एवढ्यानं सुद्धा आपल्या आशा-आकांक्षांचा एखाद दुसरा पेढा खाता येईल. अर्धा तुला आणि अर्धा मला–तू माझी म्हणून,–मी तुझा म्हणून! एकच हुकलं नाही ग!"

"काय?"

"आपल्या लग्नाचा सव्वीसावा वाढ-दिवस, केव्हा म्हणालीस तू?"

"पुढच्या आठवड्यात."

"ही जी मूठ आहे ना, ती दहा वर्षांपूर्वी भरली असती–"

"तरी काही झालं नसतं. ती रिकामी झाली असती कूळ–कुळाचारात. कितीही म्हटलं की आपण दोघेच, पण तुम्हाला माहिती आहे, एकाचे दोन, दोनाचे चार, चारातून चार. असं काही तरी होत असतं. मला कळत नाही फारसं, पण त्यातले सगळे काढून दोनच उरवायचे म्हणजे– जा गडे!"

हा तिचा उद्गार जरा-मरण्याच्या पलिकडचा होता!

"सयडे!"–

"किती दिवस झाले या गोष्टीला."

"पण तुझी ती बेरीज-वजाबाकी राहू दे. या गुंत्यातून थोडं मोकळं व्हायचं आणि हे पैसे तू तुझ्यासाठी खर्च करायचे. गारवा, विमान, आणि ते ग, 'गाडी आली गाडी' आली."

"अन् पुढं काय?"

"पुढं काही नाही. त्याच्यापुढं तुम्ही मला आजवर कधी म्हणू दिलंच नाही."

"म्हणून तर आज सांगतोय. पण माझ्या तीन अटी आहेत."

"इकडं म्हणायचं तू आणि तुझं आणि ह्या अटी कसल्या?"

"यातली एक कवडी वांचवायची नाही, यातून एक वस्तू घ्यायची नाही. घ्यायची जबाबदारी माझी. मला आपलं तैनातीला म्हणून तू न्यायचंस."

सईने अटी मान्य केल्या. त्या हजार कवड्यांतून सुखाचे सोने अंगावर घ्यायला सईने सुद्धा पदर खोचला. संसार झेलतां-पेलता लवलेले अंग जरा ताठ केले. आळस झटकून सावरल्यागत तिने मनाचा, तनाचा तोल घेतला. विमान खाली उतरले तरी तिचे कान दुखले, झिणझिणले नाहीत. पन्नाशीला आलेले पाय महाबळेश्वराच्या चढणीला भ्याले नाहीत. उलट आलीशान हॉटेलात विसाव्याला आल्यावर तीच मला विचारायची,

"थकायला झालं असेल! सवय नाही. पडा आता निवांत."

"थकवा तर वाटतो गडे! आणि तुला ग?"

"थांबा जरा. एवढे हे पडदे नीट करते."

तोवर मला थकून गाढ झोप लागायची. शिवाय दुसऱ्या दिवशी तिला प्रतापगड दाखवायचा आहे; हत्तीचा मुळका दाखवायचा आहे; अजस्र उंटाच्या पाठीवर उभं राहून त्या दरीत डोकवायचं आहे. ढगांची पाठशिवण दाखवायची आहे. सांजवेळेचा सूर्य परवानगी मागायला आला तर त्याला सख्या सोबत्यासारखा निरोप द्यायचा आहे. त्यासाठी तनाची ताकद, मनाची उमेद–म्हणून तर झोपायचं!

सकाळी कांबळीच्या आत जाणवायची ऊब, तिची, तिच्या गात्रांची!










अनुक्रमणिका



### झपताल (रामाचा)

एक वेताल चित्र •

गजर लावून पहाट उठते. . . तेव्हापासून घसाघसा घासत असतोस
. . . खरखरणाऱ्या नळांमधून दोन धारा झरू लागतात;
आणि मग साठवलेल्या राखमुठीतून तुझ्या भांड्यावर
चमक चढते. दिवसभर घासत असतोस. तुझ्या स्पर्शाने
म्हातारा बंब पुन्हा एकदा पेटतो. आणि नंतर
उगवता सूर्य वोरीवरील सात पातळे वाळवू लागतो;
म्हणून तू तिला हवा असतोस. मधून मधून तुझ्या कामांमध्ये
माझी कामे उंदरासारखी खुडवुडतात; वायसायवांचा
बोका दावून तू त्याना पळवून लावतोस. तरी पण
वायसायबांच्या 'ब्रेकफास्ट'मधील उरलेला कप मलाहि मिळतो.
तू घरभर 'झटकत' असतोस; लहान-मोठ्या वस्तूंना,
तुझे हात 'साफ' करतात... स्वागतांसाठी 'रिसेप्शनिस्ट' असतोस;
वाढताना 'वेटर' असतोस; भरवताना 'आया' असतोस;
संसारातला 'राम' असतोस; तिला मात्र 'आराम' असतोस.
. . . संसाराच्या घरकामात दिवसाचे चोवीस तास
'रामा'ला राबविणारी तिची किमया मला पुरती उमगली आहे.

—ह. शि. खरात

पण त्यावेळी प्रकाश असा खिडकीतून झोकवायचा. सुटल्यासारखे वाटायचे ! खंतही वाटायची. पण उगीच आपले अवसान आणून——

"काल मला खरंच झोप लागली, नाही ग ?"

याचा अर्थ उभयतांना समजायचा. रुतायचा, खुपायचा !

सई उगीच मला उमेद वाटावी म्हणून थोपटायची—

"मला पण कधी झोप लागली कळलं नाही हो !"

पण या खुपण्या-रुतण्यात उभयतांची सामिली असल्यामुळे एकमेकांकडे बघता येत होते आणि एक क्षण दोन क्षणानंतर नजरा खाली जमिनीला टेकवता येत होत्या. म्हणून तर—

म्हणून तर भर दुपारी त्या हत्तीच्या सुळक्यावर उभयता एका शिळेवर अवघडून, चिकटून, तोल सांभाळीत वसली असताना वाहेरचा विशाल, विस्तीर्ण आसमंत आपल्यात सामावीत, सईने जेव्हा माझ्या हातावर हात ठेवला तेव्हा त्या स्पर्शात ऊब होती. धग नाही, धुगधुगी होती, आंस होती, याचना होती. आणि माझ्यावद्दल मला दिसू नये म्हणून लपविलेली कीव होती.

तो तिचा हात मी जेव्हा असा हाती घेऊन कुरवाळला आणि तिच्याकडे बघितले, त्या बघण्यात उमेद होती, दिलासा होता. प्रत्यंचा ओढली तर टणत्कार होईल.

"उठू या का ? मला किनई जरा थकवा आल्यागत वाटतंय्."

सईची ही युक्ति गेल्या पंचवीस वर्षांपासून मला ठाऊक होती. पूर्वी फुलझडीचा विस्तव फुलोऱ्याला येत असे. अजून देखील सईच्या त्या वाक्याची ठिणगी..

सईच्या थकव्याची कदर करीत, आधार देत देत तिला मी निवासात घेऊन आलो. मोटारचे भाडे सवाईने चुकते केले. हॉटेलच्या पोऱ्याला खोलीत ताटे आणायला सांगितली. जेवण झाले. गरम दुधाचे पेले ओठांना लागले. चटका वसलेली जीभ सईने स्वतःच्याच ओठावरून फिरवली.

ही दुसरी ठिणगी ! ती दारा-खिडक्यांतून वाहेर जाऊ नये म्हणून पडदे नीट केले. कड्या कोयंडे जिथल्या तिथे नीट चिटकविले. वाहेर जे होते ते वाहेरच राहिले आणि आत होते ते . . . मी अन् सई ! ती माझी वाट वघत होती नि मी तिची !

तिचे कष्टलेले, शिणलेले, सुरकुतलेले वाहू चाफ्याच्या माळेगत माझ्याभोवती आले.

'झोप सयड्या तू. खूप थकलास ना?"

"ऊं ऽऽ."

या एवढ्या एका उद्गारातून पिंड, ब्रह्मांड 'एकोऽहं वहुस्याम्' हेच काय, याहून किती तरी अधिक, असंख्य, अमाप निघाले आहे.

"सई ! आत्ता या 'ऊं'ला अर्थ राहिला नाही ग !"

"असं होणं शक्य नाही. मी सांगते तुम्ही पण ऐका, पण ऐकताच कशाला ? असा एक पूर्वीसारखा—खूप वर्षांपूर्वीसारखा एक चिमटा काढा मला." नाही ग, आता काही नाही. उगीच आपलं आणि मग तू म्हणशील—आणि तुझ्या देखत खाली बघायची पाळी ! —

"वेडा की काय !"

आणि पंचवीस वर्षं संसार पेरता फुलविता सरावलेल्या सईने काय केले कळले नाही.

पण असे ढग भरून आले, गडगडगडगड गरजले, विजांच्या फुलझड्या तडतडल्या. पावसाच्या धारा पांघरुणाचा छेद करीत करीत आत घुसल्या.

आडोसा शोधता शोधता निरुपाय होऊन आम्हा उभयतांचे अंग अंग भिजून निघाले !

सतत जलधारा ! सई आणि मी. मी अन् सई !

पण बेरीज नव्हे, वजावाकी ! ढग बरसताहेत... फुलझड्या. . उधळी मूठ. . हा मी, ही सई !, हा नाही, ही नाही. मी अन् सई ! ! ❦


















अनुक्रमणिका



# साहबदिल

--चित्रकार द. ग. गोडसे

माळव्यातील प्रसिद्ध मांडवगडचा उध्वस्त परिसर आम्ही दिवसभर तुडवीत फिरत होतो.

विंध्याचलातल्या भिल्ल आदिवासीनी गायिलेला 'मांडू', माळवी लोककथांतील 'मांडव', मालवीय साहित्यातील 'मांडवगड', संस्कृत वाङ्मयातील मंडपदुर्ग, मंडपाचल, मंडपगिरी, मंडपाद्रि, मंडपशैल आज उध्वस्त आहे. मुसलमानी तवारिखांनी मोठ्या तवियतीनं वर्णन केलेला "शादियावाद" आज उदास आहे; बेचिराग आहे; स्मशानशांत आहे.

आमच्या मराठी शाहीर कवीनी गडाला हत्तीची उपमा दिली आहे. हत्ती आणि गड राजांनीच पाळावेत. असल्या मातबर आसामींची बूज आणि वडदास्त राखणे केवळ राज्यलक्ष्मीलाच शक्य आहे. मांडू, मांडवगड, मंडपाचल म्हणजे माळव्यातील दुर्ग-कुंजर. विंध्याद्रीच्या नील धिप्पाड गजघटांचा गणपती. मध्य भारताच्या सत्ता-मंथनातून निघालेला ऐरावत. अनेकानी त्याकरिता आजपर्यंत झुंजी घेतल्या. त्याचा पाडाव करण्याकरिता कित्येक राजसत्तांनी आपले प्राण पणास लावले. अखेर त्याला ज्यानं अंकुश लावला, त्यानेच माळव्याचं राज्य राखलं, सत्तेचं पाणी चाखलं. मांडवगड म्हणजे मालवराज्य लक्ष्मीचा ऐरावत. तिच्या सामर्थ्याचं प्रतीक. तिच्या विजयी निशाणाचा 'ढालगज'. बिनीचा 'फत्तेह गज.' प्रत्यक्ष हत्तीप्रमाणंच 'साहबदिल'– "ऋषिभि: तुल्या."

या दुर्ग-कुंजराचं समग्र जीवन याचि देही याचि डोळा पहायला प्रत्यक्ष काळाचं आयष्य मिळायला हवं; आणि ते फक्त इतिहासालाच शक्य आहे. त्याच्या संजय दृष्टीनं टिपलेली हकीकत अभ्यासूनच या 'साहबदिल' मांडवगडची गाथा ज्यानं त्यानं आपआपल्यापुरती यथार्थ करावयाची आहे. एरव्ही ऐतिहासिक स्थळांच्या ठिकाणी अकारण गर्दी करणाऱ्या 'वघ्या' धृतराष्ट्रांची संख्या उदंड आहे.

आमचा संजय सांगतो – 'हत्तीचं धीरोदात्त जिणं जगणारा मांडवगड अखेर हत्तीच्याच मरणानं मेला. एकीकडं; वीराणीत; आमरहदारीच्या मार्गापासून दूर; आडवाटेला, वनवासात. एकाद्या भव्यप्रताप हत्तीनं आपलं प्रचंड जीर्ण शरीर जमिनीवर लोटून देऊन प्राण सोडावा आणि त्यानंतर रानातल्या क्षुद्र प्राणीपक्षांनी त्याच्या मृतदेहाचे हवे तसे अधाशी लचके तोडून ते शतशः उघडावं, त्याप्रमाणंच भांडवगड आज उध्वस्त आहे.

अक्षरशः उध्वस्त – जिकडं पहावं तिकडं उध्वस्त, उध्वस्त, उध्वस्त !!!

उध्वस्त प्राचीन मंदिर, छिन्नविच्छिन्न होऊन पडलेल्या असंख्य मूर्ति, उलथून खंडशः पडलेले कोरीव खांब, खिंडार पडलेल्या भितीदरवाजे, पडक्या वीराण मशिदी, ओसाड भग्न राजप्रासाद, उघडे पडलेले रानिवसे, कोरडे ठणाण संगमरवरी हमामखाने, तडा गेलेल्या कबरी, कळस हरवलेले अथवा टक्कल फुटलेले बोडखे घुमट, आणि गेलेला तोल सावरीत कसेबसे उभे रहाण्याचा प्रयत्न करणारे वृद्ध बुरुज आणि केविलवाणे कलते मनोरे...

सारंच जिथं उध्वस्त तिथं नेमकी वाट तरी कोणती शोधावी? पायाना दिसेल ती वाट ... ते नेतील तिकडे आम्ही हिंडत होतो.

निरुंद अवघड दगडी जिने चढून वर गेलो, अंधारी भुयारातून चाचपडलो, कुबट काळोखात दडलेल्या तळघरांचा ठाव घेतला.

काबा आणि बुतखाना!! बुतखाना की काबा? एकाचा काबा तोच दुसऱ्याचा बुतखाना !!! की दोन्ही एकच ??? विचारांच्या तंद्रीत असतानाच माझं लक्ष इमारतीच्या एका भिंतीवर गेलं। तिथं कोणीतरी लिहिलं होतं—**सर्यादा-जयदेव**
मी एकदम उद्गारलो "नीळकंठेश्वराला भेट देणारं हे आणखी एक मेहूण!!! तेवढंच साहबदिल!!

तीन मजली बावल्यांच्या फरसबंदी पायऱ्या उतरून थेट शेवाळलेल्या पाण्यावरच्या हिरव्या थरापर्यंत पोहोचलो. बौद्ध लेण्यांच्या शून्य, खणवजा खोल्यांतून हिंडलो, जैन मंदिरांच्या अतिकोरीव गर्भगृहांचे भग्न अवशेष ओलांडले; अनेक भयाण मशिदी, आणि उदास ऐशगाह यांच्या पडक्या, पडू पहाणाऱ्या खणाखणांतून हिंडत हिंडत, फुटलेले नहर, शुष्क पुष्करण्या व कोरड्या हौदांच्या फुटल्या निखळलेल्या पायऱ्या ओलांडीत अखेर पाळघा उध्वस्त झालेल्या तलाव ताडांच्या वेड्या वाकड्या, नागमोडी काठावर येऊन स्थिरावलो, साऱ्या उध्वस्त आसमंताचं पाण्यावर पडलेल शांत निश्चल प्रतिबिंब न्याहाळीत.

जिकडं पाहिलं तिकडं उध्वस्त खिंडारं. पापाण, दगड शिलाखंड लहान मोठे, साधे कोरलेले, तुटलेले तडा गेलेले, खंडित झालेले, निखळलेले अथवा उलथून पडलेले. धुळीच्या ढिगाऱ्यातून बाहेर तोंड काढण्याची केविलवाणी धडपड करणारे, उभे वाटले तरी कलेले...... एकही वास्तू अथवा वस्तू ओळंब्यात धड उभी नव्हती. वास्तूचे नानाविध प्रकार दृष्टीस पडत होते खरे परंतु त्यातील प्रत्येकीचं लौकिक अस्तित्व आता नाहीसं झालेलं. व्यावहारिक हिशेबानं प्रत्येक वास्तू निरुपयोगी झालेली-नामशेष झालेली—मुद्दाम बघू नये एवढी अलक्षणीय.

—तरीही आम्ही पहात होतो, शोधत होतो, न्याहाळत होतो.

## उध्वस्त तरीही जिवंत कुरुक्षेत्र !

—उध्वस्त असलं तरी हे सारं कुरुक्षेत्र विलक्षण जिवंत होतं. जिवंतपणे जगत होतं. सूक्ष्म बघणाऱ्यांच्या मनात जिवंतपणे साकार होत होतं. त्या दृष्य उध्वस्तामागे—मूळ अदृष्य अनुध्वस्त अजून तसंच उभं होतं. खरं म्हणजे हे अदृष्य, अनुध्वस्तच आम्ही शोधत होतो, न्याहाळत होतो— दृष्य उध्वस्ताला 'वाट पुसत'.

मांडवगड आज उध्वस्त असला – तेथील जवळ जवळ साऱ्या वास्तूंची आज खिंडारं उभी दिसत असली, तेथील वास्तविकाचा आज सर्वस्वी नाश झाला असला, तरी त्या वास्तविकाला जन्मास घालणाऱ्या शिल्पींचे 'मनोजनित' अमूर्त अदृष्य रूपानं अजूनही तिथं तसंच उभं होतं. शिल्पींचे मनोजनित अमूर्त. कोणत्याही वास्तूला मूर्त स्वरुप देणाऱ्या 'साहबदिल' शिल्पींचे मनोजनित अमूर्त. शेवटचा चिरा निखळेपर्यंत प्रत्येक वास्तूच्या मागं अव्याहत निश्चेनं अखंड उभं रहाणारं, शिल्पींचं 'साहबदिल मनोजनित' न एनं छिन्दंति, न एनं दहति– असं अक्षर अमर अदृश्य मनोजनित. अमूर्त. या अदृश्य अमूर्ताचा शोध घेणं, ते न्याहाळणं, त्याचं दर्शन घेणं हीच या कुरुक्षेत्राची पुण्यप्राप्ती–हीच कोणत्याही ऐतिहासिक स्थळाच्या यात्रेची फलश्रुति.

या अमूर्ताच्या विराट दर्शनामुळेच मांडवगडचं सारं महाभारत आमच्या समोर पुन्हा घडत होतं. मांडवगडचं सारं स्तब्ध विश्व, जिवंत होऊन बोलत होतं. येथील प्रत्येक वास्तू आहे त्या स्वरुपातही जिवंत व बोलकी झाली होती. काही तरी सांगणारी, कोणती तरी कहाणी, एकादा किस्सा, ओठावर घोळवणारी, एकादी ऐतिहासिक घटना प्रत्यक्ष पाहिल्याची साक्ष देणारी, एकादा प्राचीन प्रसंग हकीकतीत जसा घडला तसं पुन्हा शब्दशः वर्णन करून सांगण्याचा दावा करणारी. जिला काही सांगावयाचे नाही, जिच्याजवळ सांगण्यासारखे काही नाही, अशी एकही वास्तू नाही– वस्तू नाही. प्रत्येक ठिकाणी काहीतरी घडलेलं. प्रत्यक्षात अथवा कल्पनेत. इतिहासात अथवा ऐकिवात. कुठं एकादी लोककथा, कुठं दंतकथा, कुठं प्रेमकाव्य, कुठं पराक्रमाचा पोवाडा, कुठं राजकारण, धर्मकारण, समाजकारण. हर्षविषादांचे, रागलोभाचे, करुणा-घृणा उत्पन्न करणारे, नाना भाव-विभावांचे, नाना रसांची डूब असलेले, आदिवासी बोलीतले, संस्कृत भाषेतले, पाली शौरसेनीमधले, फारसी उर्दू अल्फाजातले आणि इंग्रजी मराठीतले सुद्धा हजारो चमत्कारिक घटनांचे अनेक किस्से आमच्याशी बोलण्यास उत्सुक दिसले.

भग्न प्रासादांचे खंडित खांब अनेक ऐतिहासिक विधानांना आधार देत होते; जुन्या खलबतखान्यांच्या 'बहुश्रुत भिंती' अनेक गुप्त मसलती मोकळेपणानं सांगावयास तयार होत्या. कंचुकी खोजांच्या खास अपौरुषेय बंदोबस्तात एकेकाळी पडदानशीन असलेल्या जनानखान्यांचे जाळीदार देखणे झरोके अनेक नाजुक प्रकरणं आज उलगडून दाखविण्यास तयार होते. एरव्ही जिवे नखही दृष्टीस पडणे मुश्कील अशा शहाजाद्यांच्या अंगप्रत्यंगाचे रेखीव वर्णन–आता कोरडे ठणठणीत पडलेले हमामखाने निःसंकोचपणे करीत होते. चकवी भुयारे, अंधारी बंदिखाने, गुप्तवाटा, खजिन्याची तळघरे ही सारी स्वभावतःच मुकी, अबोल, आणि आतल्या गाठीची मंडळी आज विलक्षण वाचाळ व बोलकी झाली होती.

ते सारे पाहून ऐकून— शेकडो पर्वांचं महाभारत जियं घडलं तो मांडवगड ही चीज केवढी साहेबदिल आहे याची कल्पना आली आणि मांडवगडच्या इतिहासाचा महान् चित्रपट डोळ्यापुढून सरकू लागला.

मांडवगड !— किती सार्थ नांव ! या गडाच्या मांडवाखाली कितीतरी राजवटी विसावून गेल्या. मौर्य, शातवाहन, शक, क्षत्रप, कुशान, गुप्त, परमार, गुर्जर, खिलजी, पठाण, मोंगल, मराठे







आणि इंग्रज. तेराव्या शतकातील परमारांच्या पूर्वीच्या राजवटींची सारी नांवनिशाणी काळचा पडझडीत पुसली गेली आहे. परमार राजांपासून आजपर्यंतचा इतिहास मात्र अगदी सही शिक्क्यानिशी शाबुत आहे.

कनौजच्या गुर्जरांचा पाडाव झाल्यानंतर मांडवगड हीच काही काळ परमारांची राजघानी होती. मांडवगड बांधला सजविला परमारानीच. गडाची-तटबंदी–निरनिराळी प्रवेशद्वारे–प्रचंड राजवाडे, पाण्याचे हौद, पुष्करण्या, तलाव ही परमार राजांचीच देणगी. नववा परमार राजा भोज याच्या राजवटीत तर 'मंडप दुर्ग' म्हणजे साहित्य व कलांचे आगर होते. मांडवगडच्या ऐश्वर्याला सीमा नव्हती. ज्यांचे सुवर्ण कलश आकाशात कायम तळपताना दिसत अशी शेकडो हिंदु जैन मंदिरे इथं उभी असल्याचा दाखला मिळतो. एकटचा पायेडदेवाने तीनशे उत्तुंग जैन मंदिरे बांघल्याचे इतिहास सांगतो.

आज मांडवगडला एकही जैन अथवा हिंदू मंदिर उभे नाही. त्याचं नांव-निशाणी सांगणाऱ्या भग्न शिलाखंडांचा सडा मात्र इतस्ततः पडलेला आढळतो.

ही सारी मंदिरं कुठं गेली ?—कुणी पाडली आणि कां पाडली? मांडवगडला आज नांवाला सुद्धा हिंदु अथवा जैन वास्तू जाग्यावर नाही. जिकडं पहावं तिकडं पडक्या मशिदी– कबरी व यवनी, शाही महाल.

मंदिरच काय ? बाराव्या तेराव्या शतकानंतर एका विजिगीषु सत्तेच्या प्रभावी सामर्थ्यापुढं सारं हिंदु जगच जियं कोलमडून पडत होतं, तिथं मंदिरांची काय कथा ? ते तसं कोलमडून पडणं हा योगायोग नव्हता, किंवा इतिहासाची ती लहरही नव्हती. लहर लागेल तसं वागायला इतिहास बेजबाबदार थोडाच असतो?

### शर्कराकुमार !



पोरगं जन्मण्याच्या वेळीच साखरेचा कंट्रोल उठला म्हणून नांव शर्कराकुमार ठेवलंय.

तो नियतीचा नियम होता. इतिहासाचा अपरिहार्य भाग होता. ही प्रभावी बलदंड सत्ता बाराव्या तेराव्या शतकात यवनांचं नांव सांगणारी निघाली हा केवळ योगायोग होता.

मांडवगडची हिंदुजैन वास्तू कां पडली ? कां पाडण्यात आली ? अगतिकपणे कां उध्वस्त होऊ दिली गेली ?– या प्रश्नांची उत्तरे या मंदिरांच्या असंख्य अवशेषांचा येथे पडलेला सडा पाहूनच मिळण्यासारखे आहे.

### कलाच अखेर कोरली गेली !

समोर पडलेला हा दगडी खांबाचा तुकडा पहा ! नक्षीनं लिपलेला, कोरीव आकृतीनी लडबडलेला, उबग आणणाऱ्या कारागिरीची वाळवी लागलेला. या खंडित भागावर सुद्धा आकृतींचे किती नाना प्रकार कोरलेले आहेत. एवढया थोडया जागेत सुद्धा, इथं वाघ सिंह हत्ती घोडे आहेत, मोर हंस पोपट सारस पक्षी आहेत, मकर मत्स्य सर्प आहेत, शंकर पार्वती गणपति आदि अनेक देवता आहेत, ऋषिमुनि तपस्वी आहेत, दासदासी देवदासी आहेत, गायिका नृत्यांगना आपआपल्या वाद्यवृंद व वादकांसह आहेत, चौरीवर छत्रधर, दंडधारी आहेत, भालाईत आहेत, ढालाईत आहेत, गदाधारी आहेत. मुनींच्या आणि मिथुनांच्या नाना आकृति आहेत. कुंभ कलश आहेत, वेलपत्ती फूल-फळांची क्लिष्ट जुंबाड आहेत, गोफ, शृंखला माळा तोरण घंटिका यांचे लोळघोळ आहेत आणि या सर्वांवर ताण म्हणून कीर्तिमुखांचे डोळे वटारलेले भयानक भेसूर मुखवटेही आहेत. इथं काय नाही ? सर्व काही आहे. "कृपाकटाक्षाचेनि ओले । पाषाणा कोंभ फुटले । तैसे स्तंभू मिरविले पाटिसाळेचे." स्तंभाच्या या खंडित भागावरही कोरीव आकृतीचं जणू वारुळ फुटलं आहे. मुंग्यानी लडबडलेल्या एकाद्या गुळाच्या खड्यागत हा खांबाचा तुकडा आकृतींच्या अतिरेकानं लडबडलेला वाटतो. खांबाच्या खंडित तुकड्याची ही अवस्था–मग सबंध खांबाची काय परिस्थिति असेल ?– ज्या मूळ वास्तूचा आधारस्तंभ हा खांब, त्या वास्तूला भरभक्कम आधार देण्याऐवजी या कोरीव जडावाचं निरर्थक ओझं वहाण्यातच बिचाऱ्याची अधिअधिक शक्ति नाहीशी झाली असावी. खांबाचं सामर्थ्य त्याच्या भक्कमपणात, पण कारागिरीची वाळवी लागलेल्या या खांबाला ते सामर्थ्य कुठून यावे? जी गत खांबांची तीच गत त्यावेळच्या वास्तूच्या इतर अंगांची. बाराव्या तेराव्या शतकातील कोणत्याही देवळांची शिखरे पहा, गर्भगृहे सभामंडप पहा, राजप्रासाद आणि त्यांची छते पहा–प्रवेशद्वारे महाद्वारे दरवाजे पहा, गवाक्षे खिडक्या सज्जे पहा, कुंडवृंदावने पुष्करिण्या पहा सारी सारी आतून बाहेरून नखशिखान्त नक्षीक मानं लिपलेली. कुठंही मोकळी जागा दिसण्याचा अवकाश की ती नक्षीच्या रांगोळीनं भरलीच. मोकळ्या जागेची जणू जबरदस्त धास्ती घेतलेली. त्या काळच्या मूर्तींचीही तीच गत. मूर्ती देवाची असो अथवा द्वारपालाची. देवीची असो अथवा देवदासीची. लहान मोठी उभी आडवी जागी झोपलेली कशीही असो. कुठेही असो, अगणित कोरीव दागिन्यांच्या ओझ्याखाली ती

दडपलेलीच दिसायची. दागिन्यांच्या जडावानं झालेली. काही ठिकाणी तर केवळ दागिनेच दिसतील—खाली मूर्तीचा जवळ जवळ पत्ता नसेल.

तेराव्या—चवदाव्या शतकापर्यंत मध्यभारतातील वास्तुकलेचे व शिल्पकलेचे स्वरूपच पार बदलून गेले होते. पूर्वीच्या मौर्य कुशान गुप्त काळातील वास्तूत व शिल्पात प्रतीत होणारं आकृतीचं सौष्ठव, आविष्काराचं सामर्थ्य व तंत्रातील संयम यांचा या कालखंडात पूर्ण लोप झाला होता. कलेची केवळ कारागिरीत परिणती झाली होती. वास्तुकला काय किंवा शिल्पकला काय—तंत्राच्या पूर्ण स्वाधीन झाली होती—त्यावेळचे स्थपति आणि शिल्पी केवळ तंत्रविशारद बनले होते. कोरण्याच्या जडावाच्या तंत्राचे ते उस्ताद होते. कोरणं, अधिक कोरणं, अधिकाधिक क्लिष्टपणे कोरणं—कोरण्याची अगदी परिसीमा गाठेपर्यंत कोरीत रहाणं, हीच त्यांची ईर्षा होती. हीच त्यांच्या आविष्काराची दिशा होती. केवळ तंत्राच्या तालमीत तयार झालेले हे शागीर्द कोरण्याच्या कैफानं एवढे बेभान झाले की ज्याच्या जिवावर कोरण्याची कारागिरी करायची त्या बिचाऱ्या दगडाचं अस्तित्वच कोरण्याच्या अतिरेकानं नाहीसं होत आहे याची शुद्ध त्यांना राहिली नाही. कोरून कोरून दगडाला कागदाची अवकळा आणली आणि दगडावरचं कोरीव काम म्हणजे जिनगरी कातरीनं कापलेल्या कागजी कारागिरीसारखं नाजुक तकलादू हलकं फुलकं बनच ! कोरण्याच्या वाळवीनं दगडाचा भुगा केला. कलेच्या माध्यमावर तंत्राच्या भस्मासुरानं हात ठेवला की कलेबरोबरच माध्यमाचेही असे भस्म व्हायचेच.

कोरण्याच्या कारागिरीनं प्रेक्षकांना थक्क करणारं काम या कालखंडात प्रचंड प्रमाणावर निर्माण झालं खरं, पण कारागिरीच्या अतिरेकानं निर्माण केलेल्या या आविष्कारांची अवलाद जन्मतःच कमालीची दुबळी व तकलादू निपजत होती याकडे कुणाचंही लक्ष नव्हतं. लक्ष असणंच शक्य नव्हतं. कसं असणार ? कोरणारे व कोरीव कामाची तारीफ करणारे— सारेच कोरण्याच्या कैफानं धुंद झाले होते. ज्या समाजाच्या जाणिवा निष्ठांनी ही कारागिरी निर्माण केली व प्रशंसिली तो त्यावेळचा समाजच प्रकृतीनं कृत्रिम-कारागिरीच्या जडावांनी नटलेला—पोकळ डामडौल मिरवणारा दुबळा झाला होता. केवळ वास्तु व शिल्पशास्त्रातच नव्हे तर त्या काळच्या साहित्य चित्र संगीत नृत्य आदि इतर कलांतही तथाकथित कलावंतांची ही "जिनगरी घराणी" आपआपल्या मगदुराप्रमाणं नांदत होती. तिथंही कलावंताऐवजी कारागीर अधिक होते. आणि तंत्रविशारद कारागिरांच्या हाती त्या त्या कलांचे माध्यमही असेच भस्मसात होत होते.

असला हा पोकळ समाज व त्याच समाजातील कारागिरानी उभे केलेले वारुळी शिल्प—कोणत्याही परकीय सत्तेच्या प्रभावी बलदंडापुढे टिकाव धरणंच शक्य नव्हतं. ते कोलमडून पडणं—साफ

कोसळून पडणं हेच त्याचं भविष्य होतं. आणि ते तसं पडलंही. आपल्यासमोर पडलेला खांबच त्याची साक्ष देत आहे.

– आणि यात अनुचित ते काय झालं ? इतिहासाच्या दृष्टीनं ती इष्टापत्तीच होती. आपली प्राचीन परंपरा जिवंत ठेवण्याकरिता हे मरण पत्करलं भारतीय वास्तुकलेला अगदी अपरिहार्य होतं. हे मरण स्वीकारण्यातच भारतीय वास्तुकला पुन्हा जिवंत रहाणार होती. जिवंत जगणार होती.

बाराव्या तेराव्या शतकातील भारतीय वास्तू तंत्रानं 'कारागिरीची' झाकी असली तरी परंपरेनं प्राचीन व प्रभावी, समर्थ कलात्मक आविष्कार करणाऱ्या खानदानी घराण्याची होती. प्राचीन कालापासून बाराव्या तेराव्या शतकापर्यंतच्या आपल्या प्रदीर्घ आयुष्यात तिनं कलात्मक आविष्काराचे, तंत्राचे आणि कारागिरीचेही सर्व उच्चांक गाठले होते. नवीन करण्यासारखं आता तिच्याजवळ काही नव्हतं. तंत्राच्या अतिरेकानंच पुढे हळू हळू विलगित होऊन नामशेष होणं हेच तिचं मरण होतं. अशा परिस्थितीत नव्या सत्तेने आणलेल्या नव्या जिवंत जाणिवा-निष्ठांना सामोरी जाऊन तिनं स्वतः मरण पत्करलं तर त्यात वावगं काय झालं ?– मरण्याकरिता नव्हे तर जगण्याकरिता. स्वतःचा नाश करून घेणारं हे आत्मघातकी मरण नव्हतं, तर भारतीय प्राचीन वास्तुकलेची प्रभावी परंपरा जगवण्याकरिता केलेलं ते आत्मसमर्पण होतं.



भारतीय वास्तुकलेची परंपरा नेहमीच अखंड व अव्याहत राहिली आहे ती असल्या आत्मसमर्पणामुळं. खऱ्या अर्थानं भारतीय वास्तुकला त्याही वेळी मेली नाहीच. ती फक्त व कली नव्या दमाच्या परकीय सत्तेनं आणलेलं नवं ताजं रक्त पिऊन फिरून जोमानं जगण्याकरिता–नवनवोन्मेषानं पुन्हा भारतीय म्हणून फुलण्याकरिता हे रक्तदान आणि रक्तपान भारतीय कलांच्या दीर्घ इतिहासात नेहमीच झालं आहे. माणसाप्रमाणंच संस्कृतीला सुद्धा नेहमीच नव्या ताज्या रक्ताची गरज भासली आहे. भारतीय कलांनी ते नेहमीच इतरांजवळून घेतलं आहे. दुसऱ्याचं ताजं रक्त एवढ्या बेमालूमपणे पचविणारी भारतीय संस्कृतीसारखी चिवट संस्कृती जगाच्या इतिहासात इतरत्र कदाचित आढळणार नाही.

आणि हे जर रास्त असेल तर मांडवगडला बांधण्यात आलेली चवदाव्या पंधराव्या शतकातील मुसलमानी वास्तू – परकीय कशी? अभारतीय कां ?

परकीय तर नाहीच उलट प्राचीन भारतीय वास्तु-परंपरेचाच मुसलमानी राजवटीतील तो नवीन आविष्कार मानला पाहिजे. मांडवगडची धीट धिप्पाड पठाण वास्तू सर्वार्थाने भारतीयच आहे. जहाज महाल–हिंडोला महाल–रूपमतीचा महाल, होशंगशहाची कबर–जामी मसजीद ही सारी सारी मुसलमानी राजवटीत फुललेल्या भारतीय वास्तुकलेच्याच शाखेची टपोरी फुलं आहेत. प्रत्येक भारतीयाला अभिमान वाटावा अशीच ही पठाण वास्तू सुंदर आणि समर्थ आहे. कलात्मक दर्जानं श्रेष्ठ आहे.

नव्या जाणीवेनं–नव्या दमानं निर्माण केलेली कलाकृति अशी धीट धिप्पाड आरोग्याचीच असायची. साधेपणात, समर्थपणात आणि संयमातच तिचं सौंदर्य एकवटलं आहे. नव्या जाणिवा निष्ठांचे हे नवे मनोजनित व ह्या नव्या मनोजनिताला नव्या स्वरूपात साकार करणारे मांडवगडचे स्थपतिशिल्पी–परंपरेने भारतीय नव्हते असे कसे म्हणता येईल ?

परमारांच्या वेळचे मांडवगडचे जुने जीर्ण वास्तुशिल्प नष्ट होऊन नवे पठाणशिल्प पूर्णपणे साकार व्हावयास अदमासे शे-सव्वाशे वर्षांचा अवधि लागला आहे. या सव्वाशे वर्षांच्या कालखंडात प्राचीन भारतीय वास्तुशास्त्र व परकीय इस्लामी वास्तुशास्त्र यांच्या दरम्यान अनेक प्रयोगपद्धतींची-आकार विस्तारांच्या निरनिराळ्या कल्पनांची देवाण–घेवाण होऊनच मांडवगडची नवी वास्तुकला सिद्ध झाल्याचे प्रत्यक्षात दिसते.

## अनादि मी, अनंत मी !

मांडवगडचा पहिला पठाण राज्यकर्ता दिलावरखान याने बांधलेली ही पहिली मसजिद पहा; अथवा त्यानंतर काही वर्षांनी बांधण्यात आलेली मलीक मुघीजची ही दुसरी मसजिद पहा. यवनी राजवटीच्या प्रारंभी बांधण्यात आलेल्या ह्या इमारती जवळ जवळ प्राचीन जीर्ण हिंदु परंपरेनंच बांधण्यात आलेल्या दिसतात. प्राचीन हिंदु देवळां–प्रासादांचेच सामान ह्या मसजिदी बांधण्यास

वापरण्यात आले असावे. प्राचीन हिंदु देवळा–प्रासादांप्रमाणेच या मसजिदं तूनही कोरीव बारीक खांब, तुळया, कंगोरे, नाजुक निरर्थक कारागिरीनं नटलेले–दुबळे आणि तकलादू आहेत. जणू जुन्या हिंदु प्रासादांच्या डोक्यावर यवनी घुमट थापून त्यांना मशिदी बनविले. परंतु खालचे सभागृह व त्यावर ठेवण्यात आलेले स्थूल बेढब घुमट यांच्यात कसलीही प्रमाणबद्धता अथवा तारतम्य आढळून येत नाही. खालच्या सभागृहाचे खांब जेवढे कोरीव तकलादू-दुबळे-तेवढेच वरचे घुमट सावे, बोजड, बेडौल. या नव्या इमारती उभारणारे स्थपति बव्हंशी भारतीय होते. आणि जुन्या भारतीय तंत्रानं नव्या इस्लामी आशयाला आकार देण्याचा त्यांनी केलेले प्रयत्नही प्रामाणिक होते. परंतु ते प्रयत्न असे फसले. आशय आणि आकृति यांच्यातील विसंगतीमुळे निर्माण झालेली वास्तू परिणामी बेढब आणि बेडौल मात्र झाली. यात कोणाचेही समाधान होण्यासारखे नव्हते. नवी वास्तू बांधण्याऱ्या स्थपतीशिल्पींचे किंवा ती बांधविणाऱ्या नव्या राज्यकर्त्यांचे. आणि तेही बरोबरच होते. जीर्ण संकेत व निरर्थक कारागिरीनं नटलेल्या भारतीयांच्या त्याकाळी प्रचलित असलेल्या दुबळ्या तंत्रातून नव्या दमाच्या, नव्या जाणिवांच्या प्रभावी आविष्कारालाँ कलात्मक समर्थ आकार येणे शक्य नव्हते. नव्या जाणीवांचा प्रभावी आविष्कार करावयाचा तर त्याकरिता सर्वस्वी नव्या जोरदार तंत्राचीच निर्मिती होणे भाग होते. हे नवे जोमदार तंत्र कोणी व कोठे निर्माण झाले ? मांडवगडातच ते निर्माण झाले. बांधणारे व बांधविणारे या दोघांच्या सहकार्यानेच ते निर्माण झाले. मांडवगडच्या मुसलमान राजवटीतील पहिली वास्तू स्वरूपानं बेडौल व प्रकृतीनं गंगाजमनी वाटली तरी तिची निर्मिती या दोघांच्या देवाण-घेवाणीतूनच झाली होती यात वाद नाही. जुन्या साधनांनी नव्या आशयाला आकार देण्याचा मनोमन प्रयत्न करणारे स्थपति-शिल्पी व नव्या आशयाला, असलेल्या उपलब्ध साधनसामुग्रीनं अधिकाधिक मूर्त करण्याचा आग्रह धरणारे सत्ताधीश यांच्या सहिष्णु सहकार्यानेच-तिची निर्मिती झाली होती. या सहिष्णु सहकार्याच्या दीर्घ प्रक्रियेतूनच पर्यायाने एका नव्या जोमदार वास्तु तंत्राचा जन्म झाला व भारतीय वास्तुशिल्पाची प्राचीन परंपरा एका नव्या दिशेने वाट चालू लागली. भारतीय वास्तुशिल्पाच्या या नव्या प्रयोगपरंपरेनेच पुढील शंभर वर्षाच्या कालखंडात मांडवगडची धीट विप्पाड, आगळी पठाण वास्तू प्रभावीपणे आकारास आणली.

ही प्रभावी परंपरा निर्माण करणारे स्थपति-शिल्पी काय सारेच अभारतीय होते ? या उलट ही नवी परंपरा निर्माण करण्यात भारतीय स्थपति-शिल्पींचाच फार मोठा भाग होता असाच तत्कालीन इतिहासाचा दाखला आहे. ही परंपरा परिणत करणारे सारेच स्थपति-शिल्पी अभारतीय असून, ते सारेच भारताबाहेरून आले होते असे क्षणभर धरून चालले, तरी वरील वास्तु–परंपरा परिणत प्रगल्भ होण्यास लागलेला शंभर-सव्वाशे वर्षांचा दीर्घ कालखंड लक्षात घेतला तर एवढ्या प्रदीर्घ वास्तव्यानंतर भारताबाहेरून आलेल्या कोणाही अभारतीयाला भारतीय समजले पाहिजे. त्याला अभारतीय कोणत्या अर्थाने समजायचे ? शिवाय या नवागतांनी अभारतीय स्थपति-शिल्पींनी उभी केलेली पठाण वास्तू भारता बाहेरील कोणत्याही अभारतीय वास्तूची केवळ प्रतिकृति नव्हती. तर ती येथेच निर्माण झालेली एक संपूर्ण-स्वतंत्र कृति होती. मांडवगडच्या भारतीय भूमीतून वर आलेली–माळव्याच्या-भारतीय हवा पाण्यानं पोसली-जोपासलेली, माळव्याच्याच दगडविटांनी बांधलेली, माळव राजसत्तेच्या (मग ती त्यावेळी पठाणी का असेना?) आशा आकांक्षांचा आविष्कार करणारी, वास्तुशास्त्राच्या नियमांनुसार, शास्त्रशुद्ध, प्रयोगसिद्ध, स्वतंत्र निर्मिती होती–इतके असूनही ही सारी वास्तू व तिची परंपरा अभारतीय कशी ? मांडवगडची पठाण वास्तू साकार करणारे स्थपति-शिल्पी कदाचित यवनी असतीलही–त्यानी यवनांच्या मशिदी, दर्गे, महाल बांधले असतीलही –पण निव्वळ तेवढ्यावरून त्याना अभारतीय ठरविणे अन्यायाचे होईल.

कोणतीही नवी विचारधारा आत्मसात करण्याची भारतीय परंपरा तर फार प्राचीन आहे. मौर्य, कुशान, गुप्त, सातवाहन, वाकाटक, चालुक्य, राष्ट्रकूट या साऱ्या राजवटीतून भारतीय वास्तु-कलेचे स्वरूप एवढे समृद्ध झाले ते दरवेळी करण्यात आलेल्या नवनव्या प्रयोगानी. नव्या निष्ठांचे नवे रक्त पिऊन पचवून इतिहास-पूर्व मौर्य काळापासून इ. स. च्या आठव्या शतकापर्यंत भारताचे इतर जगाशी राजकीय, व्यापारी व सांस्कृतिक संबंध घनिष्ट होते. या साऱ्या शतकांतून नव्या कल्पनांची, नव्या जाणिवांची देवाणघेवाण या संबंधांतूनच होत असे. ही सारी देवाण-घेवाण पचवून जर भारतीय वास्तुकला इ. स. च्या आठव्या शतकापर्यंत समृद्ध झाली व तरीही तीच भारतीय राहिली तर अशाच देवाण-घेवाणीतून नंतर पुढील काळात सिद्ध झालेली पठाण वास्तु-परंपरा अभारतीय कशी ? उलट, भारतीय इतिहासाच्या मुसलमान रियासतीत– जीर्ण क्षीण झालेला भारतीय वास्तुकलेचा प्राचीन प्रवाहच पुन्हा नव्या जोमानं वाहू लागला असे कां मानू नये ? तो तसा वाहण्यास भारतीय स्थपति-शिल्पीनीही आपल्या परीने तेवढेच प्रयत्न केल्याचे आढळून आल्यास नव्यानं निर्माण झालेली ही वास्तुपरंपरा











अभारतीय कशी म्हणावी ? ती निर्माण करणारे जेवढे भारतीय होते तेवढीच त्यानी निर्माण केलेली ही नवी वास्तूही सर्वार्थानं भारतीय ठरते मग त्या निर्मात्यांची लौकिक नांवे हिंदू-मुसलमानी असो अथवा त्यानी बांधलेल्या वास्तू केवळ मशिदी, दर्गे अथवा कबरी असोत.

## साहबदिल् स्थपति आणि शिल्पी !

स्थपति आणि शिल्पी हे 'खरे साहबदिल !' जगाच्या इतिहासात त्यानी जेवढी सहिष्णुता दाखविली तेवढी क्वचितच इतरानी दाखविली असेल. धर्मा-धर्मातील, जातिवंशातील, साहचर्य वाढविण्याकरिता सांस्कृतिक देवाण-घेवाण करून सौहार्द निर्माण करण्यासाठी स्थपति-शिल्पींच्या साहबदिलीनं जेवढे महान कार्य केलं आहे तेवढं इतर कोणत्याही मानव जमातीनं केलेलं नाही. बांधावयाची इमारत हिंदूची असो–इसाची असो अथवा बौद्ध जैनांची असो, स्थपति-शिल्पींच्या जमातीनं त्याबद्दल कधी आपपर भाव दाखविला नाही. स्थपति-शिल्पींचा धर्म "बांधण्याचा" मानवास निर्धास्तपणे उपयोगी अशी सर्व प्रकारची वास्तू बांधण्याचा. वेदी-स्तूप-मंदिर-प्रासाद–काबा–ऐपशाह दुर्गकोट-चैत्यविहार आदि सर्व प्रकारच्या वास्तूंचे नाना प्रकार इमानी निष्ठेने बांधण्याचा. या बांधण्याच्या 'निधर्मी' धर्माशीच ते मरेपर्यंत एकनिष्ठ. या धर्मातच ते जगले, या धर्मातच ते मेले. या ऐहिक निष्ठेमुळेच इतर कोणताही लौकिक धर्म त्याना कधीही भयावह वाटला नाही.

स्थपति-शिल्पी म्हणजे अजातशत्रु. त्यानी कोणाशी कधी वैर केले नाही. त्यांच्याशी वैर धरणे इतर कोणालाही मानवले नाही. महान जेते सुद्धा त्यांच्या पुढे नमले. धर्मवेड्या सत्ताधीशांचीही स्थपति–शिल्पींनी कधी क्षिती बाळगली नाही. उलट स्थपति-शिल्पींच्या बांधण्याचा 'धर्म' ज्यानं मानला त्या कोणाही धर्मीयाचा धर्म त्यांनीं निःशंक मनानं स्वीकारला. त्यामुळंच स्वधर्मी-परधर्मी किंवा निधर्मी विजेत्यांनी स्थपती–शिल्पींच्या जमातीवर कधी शस्त्र धरले नाही. युद्धात किंवा वेढयात घडणाऱ्या अपरिहार्य अमानुष कत्तलीतून स्थपति-शिल्पींना मुद्दाम वगळण्याची दक्षता जित-पराजित राष्ट्रांचे सेनापति नेहमी घेत ते यामुळेच.




गेला आठवडा दुकान उघडू शकलो नाही .:....

धर्माची बंधने त्यांना जखडू शकली नाहीत. त्याचप्रमाणे कोणत्याही देशाच्या मर्यादा त्याना अडवू शकल्या नाहीत. भाषा वेश रीतिरिवाज यांची कधी त्याना अडचण भासली नाही. जिथं बांधकाम असेल तिथं पृथ्वीच्या पाठीवर कुठेही आणि केव्हाही जाण्यास ते मुक्त होते. स्थपति-शिल्पींची कलाच सर्व अर्थानी वैश्विक होती. आणि आपल्या कलेच्या आविष्काराकरिता जगभर हिंडण्याची त्यांची सदैव तयारी होती. तसे ते हिंडलेही. "हे विश्वचि माझे घर" हे ब्रीद अक्षरशः वास्तु बांधणाऱ्या स्थपति-शिल्पींनाच शोभते. त्यामुळेच मध्य आशिया इराणमधले शिल्पी दूरस्थ इजिप्तमधल्या वास्तु बांधताना दिसतात, तर बगदाद शहराची बांधणी करण्याकरिता भारती स्थपतींना मानानं बोलावण्यात येते. आणि इराण अरबस्तानातील मुसलमान स्थपति युरोपातील इसाईंची प्रार्थना मंदिरे–प्रासाद उभारताना आढळतात. स्थपति-शिल्पींना इतिहासात नेहमी मानाचेच पान मिळाले आहे. महंमद गझनीने हिंदूंची देवळे धर्मांधतेने उध्वस्त केली खरी–परंतु मथुरेसारखे सुंदर व समृद्ध शहर बांधण्याऱ्या हिंदु स्थपति–शिल्पींची मुक्त तारीफ करण्यासही तो विसरला नाही. त्याच हिंदू शिल्पींना आपल्या राजधानीस नेऊन त्यानं त्यांच्याकडून गझनीची प्रसिद्ध मसजिद बांधविली. तैमुरलंगने हिंदु स्थानावर स्वारी करून अमानुष कत्तल केली एवढेच आम्ही जाणतो. परंतु समरकंद शहर बांधण्याकरिता त्यानं येथील स्थपति–शिल्पींनाच बरोबर नेलं हेही लक्षात ठेवणं अवश्यक आहे.

इतिहासाच्या शालेय पुस्तकातून 'बुतशिकन' म्हणून बदनाम झालेले हे सत्ताधीश कलाप्रांतात मात्र शत्रूच्या कलेलाही 'दाद' देणारे 'साहबदिल' रसिक ठरतात.

इतर संस्कृतीत जे चांगले दिसलं त्याचा गौरव साऱ्याच थोर पुरुषांनी केला आहे. समर्थ आवर्जून सांगतात. "प्रथम साहेबी ओळखिजे । तदनंतर नमस्कारिजे । ही 'साहेबी' ओळखण, परकेपणाचा अवजड अडसर बाजूला सारून ती आत्मसात करणं आणि स्वतःच्या संस्कृतीच्या संवर्धनार्थं तिचा उपयोग करणं हाच इतिहासातील थोर पुरुषांचा पराक्रम आहे. अशोकापासून थेट शिवाजी राजांपर्यंत साऱ्या थोर पुरुषांनी हेच केलं आहे.

शत्रूस्थानी असलेल्या यवनांच्या संस्कृतीची साहेबी ओळखून ती पूर्णतया आत्मसात करून नंतर तिला मराठी संस्कृतीच्या संवर्धनाकरिता पुरेपूर राबवणारा "गोब्राह्मण प्रतिपालक" शिवाजी राजा हा मराठ्यांच्या इतिहासातील एक थोर 'साहबदिल' आहे. फारसी संस्कृतीच्या वाघिणीचं दूध पचवूनच मराठ्यांचा हा राजा अखेर सवाई शेर ठरला हे लक्षात घेणे आवश्यक आहे.

## यवन आणि शिवाजी दोघेही साहबदिल !

शिवाजी राजांपूर्वी जवळ जवळ तीनशे वर्षे महाराष्ट्र अव्याहतपणे यवनी राजवटीखाली होता. यवनी सत्तेच्या या प्रदीर्घ काल-

खंडात यादव काळानंतरचे सारेच मराठी जीवन फारसी संस्कृतीच्या सान्निध्यानं हळू हळू बदलत जाऊन शिवकालापूर्वी ते बहुतांशाने यवनी थाटाचं फारसी झालं होतं. आचार विचार श्रद्धा समजुती नेमधर्म चालीरीति–मानमरातब शिष्टाचार, साजशृंगार–पोशाख, वास्तु, कला, वाद्ये व्यापार व सर्वसाधारण व्यवहार या साऱ्या साऱ्यांना यवनी वळण लागलं होतं. आणि ते तं लागणं स्वाभाविक होतं; अपरिहार्य होतं. इतर सर्वांप्रमाणेच शिवाजी राजांचा पिंडही या यवनी (फारसी) वळणानंच जोपासला होता. त्यांचे गृहशिक्षण मुसलमानी दरबारात उमराव होण्यास लायक असे परिस्थितीनेच झाले होते. दादोजीनीच त्यांना चालू मुसलमानी राज्य पद्धतीचे उत्तम शिक्षण दिले होते. उर्दू फारसी भाषांचे अध्ययन त्यांना अपरिहार्यपणे करावे लागले कारण तत्कालीन हिंदुस्थानात एवढ्या शिक्षणावांचून मुसलमान राजवटीतील कोणीही वरच्या पदास लायकच ठरला नसता. त्याना मिळालेले लष्करी शिक्षण तर सर्वस्वी मुसलमानी धर्तीचेच होते. कारण त्यावाचून कोणाचाही टिकाव लागण्यासारखा नव्हता. सारांश शिवाजी राजांच्या अंगी यवनी संस्कृति संपूर्ण बिंबली होती. व्यवहारात आणि आचारात आयुष्यभर ते सदासर्वदा मुसलमानी पद्धतीने चालले. आज पाश्चात्य संस्कृतीची जी अवस्था आहे तीच त्यावेळी इस्लामी संस्कृतीची होती. त्या काळच्या हिंदुस्थानात जगाचे जे काही ज्ञान उपलब्ध होते ते मुसलमानांनी आणले होते–फारसी व अरबी ह्या भाषा त्या ज्ञानाच्या वाहक नाड्या होत्या. इस्लामी संस्कृतीचे त्या काळचे हे प्रभावी स्वरुप नाकारण्यात अर्थ नाही.

शिवकालात हक्काचं स्वराज्य स्थापन केल्यानंतर शिवाजी राजांच्या मराठी अस्मितेनं खोट्या अहंकाराला बळी पडून हे फारसी वळण बदलले तर नाहीच, उलट मराठी सत्तेच्या उत्कर्षाकरिता ते मोठ्या चातुर्यानं वळवलं. समर्थपणे वाकवलं.

शिवाजी राजांची ही प्रसिद्ध मुद्राच बघा :

"प्रतिपच्चंद्र रेखेव वर्धिष्णुर्विश्ववंदिता
शाहसूनो शिवस्य ऐशा मुद्रा भद्राय राजते ।"

ज्या मुद्रेच्या केवळ वाचनानं आज साऱ्या महाराष्ट्रीयांची मनं उचंबळून येतात त्या मुद्रेत योजलेल्या संकेताची मूळ कल्पना, कदाचित त्या काळच्या एका लोकप्रिय यवनी संकेतात असावी असं कोणी आज सुचविलं तर ? ती कल्पना मुसलमानी "बीजेच्या चांदावरून" राजांना सुचली नसेल कशावरून ? अथवा त्यांना ती तशी कोणी सुचविली व ती मनोमन पटून राजांनी तिला मान्यता दिली असणेही शक्य आहे. राजांच्या आधी तीनशे वर्षे सारा महाराष्ट्र मुसलमानांचे हे 'चांद' दर्शन नेमानं घेत होता. "बीजेचा चांद" हा त्याकाळचा एक सर्वसंमत संकेत झाला होता. मराठी महाराष्ट्रातील आचारविचारात तो रुजला होता– मराठी कलात्मक आविष्कारातं सुद्धा तो रूढ झाला होता.

सदस्य म्हणती राज परमेशा । ज्ञानी प्रमाण नव्हे वयसा द्वितियेचा शशि जैसा । वंद्य होय सकळांते ।। मुक्तेश्वर, आदिपर्व हिंदुमुसलमान आदि सकळांना वंद्य असलेल्या या बीजेच्या कोरीचे दर्शन घेण्याकरिता तमाम महाराष्ट्राचे डोळे आकाशाकडे नेमाने लागलेले असायचे—श्रद्धेन किंवा सवयीने

एका तिथीचा सूक्ष्म फरक करून शिवाजी राजांनी चंद्रदर्शनाचा हा यवनी संकेत किती कल्पनेनं आपल्या मुद्रेकरिता योजला हे लक्षात घेतले की राजांच्या व्यवहारचातुर्याची आपल्याला पूर्ण कल्पना येते.

किंवा असेही असेल—शिवकालापूर्वीचे मराठी आकाश—चांदताऱ्याचे उत्तुंग हिरवे निशाण मोठ्या दिमाखानं मिरवीत असे. यवनी निशाणांवर डौलानं फडकणाऱ्या बीजेच्या या कायम कोरीला आव्हान म्हणून तर राजांनी आपल्या मुद्रेत वर्धिष्णु चंद्राची योजना केली नसेल ?

बीजेच्या चंद्रदर्शनाचा यवनी संकेत मराठी राज्यातही कसा राजमान्य झाला होता याचा लेखी पुरावा रायगडच्या दप्तरीच दाखल आहे.

दर महिन्याच्या शद्ध द्वितीयेस रायगडावर चंद्रदर्शन झाल्यावर तोफचा बार काढीत. नंतर लोकांस पानसुपारी वाटीत. या समारंभाचा वार्षिक खर्च ७।। रु. होता. — किल्ले लिंगाण्यावर सुद्धा चंद्रदर्शन प्रसंगी पानसुपारी वाटण्याचा प्रघात होता ! ! रायगडच्या दप्तरातील हे दाखले उत्तर पेशवाईतील आहेत हे खरे. परंतु उत्तर पेशवाईपर्यंत चालू असलेल्या या रीतिरिवाजांची परंपरा थेट शिवशाहीपासून चालत आलेली होती यावद्दल विचारवंतांस तरी शंका घेण्याचे कारण रहात नाही.

शिवाजी राजांचे चित्र न्याहाळून पाहिलंत ? राजांची प्रतिमा त्यावेळच्या अथवा त्यापूर्वीच्या इतर कोणत्याही यवनी राजाच्या प्रतिमेशी ताडन पाहिल्यास राजांच्या हिंदुराजेपणात काही वेगळेपणा असल्याचे आढळून येत नाही. यवनी राजसत्तेन राजेपणाची जी एक विशिष्ट यवनी प्रतिमा लोकांच्या मनावर बिंबविली होती तीच प्रतिमा शिवाजी राजांनीही— हिंदू राजा म्हणून धारण केली. स्वतःस राज्याभिषेक करून घेतल्यावर हिंदू राजा म्हणून प्राचीन हिंदू राजांची वेगळी भूषणे अलंकार घालण्याचा अथवा डोक्यावर यवनी जिरेटोपाऐवजी सुवर्ण मुकुट घालण्याचा आचरट अट्टाहास त्यांनी केला नाही. राज्यव्यवहार कोषासारखे ग्रंथ त्यांनी मद्दाम तयार करवून घेतले, त्याच प्रमाणे अष्टप्रधानांच्या प्रचलित फारसी नांवांना प्राचीन संस्कृत प्रतिनांवेही त्यानी दिली परंतु या गोष्टींचा राजांनी मुद्दाम बाऊ केला नाही, अथवा त्यांच्या वापरावद्दल कटाक्षाने आग्रह धरल्याचेही कोठे आढळून येत नाही. आपल्या राज्यव्यवस्थेत, राज्यव्यवहारात, दरबारी रीतीरिवाजात अथवा गाठीभेटींच्या व्यावहारिक शिष्टाचारात त्याच प्रमाणे सरकारी पत्रव्यवहारातील मायन्या मजकुरात सुद्धा त्यावेळच्या प्रचलित फारसी, यवनी चालीरीतीचेच वळण राजांनी चालू ठेवले. राज्यव्यवहारात काय किंवा लोकव्यवहारात काय ? हिंदु वहिवाटीच्या प्राचीन प्रथा इस्लामी राजसत्तेच्या प्रदीर्घ अमलांमुळे नष्ट झाल्या होत्या. पोषाख अलंकार श्रद्धा समजुती सभा समारंभ, मानमरातब शिष्टाचार, सारांश साऱ्या मराठी जीवनाला यवनी संस्कृतीचे फारसी वळण लागले होते. मराठी लोकांच्या ते अंगवळणीही पडले होते. हिंदूंची राजवट झाल्यावर हे वळण समूळ नाहीसे करणे अशक्य तर होतेच पण अनिष्टही होते. याउलट ते तसंच चालू ठेवून त्याला पूर्णतया राबवून घेणे हेच इष्ट होते व राजांनी तेच केलं. त्यात त्यांच्या हिंदूपणाला बाध तर आला नाहीच उलट मराठी राज्यसत्तेचे स्वरूप मात्र अधिक समृद्ध झाले—मराठी जीवन अधिक व्यापक झाले. शिवाजी राजांच्या सहिष्णु विशाल व्यक्तिमत्वामुळंच हे शक्य झाले हेहि या ठिकाणी ध्यानात ठेवणे जरूर आहे.

राजांच्या या विशाल व्यक्तिमत्वाचे प्रत्यक्ष दर्शन घ्यायचे असेल तर राजांनी बांधलेली—आपली राजधानी रायगडचे दर्शन घेतले पाहिजे.

राजांनी आपली राजधानी बांधावयास घेतली त्यावेळी प्राचीन हिंदु वास्तुशास्त्राची परंपरा व्यवहारातून जवळ जवळ नामशेष झाली होती. यवनांच्या राजवटीत गेल्या तीनशे वर्षात निर्माण झालेले यवनी पद्धतीचे वास्तुतंत्रच प्रचलित होते. हे वास्तुतंत्र केवळ ते यवनी आहे म्हणून राजांनी अमान्य केले नाही. उलट त्याच तंत्राचा आपली राजधानी बांधण्याच्या कामी त्यांनी मोठ्या आत्मविश्वासाने उपयोग करून घेतला. राजांचा प्रमुख स्थपति हिरोजी इंदुलकर हा यवनी वास्तुतंत्र विशारदच होता. त्यानं बांधलेले रायगडावरील राजप्रासाद, दरबारगृह—मनोरे, देऊळे, महाद्वारे, बाजारपेठा, पागा, पीलखाने, तट बुरुज प्रवेशद्वारे ही सारी सारी यवनी वळणानंच बांधली आहेत. रायगडावरील जगदीश्वराचे मंदिर तर एखाद्या मुसलमानी दर्ग्यासारखे दिसते. यवनी वळणाची असली तरी रायगडची सारी वास्तू शिवकालीन मराठी अस्मितेचं प्रभावी स्वरूप फार समर्थपणे साकार करते. मांडवगडच्या वास्तूप्रमाणेच रायगडची ही नवी मराठी वास्तू सुद्धा धीट धिप्पाड, साधी, कलात्मक आविष्कारात संयमी व समर्थ आहे. सूक्ष्मपणे न्याहाळल्यास ती केवळ यवनीही नाही असेही आढळून येते. प्रचलित यवनी वास्तुतंत्र व प्राचीन हिंदु वास्तुपरंपरा यांच्या सुंदर सहयोगातून रायगडच्या वास्तूची निर्मिती झाल्याचे दिसते. या दोन्हीही पद्धतीतील उत्तम गोष्टींचा कलात्मक वापर करून रायगड बांधण्याऱ्या मराठी स्थपतीनं केवळ शिवरायांचेच नव्हे तर खऱ्या शिवकालाचे सहिष्णु जीवन यथार्थपणे साकार केले आहे.

रायगडावरील जगदीश्वर मंदिराच्या बाहेरच्या भिंतीवर कोरलेला हा शिलालेख पाहिलात ! वाटोळ्या, सरळ, मोकळ्या टपोऱ्या, दाणेदार, नेटक्या अक्षरांचा. "बोळी चालिल्या ढाळे। मुक्तमाला जैशा ।।" सहज कोणालाही वाचता येतील एवढ्या स्पष्ट, सुवाच्य. शिवकालपूर्वी तरी एवढ्या स्पष्ट अक्षरांत कोरलेला शिलालेख क्वचितच आढळेल! एरव्ही आमचे बहुतेक प्राचीन शिलालेख कोर किंवा ताम्रपट कार्य, प्रत्येक अक्षर लावता लावता इतिहासज्ञांच्या नाकी दम यावा एवढे गिचमिड अस्पष्ट





व अशुद्ध. मग शिवकालीन लेखकांनी हे नेटके वळण कुठून उचलले—? आणि समर्थ रामदासांनी सुद्धा "वाटवोध अक्षर। घडसून करावे सुंदर। जे देखताचि चतुर। समाधान पावती !।। असा बोध करण्याचा अट्टाहास कां केला?

त्याकाळी प्रचलित असलेल्या फारसी लेखन-कौशल्यामुळे तर नव्हे? लहरेदार फारसी लिपी अत्यंत कलात्मक रितीने लिहिण्याच्या-कोरणाऱ्या यवनी कातीवांचे नेटके वळण शिवकालीन कारागिराना आदर्श कां वाटू नये? तेच वळण घडसून त्यानी किती बेमालूमपणे आत्मसात केले याची साक्ष म्हणजेच हा शिलालेख. शिवकालीन मराठी जीवन समर्थ बनले ते असल्या अनंत देवाण-घेवाणीनं. आणि उत्तम ते आत्मसात करण्याचा महामंत्र महाराष्ट्राला दिला तो शिवरायांच्या समर्थ 'साहबदिली'नं.

यवनांसारखा पोशाख करणारा, यवनांची भाषा उत्तम बोलणारा, यवनी संस्कृतीचे उत्तमोत्तम रीतिरिवाज राबविणारा, यवनांची युद्धकला, शस्त्रज्ञान, गनिमी कावा—राजकारण पुरेपूर पचविणारा—गोवळकोंड्याच्या कुतुबशाहीशी बंधुत्वाचे नातं जोडणारा, यवनी पठाणांचं सैनिकीपथक स्वतःच्या हिंदुसैन्य त बाळगण्याचं धैर्य दाखविणारा, साल्हेरच्या विजयी लढाईनंतर मोंगलांशी वाटाघाटी करावयास काझी हैदर नांवाच्या आपल्या मुसलमान अधिकाऱ्यास विश्वासानं पाठविणारा, मायनाक भंडाऱ्यासारख्या शूर मुसलमानास आपल्या आरमाराचा दर्यासारंग बनविणारा, आपल्या शरीर संरक्षणाची जबाबदारी मदारी मेहतरसारख्या मुसलमानावर टाकणारा, समर्थ रामदास—मोरया गोसावी आदि साधूसंतांबरोबरच — बाबायाकुतसारख्या थोर अवलियांचा आशिर्वाद मागणारा, भवानीप्रमाणेच पीरांनाही भजणारा, देवब्रामणांबरोबरच दर्गा मशिदींना राजाश्रय देणारा, ख्रिस्त्यांचं सक्तीचं धर्मांतर बंद करणारा पण नेतोजीने केलेले खुषीचे धर्मधर्मांतर मान्य करणारा........असा हा मराठ्यांचा पहिला राजा खरा 'साहबदिल' होता. अरबी भाषेत सांगायचे झाल्यास "तो थोर मुसलमान होता."

आज विसाव्या शतकांतही या "साहेबाच्या" प्रतिमेला आम्ही नमस्कार करतो ते त्याची ही 'साहबदिली' ओळखून.

इस्लामी संस्कृति पचविण्याचे शिवाजी राजांनी मराठी मनाला लावलेलं हे सहिष्णु वळण एवढे प्रभावी होते कीं त्याच्या प्रेरणेमुळेच, राजांच्या मुद्रेत घोषित केलेली मराठी राज्यसत्ता पुढे बाजीराव नानासाहेबांच्या पेशवेशाहीतही अनेक अर्थानी वर्धिष्णु ठरली.

परत मांडवगडावर.........

उन्हं वरीच कललेली होती. नीळकंठेश्वराच्या पायऱ्या उतरून आम्ही खाली थेट मंदिरासमोरच्या अंगणात जाऊन उभे राहिलो, एकाद्या प्रचंड तळघरात उतरावं त्याप्रमाणं. नीळकंठेश्वर म्हणजे मांडवगड येथील शंकराचे स्थान. एका अर्धचंद्राकृति तुटलेल्या






अनुक्रमणिका

# आपल्या कुटुंबियांच्या आरोग्यास व्हिटॅमिन्स आणि खनिजद्रव्यें अत्यावश्यक आहेत.

*तीं त्यांना भरपूर प्रमाणांत मिळतात काय?*




## नवीन ! व्हिम्ग्रॅन्®

### मल्टिपल व्हिटॅमिन्स-मिनरल्स टॅब्लेट्स

व्हिटॅमिन्स आणि खनिजद्रव्यें यांच्या अभावामुळें आपल्या कुटुंबियांचे स्वास्थ्य बिघडण्याची शक्यता असते. आवश्यक तीं व्हिटॅमिन्स आणि खनिजद्रव्यें यांच्या अभावामुळें थकल्यासारखें वाटणें, सर्दी होणें, भूक न लागणें, अशक्तपणा, त्वचेचे आणि दातांचे विकार उद्भवणें यांसारख्या तक्रारी सुरू होतात.

अतिशय दक्षतेनें तयार केलेल्या भोजनांत देखील व्हिटॅमिन्स आणि खनिजद्रव्यांच्या बाबतींत दुर्लक्ष होण्याचा संभव असतो. अगदीं सत्त्वयुक्त समजला जाणारा आहार देखील समतोल असतोच असें नाहीं. आपल्या नेहमींच्या आहारांत व्हिटॅमिन्स आणि खनिजद्रव्यें यांची कमतरता असण्याची शक्यता असते. अशा स्थितींत आपल्या कुटुंबियांच्या स्वास्थ्यास अत्यावश्यक असलेली सर्व व्हिटॅमिन्स आणि खनिजद्रव्यें योग्य प्रमाणांत मिळतात कीं नाहीं याची खात्री कशी करायची?

आपल्या कुटुंबांतील प्रत्येकास त्याच्या आरोग्यास उपयुक्त अशी **पौष्टिक सत्त्वें** योग्य प्रमाणांत मिळावी असें आपणांस वाटत असेल तर **व्हिम्ग्रॅन्-स्क्विब** मल्टिपल् व्हिटॅमिन्स मिनरल्स टॅब्लेट्स रोज एक या प्रमाणांत देण्यास सुरुवात करा. अशा निरोगी संवयीचा शुभारंभ आजपासूनच कां करीत नाहीं?

**व्हिम्ग्रॅन्**मध्यें महत्त्वपूर्ण अशीं अकरा व्हिटॅमिन्स आणि आठ खनिजद्रव्यें यांचा सुयोग्य प्रमाणांत अंतर्भाव करण्यांत आला आहे. लाल रक्तपेशींची वाढ आणि खर्च झालेली शक्ति भरून येण्यास आवश्यक असलेलें लोह, हाडें नि दांत यांच्या मजबूतीसाठीं **कॅल्शियम**, सर्दीला प्रतिरोध करण्यासाठीं **व्हिटॅमिन् सी**, भूक उत्तेजित करण्यासाठीं आणि उत्साहवर्धनासाठीं **व्हिटॅमिन् बी१२**, यांखेरीज आपल्या कुटुंबियांच्या आरोग्यास उपयुक्त असलेली अनेक महत्त्वपूर्ण पौष्टिक द्रव्यें **व्हिम्ग्रॅन्**मध्यें आहेत. **व्हिम्ग्रॅन्**च्या एका टॅब्लेटला फक्त तेरा पैसे पडतात. आपल्या कुटुंबियांच्या आरोग्यरक्षणाच्या दृष्टीनें ही किंमत अत्यल्पच आहे. आजच **व्हिम्ग्रॅन्** खरेदी करा—रोज **व्हिम्ग्रॅन्** घेत चला.

# व्हिम्ग्रॅन्®

**रोज व्हिम्ग्रॅन्ची एक टॅब्लेट म्हणजेच निरोगी स्वास्थ्य.**

SQUIBB®
SARABHAI CHEMICALS

®हा ई. आर. स्क्विब अँण्ड सन्स इन्कॉर्पोरेटेड यांचा रजिस्टर्ड ट्रेडमार्क आहे व तो करमचंद प्रेमचंद प्रायव्हेट लि. यांना वापरण्याचे लायसन्स आहे.

Shilpi-SC-256A-Mar








कड्यासमोर छोटेसे प्रांगण—पुन्हा खाली खोल दरी. प्रांगण तून समोर दरीतून दिसणारा पश्चिमेचा देखावा फारच रम्य. खोल त असल्यामुळं हे स्थळ—शीत, शांत, प्रशांत वाटते. कोलाहलापासून दूर एकीकडे, एकटे. मूर्तिमंत एकांत. विधात्यानं या स्थलाची रचनाच तशी केलेली. कोणत्याही एकांताकरिता. ध्यानाच्या अथवा मीलनाच्या. एकांतप्रिय नीळकंठेश्वरानं हे स्थळ मुद्दाम त्याच दृष्टीनं निवडलं असावं. ध्यानाकरिता ?—नव्हे मीलना-करिता? नीळकंठ गौरीच्या एकांताकरिता. त्यांच्या गाठभेटीचे संकेत स्थळ म्हणून आदी प्राचीन काळापासून हे स्थान नीळकंठे-श्वर म्हणून प्रसिद्ध आहे. पूर्वी कड्याच्या पायथ्याशी स्वयंभू शाळुंका होती असे सांगतात. शिवशक्तीच्या मीलनाचे हे प्रतीक. त्यानी मागं ठेवलेली निशाणी. ह्या निशाणीचाच नीळकंठेश्वर झाला, आणि या स्थानाला शिवालयाचं महत्व आलं. मूळ बुतखान्याला काब्याचं स्वरूप प्राप्त झालं खरं, पण खरी ही मूळ जागा मील-नाची, विहाराची. नीळकंठ गौरी म्हणजे निसर्गाच्या या नितान्त रम्य एकान्तात विहार करणारं प्रथम मिथुन, पहिलं मेहुण.

—मन पुन्हा इतिहासात भटकू लागलं. नीळकंठ गौरीप्रमाणेच ह्या जागेला भेट देणारी, गतेतिहासातील अनेक मेहुणं डोळ्या-पुढून गेली. मनात आलं परमारांच्या राजवटीत राजघराण्यातल्या अनेक तरुण-तरुणी या शिवालयाच्या संकेत स्थळी आल्या असतील. एकांत करण्याकरिता, प्रेमाच्या आणाभाका घेण्याकरिता. माळव्याचे पण इतिहासातील प्रसिद्ध मेहुण म्हणजे बाजबहादुर रूपमती. आपल्या प्रिय हिंदु पत्नीच्या श्रद्धेखातर नर्मदेची गंगा ज्यानं मांडवगडला आणली त्यानं नीळकंठेश्वराच्या ह्या हिंदु काब्यालाही तेवढ्याच श्रद्धेनं भेट दिली असेल—रूपमतीला बरोबर घेऊन. अनेक वेळा ते या एकांताचे रहिवासी झाले असतील.

—या जागेला प्रिय असलेला हा एकान्त ओळखूनच अकबराच्या राजवटीत, माळव्याचा मोगल सुभेदार शहाबदखखान याने प्राचीन शिवालयाच्या ठिकाणी कड्याच्या पायथ्याशी एक अर्धवर्तुळाकार इमारत बांधली, ऐशगाह म्हणून—आरामाचे उन्हाळ्याच्या तलखीत श्रांत होण्याचे ठिकाण म्हणून. कड्यालागूनच मोगली पद्धतीनं बांधलेली इमारत आज दिसते ती हीच. रचनेनं अर्धचंद्राकृति—मोगली महिरपदार कमानींच्या लहानमोठ्या खणांची, मोगली वास्तु सांप्रदायाच्या साऱ्या खुणा दाखविणारी.

प्राचीन शिवालयात कड्याच्या शिखरावर असलेल्या कुंडातून येणारे पाणी पिंडीवर पडण्याची व्यवस्था होती. या मोगली इमारतीत—पिंडी हालवून, तेंच पाणी तिरक्या बसविलेल्या खोवणीच्या संगमरवरी शिळेवरून खळखळत खाली वाहून—इमारतीसमोरील छोट्याश्या फरसबंदी प्रांगणात बांधलेल्या कुंडात सोडले जातें—व ते कुंड भरले की तेच पाणी पुढे वेलबुटीदार नक्षीच्या पाटांतून मोठ्या कौशल्याने खेळवून शेवटी समोरच्या खोल दरीत सोडले जाते. पाण्याचा हा मनोहर खेळ आजही पाहिला की वाटतें—"पाणी खेळवावे मोगलांनीच!"

**चिमाजीअप्पांची दिलैदारी !**

शहाबदखखानने शिवालयाचे—विलासगृह केले आणि सारी इमारत विलासाच्या सुखसोयीनी समृद्ध झाली—एकान्ताकरिता—मोगलसम्राटांच्या विलासाकरिता. मोगल रियासतीत—नीळकंठे-श्वराची निशाणी—अक्षरशः नांवापुरतीच शिल्लक राहिली. कारण या जागेचा उल्लेख साऱ्याच मोगल सम्राटांनी 'नीळकंठ' म्हणूनच केला आहे.

सम्राट अकबर आपल्या परिवारासह येथे दोनदा राहून गेला. जहांगीर तर या जागेवर बेहद्द खूष होता—नूरजहानसह येथे येऊन त्याने वास्तव्य केले—व आपल्या आत्मवृत्तात नीळकंठाच्या मनोरम सौंदर्याचा आवर्जून उल्लेख केला. शहाजहानही अनेकदा येथे येऊन राहिला. कुणी सांगावे?—मांडवगड येथील होशंगशहाच्या कबरीची संगमरवरी वास्तू पाहूनही त्याला ताजमहाल बांधण्याची कल्पना सुचली असावी.

—थोर पराक्रमी, रसिक, प्रेमी व्यक्तींनी या स्थानाला भेट देऊन श्रान्त व्हावं हेच या स्थानाचं महात्म आहे. ही इमारत बांधण्याचा शहाबदखखानाचीही तीच इच्छा होती. इमारतीच्या मधल्या खणाच्या आतल्या महिरापीवर एक फारसी लेख त्यानं लिहून ठेवला आहे—

"तवाह करदन् तमामे उम्रराह मसरूफ आबो गिल .
कि शायद् यक दमे 'साहब दिले' आज य कुनद्म मंझिल"

माझी सारी उमर मी 'बांधण्यात' घालविली, ते एकाच आशेनं की मी बांधलेल्या या घरात, कधीतरी, योगायोगानं एखादी 'साहब-दिल' व्यक्ति येथे येऊन, क्षणभर का होईना, टेकावी म्हणून.

शहाबदखखानाची इच्छा येथे आलेल्या साऱ्यांच साहब-दिलांनी सार्थ केली. किंबहुना येथे आलेल्या प्रत्येकानं 'साहबदिल' बनावं असाच या जागेचा वर आहे. येथे बुतपरस्त आले, बुत-शिकनही आले—परंतु यांपैकी कोणीही या जागेच्या मांगल्याला ढळ दिला नाही. मांगल्य काब्याचे तसेच बुतखान्याचेही.

अठराव्या शतकात, दयाबहाद्दर आणि गिरधरबहाद्दर या मोंगली सुभेदारांचा पाडाव करून मराठ्यांच्या सैन्याने चिमाजी आप्पाच्या अधिपत्याखाली माळवा काबीज केला व मांडवगड मराठ्यांच्या हवाली झाला. चिमाजीने नीळकंठाला भेट दिली व मोगली इमा-रतीच्या मधल्या खणात संगमरवरी शिवपिन्डीची पुन्हा स्थापना केली. मोगली राजवटीत बसविलेल्या काब्याच्या संगमरवरी शिळे-वरून खळखळत खाली येणारे पाणी पुन्हा शिवपिंडीवर धार धरून वाहू लागले. नीळकंठेश्वराचा काबा पुन्हा सिद्ध झाला; सभोवता-लच्या बुतखान्याच्या वास्तूत. पिंडीची प्रतिस्थापना करते वेळी भोवतालची मोगली वास्तू पाडून त्याठिकाणी मंदीर बांधावे असा आग्रह चिमाजीबरोबरच्या काही मंडळींनी धरला. त्यावर चिमा-जीने—माहिरापीवर लिहिलेल्या वरील फारसी लेखाकडे बोट दाख-वून विचारले—"हा लेख वाचलात? साहेबदिलांनी येथे येऊन वास्तव्य करावं म्हणून ही इमारत बांधली गेली. आज आम्ही ती मुद्दामपणे उध्वस्त केली तर ती बांधणाऱ्याच्या हिशेबी आम्ही—छत्रपती शाहूमहाराजांचे सेनापती, काय ठरू?" काब्याबरोबर बुतखान्याची कदर करणारा हा मराठा सेनानी शहाबदखखानाच्या हिशेबी 'साहबदिलच' ठरला असता.

काबा आणि बुतखाना!— बुतखाना की काबा?—एकाचा काबा तोच दुसऱ्याचा बुतखाना!!!...की दोन्हीही एकच???—विचाराच्या तंद्रीत असतानाच माझं लक्ष इमारतीच्या एका भितीवर गेलं. तिथं कोणीतरी लिहिलं होतं—यशोदा—जयदेव

मी एकदम उद्गारलो—"नीळकंठेश्वराला भेट देणारं हे आणखी एक मेहुण!!...तेवढंच साहबदिल!"

◊ ◊ ◊



अनुक्रमणिका




--शरद्‌चंद्र वासुदेव चिरमुले

**फूल ठेऊन त्यानी देवाचा कौल मागितला. कौल डावा मिळाला. त्यांचा थरकांप झाला. डोंगर निर्मनुष्य होता. ऊन कडक होते. सर्वत्र रातकिड्यांचे माध्यान्ह गायन चालले होते आणि देवळाचा कळस सागाच्या वनातून वर थरारत होता...**

शास्त्रीबुवांनी पोथी गुंडाळून पेटीत ठेवून दिली.

दुपार कलंडून गेली होती. तिरप्या उन्हानी सभामंडपाच्या खिडक्यांवरील मेहेरपीतल्या निळ्या-तांबड्या कांचा लखलखीत झाल्या होत्या.

"अरे हा गेला कुठं ? इतक्यात तर होता !" असे स्वतःशी पुटपुटत शास्त्रीबुवा उठून सभामंडपाबाहेर आले. नातू बाहेरहि दिसेना. घाबरेघुबरे होऊन ते देवळामागे आले.

देवळामागे प्रशस्त चिरेबंदी पुष्करणी होती. हा व्रात्य पोरगा नेहमीसारखा पुष्करणीत उतरला की काय ? शास्त्रीबुवांची नजर जांभळीकडे गेली. शास्त्रीबुवांचा नातू जांभळीवर चढला होता आणि पुष्करणीवर वाकलेल्या एका फांदीवर जाऊन जांभळीचा घोस तोडू पहात होता. त्याचेहि आजोबांकडे लक्ष गेले.

"पुरुषोत्तम, अरे वेडा की काय तू ? उतर, उतर, पडशील ना !" शास्त्रीबुवा कापऱ्या आवाजात उद्‌गारले, "चल इकडे ये."

पुरुषोत्तम झाडावरून उतरून हसत शास्त्रीबुवांपुढे आला.

"बघू हात ?" शास्त्रीबुवा म्हणाले.

त्याने तळवे दाखवले झाडावरून घाईने उतरताना ते लाल लाल झाले होते. एकदोन ठिकाणी सालडीहि निघाली होती. हातावरली आयुष्यरेषा मात्र कशी प्रदीर्घ दिसत होती. त्याचे हात उपरण्याने पुशीत शास्त्रीबुवा म्हणाले, "पुरुषा, अरे काय म्हणायचं तुला ? कुठल्या कुठं उंच चढला होतास ?"

"मग आम्हाला जांभळं ?"

"अरे मी काढून दिली असती. जा आता घरी. आजीला म्हणावं, चहा कर."

पुरुषोत्तम उड्या मारीत घराकडे पळाला.

शास्त्रीबुवानी अवती भवती नजर टाकली. आपली पोथी चालली असता खरोखर पुरुषोत्तम झाडावरून पडला असता तर ? पडल्याचे काहीच न समजते तर ? पुष्करणीने त्याला मुकाट गिळून टाकला असता, आणि बाजूच्या रातांब्यानी, पळसानी आणि फणसानी ते मुकाट्याने पाहिले असते.

शास्त्रीबुवा शहारले. पुष्करणीकडे पहात ते विचारात मग्न झाले.

पुष्करणीत बराच गाळ साचलाय. चिरेहि निखळलेत.

कदंबेश्वराला पुरेशी फुले मिळत नाहीत. वठलेली फुलबाग पुन्हा नीट लावायला हवी.

विहिरीवरचा रहाट मोडकळीला आलाय.

कळसाला नवा रंग काढला पाहिजे. पावसात थोडा गळतोहि.

कितीतरी गोष्टी करायला हव्यात.

शास्त्रीबुवा सभामंडपाकडे आले, आणि पायऱ्यांवर टेकले. समोरून पोस्टमन येत होता.

"काय एकनाथ, काय टपाल आणलंस बाबा ?" शास्त्रीबुवानी विचारले.

'संस्कृत प्रबोधिनी'चा नवा अंक, कोण्या भक्ताची अकरा रुपयांची मनी ऑर्डर. कसल्याशा संकल्पासाठी देवाला अभिषेक करण्याची कूपनात विनंति. गिचमीड अक्षरांचे एक कार्ड. 'ईश्वरेच्छा बलीयसी असेच म्हणायचे... आपण तरी काय करणार ?' एकदोन ओळी वाचून शास्त्रीबुवानी कार्ड बाजूला ठेवले. मनी ऑर्डर सही करून घेतली आणि ते संस्कृत प्रबोधिनीचा अंक चाळू लागले.

"नमस्कार करतो शास्त्रीबुवा."

"कल्याण, कल्याण," शास्त्रीबुवा उद्‌गारले आणि त्यानी अंक बाजूला ठेवून वर पाहिले. चाळीशीतला एक गृहस्थ त्यांच्यापुढे उभा होता. बरोबर त्याची पत्नी होती. तिच्या कडेवर आठदहा महिन्यांचे, गुरफटून घेतलेले मूल होते. तिने ते नवऱ्याजवळ दिले आणि शास्त्रीबुवाना नमस्कार केला.

"सौभाग्यवती भव." शास्त्रीबुवा दोघांकडे पाहू लागले. ओळखीचा धागा सापडेना. पण मनुष्य कुठेतरी पाहिला आहे असे शास्त्रीबुवाना वाटू लागले.

"आपण ओळखलं नसेल मला, मी ओक," तो गृहस्थ रुमालाने कपाळाचा घाम पुशीत म्हणाला, "पुरुषोत्तमपंत ओकांचा नातू. ही माझी पत्नी." अजून सांधा जुळेना.



"ओक म्हणजे नागपूरचे हो. आजोबा तुमच्याबद्दल पुष्कळ सांगत असत आम्हाला."

"आलं लक्षात" शास्त्रीबुवा म्हणाले, "सांगलीच्या पाठशाळेत होतो. तेव्हापासून पुरुषोत्तमपंतांची नि माझी ओळख. फार लांबून आलात हो."

"खरंच बाई, फार लांबचा प्रवास आहे." ओकांची पत्नी म्हणाली.

"मुंबईहून बेळगाव. बेळगावहून बस. पुन्हा पांच सहा मैल बैलगाडी."

"पुरुषोत्तमपंत कसे आहेत ?"

"दोन वर्षांमागं वारले ते. फार थकले होते."

"अस्सं! वाईट झालं. शास्त्रीबुवा उद्गारले, "आपल्या वडिलांचं सुद्धा वय आता बरंच असेल नाही ?"

"छे. हो. माझे वडील लहानपणीच गेले. सहा वर्षांचा होतो मी. मला ते आठवतच नाहीत. आजोबानीच आम्हाला वाढवलं," ओक म्हणाले.

"मला वाटलं, आपल्याला माहीत असेल."

"हो. हो. आत्ता आठवलं. आताशा विस्मरण व्हायला लागलंय मला. तुमचे वडील तलावात पोहताना बुडाले होते. पुरुषोत्तमपंतांना फार मोठा धक्का बसला होता तेव्हा." शास्त्रीबुवा म्हणाले,

"आपण कुठं असता ?"

"मी आहे इंजिनिअर. मुंबईत नोकरीला असतो. आई नागपुरात असते. तिच्यापुरतं ठेवून बाकीचं घर दिलंय भाड्यानं." ओकानी सांगितले, "कदंबेश्वराला यायचं फार दिवस मनात होतं. कुलदैवतच आमचं. आजोबानी जाण्यापूर्वी तसं सांगितलं होतं. आणि शास्त्रीबुवा, आपणाला मोकळेपणानं सांगायला हरकत नाही, आम्हाला फार वर्षं मूल झालं नाही. आजोबा पोटी जन्माला येऊ देत म्हणजे वर्षाच्या आत तुझी पूजा बांधू असा नवस ही बोलली. आणि गेल्या जुलैत आम्हाला मुलगा झाला."

"आनंद आहे." शास्त्रीबुवा उद्गारले, "पुरुषोत्तमपंतांनी ओकांचा वंश चालू ठेवायचं ठरवलं म्हणायचं."

★★

"कदंबेश्वराची पूजा पूर्ण झाली," आवरा आवर करीत शास्त्रीबुवा म्हणाले "परंतु पूजेची पूर्ण सांगता श्रीशैलेश्वराला जाऊन आल्यावर होते. पाठीमागच्या या डोंगरावर शंकराचे आणखी एक स्थान आहे. कदंबेश्वराला बोललेला नवस फेडला की तिथंहि जाऊन येण्याची रीती आहे. याल ना तुम्ही ? फार नाही, अर्ध्या एक मैलाची सोपी चढण आहे."

"शास्त्रीबुवा सगळं यथासांग द्या. होऊ सगळी श्रद्धा एकवटून मी नवस बोलले होते." ओकांची पत्नी म्हणाली, "तितक्याच मनोभावानं तो फेडायला हवा."

"बाळाला बरोबर घेतलं पाहिजे."

"घेऊ या ना." ओक म्हणाले.

"ठीक आहे. आपण जाऊ या. डोक्यावर मात्र आच्छादन घ्या. उन्ह आहे."

शास्त्रीबुवा पूजेचे तबक घेऊन डोंगर चढू लागले. त्यांच्या मागे ओक मुलाला घेऊन सपत्निक चालू लागले. शैलेश्वराची पूजा झाल्यावर शास्त्रीबुवा ओकांना म्हणाले, "इथून सगळा आसमंत दिसतो. वातावरण स्वच्छ असेल तर समुद्राची कडहि केव्हातरी चकाकताना दिसते."

"शास्त्रीबुवा, काय रम्य ठिकाण आहे!" ओक उद्गारले, "आपण आम्हाला इथं आणलंत हे फार छान झालं. नवसाची भानगड नसती तर आम्ही काही वर आलो नसतो. पण येऊन डोळे तृप्त झाले."

"सावकाश उतरा." शास्त्रीबुवानी सांगितले, "उतरताना निसरण आहे. बाळाला नीट घ्या."

"शास्त्रीबुवा, एक विचारलं तर राग नाही ना येणार ?" ओकांच्या पत्नीने विचारले.









अनुक्रमणिका

"विचारा."

"शास्त्रीणबाई अगदी बोलत कां वरं नाहीत ? माझा आपला भडभडो स्वभाव आहे. मी खूप बोलते. त्यांनी मात्र सगळं शांतपणानं ऐकून घेतलं. मग मलाच संकोचल्यासारखं झालं. म्हणून म्हणते."

शास्त्रीबुवानी आवंढा गिळला. त्यांची पावले नकळत झपाटयाने पडू लागली. ते म्हणाले, "पुष्कळ वर्षांपूर्वी त्यांच्या जिभेवरनं वारं गेलंय्. शक्य तर त्या बोलणे टाळतात आणि अलीकडे तर...." शास्त्रीबुवानी वाक्य अर्धवट सोडले म्हणा किंवा सोसाटयाच्या वाऱ्यात ते ओकांच्या पत्नीला ऐकू गेले नाही म्हणा, तिने पुढे काही संभाषण केले नाही.

सवयीमुळे शास्त्रीबुवा जरा झपाटयाने खाली आले. ओक पती-पत्नी सावकाशीने चालत होती. शास्त्रीबुवा एका खडकावर विसाव्यासाठी टेकले. त्यानी वर पाहिले. मुलाला खांद्यावर घेऊन उन्हातून ओक दांपत्य येत होते. ओकांच्या पत्नीच्या चेहऱ्यावर कृतकृत्यता दाटली होती. नवरा-बायकोचे चेहरे सतेज आणि प्रफुल्लित दिसत होते. मूल बापाच्या खांद्यावर झोपी गेले होते.

शास्त्रीबुवाना वाटले कोण कुठली ही नागपूरकडची माणसे ! एका ओढीने येथे आली. नवस पार पडला. संतुष्ट होऊन ही आता परत जातील. हे मूल मोठं होईल. याला मुलंबाळं होतील. घरात त्यांची किलबिल सुरू होईल. तोवर ही नवरा-बायको म्हातारी होतील. मी इथं त्यांच्या कदंबेश्वराची राखण करता करता पुराण-पुरुष होऊन राहिलो आहे. माझ्या वडिलानी तेच केले. आजोबानीहि तेच. ओकांच्या वंशाला दिवा तेवता रहावा आणि कदंबे-श्वराला निरंतरचा राखणदार असावा. खरोखर जगातून माणसाचा पाय काही सहजासहजी निघत नाही. जाता जाता आपलं अस्तित्व तो सृष्टीवर लादून जातोच...

रात्री निजानीज झाली. शास्त्रीबुवा पुढल्या पडवीत घडवंचीवर झोपले होते. वर सोप्यात ओक पती-पत्नी होती. रात्री दहाच्या सुमारास ओकांची पत्नी नवऱ्याला म्हणाली, "अहो, बाळ किती तापलाय बघितलात का ? अस्वस्थ पण झाल य्."

ओकाना गाढ झोप लागली होती. ते दचकून जागे झाले. बाळाच्या कपाळावर हात ठेवून ते म्हणाले, "खरंच की. तू आधी कसं काही बोलली नाहीस ?"

"मघाशी अंग गरम नव्हतंच. एवढ्यात तापला."

शास्त्रीबुवा जागे झाले, त्यानी कंदील मोठा केला.

"काय झालंय ओक ?"

"बाळाला ताप भरलाय हो."

"घाबरू नका," शास्त्रीबुवानी धीर दिला, "एवढ्याशा जीवाला प्रवासाची फार यातायात पडली. श्रमांचा ताप असेल तो. थांबा मी गोळी उगाळून देतो. थोड्या वेळात घाम येईल."

सोप्याच्या पायऱ्या चढून शास्त्रीबुवा वर आले. सोप्यालगतच्या खोलीत शास्त्रीण-बाई झोपल्या होत्या.

"अहो जरा उठता का ?" शास्त्रीबुवा दोनतीनदा हलकेच म्हणाले. उत्तर आले नाही.

"नका उठवू त्याना," ओकांची पत्नी म्हणाली, "त्याना बरीच यातायात पड-लीय् दिवसभर. आपणहि पडा शास्त्रीबुवा."

शास्त्रीबुवानी कोनाड्यातल्या पिशवी-तून गोळी काढली, सहाणेवर उगाळली आणि ते चाटण ओकांच्या पत्नीला देत ते म्हणाले, "आमचं आपलं खेडवळ औषध आहे, परंतु गुणकारी आहे. चाटवा त्याला. लागलं काही तर लगेच हाक मारा. मी जागाच आहे. आणि घाबरू नका. सकाळी ताप उतरेल. काही झालं तरी देवाच्या दारी आहात."

शास्त्रीबुवा अंथरुणावर पडले. झोप येणे शक्यच नव्हते. आढ्याकडे पहात कपाळावर हात ठेवून ते विचार करीत राहिले.

ओक बाळाजवळ बसले होते आणि मधूनच पेंगत होते. शेजारी त्यांची पत्नी होती. ती म्हणाली, "तुम्ही किनी जरा पडा. मी बाळाला मांडीवर घेऊन बसते. तुमची थोडी झोप झाली की उठवीन तुम्हाला."

"पण खरंच उठव हं." ओक म्हणाले आणि अंथरुणावर पडले. खरोखरच ते दमले होते. बघता बघता त्यांचा डोळा लागला.

साडेतीनच्या सुमारास शास्त्रीबुवा उठले. त्यानी वळकटी गुंडाळून ठेवली. ओकांची पत्नी बाळाला मांडीवर घेऊन पेंगत होती.

"काय म्हणतोय् ताप ?" शास्त्रीबुवानी विचारले, "घाम आला का ?"

"नाही हो," ओकांची पत्नी एकदम जागी होऊन म्हणाली, "होता तेवढाच बहुतेक असेल. गुंगीत पडलाय्."

शास्त्रीबुवा मुकाट्याने प्रातर्विधीसाठी बाहेर पडले. विहिरीवरून परत येताना ते दारात थबकले. ऐकू नये, असे माहीत असूनहि आत चाललेले ओक पती-पत्नींचं संभाषण ते ऐकत राहिले.

"औषधांची बॉक्स कां नाही आणलीस?" ओकानी कातावून विचारले.

"किती घाईनं आपण निघालो वरं ? तुमच्या रजेचं शेवटपर्यंत अधांतरी होतं."

"ॲनासिन तरी बरोबर आणायचंस."

"मला वाटलं, नेहमीप्रमाणं तुमच्या खिशात असेल."

"आता इतक्या आडबाजूला येऊन पड-लोय् की तेवढं मिळायलाहि तालुक्याच्या गावी जायला हवं."

ती काही बोलली नाही.

"आपण आत्ता यायलाच नको होतं. उन्हातान्हाचा प्रवास टळला असता." जरा थांबून ओक केसात हात फिरवीत म्हणाले, "दिवाळीनंतर मला जरा जास्त रजा मिळाली असती. पण तुझी प्रत्येक गोष्टीत घाई."

"असं हो काय बोलता ? नवस वेळच्या वेळी फेडायला नको का ? आणि आजोबी




गेल्यापास्नं तुम्हीच इकडं यायचा घोसरा काढला होतात."

क्षणभर गप्प बसून ओक म्हणाले, "सकाळी पूजा-अर्चा होईतो वाळाचं ठीक होतं. शैलेश्वराला जायचं म्हातार-बुवानी उगीच काढलं. डोंगरावर केवढं वारं होतं. तेच त्याला बाधलं—ऊनसुद्धा कमी नाही लागले."

"शास्त्रीबुवांनी काय केलंय त्यात? त्यानी आपली रीत सांगितली."

"त्यानी रीत सांगितलीन् पण तू दुजोरा भरलास ना?"

"म्हणजे मी चुकले, असंच ना?" ओकांची पत्नी रडकुंडीला येऊन म्हणाली.

'उठा उठा हो सकळीक। वाचे वदावा गजमुख' म्हणत शास्त्रीबुवा जणु एकाएकी आल्याप्रमाणे पडवीत शिरले. ओक पती-पत्नींचे संभाषण थांबले.

"मी स्नान करून देवळात रुद्राभिषेकाला बसतो," शास्त्रीबुवा म्हणाले, "आणि अभिषेकाचं तीर्थ बाळाला घेऊन येतो."

पायाखालचे दिसू लागले. शास्त्री-बुवांचा अभिषेक चालला होता. गाभाऱ्यात एका समईच्या प्रकाशाखेरीज सभामंडपात दिवाबत्ती नव्हती...

अकस्मात ओकांची पत्नी गाभाऱ्याच्या दाराशी येऊन उभी राहिली. तिचे डोळे भरलेले होते. तिला केव्हाहि रडू फुटले असते.

"बाळ कुठाय्?"

"यांच्या मांडीवर आहे."

"तुम्ही एकटयाच आलात?"

"काय करू शास्त्रीबुवा," ओकांची पत्नी म्हणाली, "कदंबेश्वराला गाऱ्हाणं घालायला आलेय्" तिचा हुंदका बाहेर फुटला.

"रडू नका."

"होईल ना हो बाळ बरा?"

"होईल हो. साधं थंडीवाऱ्याचं दुखणं आहे ते. तुम्ही उगाच घाबरला आहात."

"तुमच्या तोंडात साखर पडो शास्त्री-बुवा." ती म्हणाली आणि डोळे मिटून तिने देवापुढे हात जोडले. शास्त्रीबुवा स्तब्ध होते. समईच्या प्रकाशात ते एखाद्या पंचरशी धातूच्या पुतळयासारखे दिसत होते.

"काय मागितलंत?"

"माझ्या आयुष्यातली वर्षं देऊन बाळाला बरं कर असं म्हटलं."

"तुम्ही दररोज पूजा-अर्चा करता?"

"हो तर. घरी देव आहेत ना!"

"म्हणजे देव आहेत म्हणून केलं पाहिजे, असं?"

"नाही. नाही. माझ्या माहेरापासून देवाधर्माचा संस्कार मला मिळालाय्. सास-रीच कदाचित् थोडंफार—"

"देवाधर्माची जबाबदारी वाटते?"

"म्हणजे?"

"म्हणजे असं की देवधर्म पाळला नाही तर काही अनिष्ट घडेल असं वाटतं? म्हणून देवधर्म करायचा?"

"काहीसं असंच."

"म्हणजे कदंबेश्वराची भीति वाटली?"

"भीति कशी?"

"नाहीतर काय? एरवी तुम्हाला नवस फेडायची इतकी हुरहूर कशाला लागली असती? परमेश्वराचं देणं देऊन टाकलं पाहिजे अशीच रुखरुख होती की नाही पोटात?"

"आपण ऋणी झाल्यावर रूखरूख वाटतेच."

"परमेश्वराच्या ऋणाची रुखरुख कां वाटावी?"

ओकांची पत्नी काही बोलली नाही.

"समजा, नवस फेडला नसतात तर काय झालं असतं?"

"ते मी कसं सांगू?"

"कदंबेश्वरानं क्षमा केली नसतीन् असं वाटतं?"

"शास्त्रीबुवा, असा काही विचारच मी केलेला नाही," ओकांची पत्नी म्हणाली, "आपण सगळं आपल्या परीनं करायचं. शेवटी परमेश्वर काय ठरवील ते होणार असतंच."

तितक्यात ओक आत आले. त्यांचा चेहरा कावरा-बावरा आणि व्यग्र होता.

"भग बाई, तुम्ही आलात? बाळ कुठाय्?"

"त्याला शास्त्रीणबाईंनी घेतलंय. ताप किंचित् वाढलाच आहे. शास्त्रीणबाईनी चहा केला. मला दिला. त्याला दोन चमचे पाजलाय्."

"ताप वाढल्यासारखा वाटतोय?" ओकांची पत्नी डोळे फुगीत म्हणाली.

"सूनबाई," तिला प्रथमच असे संबोधून शास्त्रीबुवा म्हणाले, "परमेश्वराची भीति आणि परमेश्वरावर टाकलेला भार यातला फरक तुम्ही अनुभवलेला नाही. कारण तुम्ही अजून परमेश्वरावर कधी भार टाकलेला नाही."

"म्हणजे काय शास्त्रीबुवा?" ओकानी अस्वस्थ स्वरात विचारले.

"मुलासाठी तुम्ही कदंबेश्वराकडे धाव घेतलीत. आता कदंबेश्वरालाच मुलासारखं मानलंत म्हणजे देवावर भार कसा टाकता येतो ते समजेल."

पतीपत्नी शास्त्रीबुवांकडे पहात राहिली.

"तुमचं हे बाळ मोठं होईल. जगात वावरायला लागेल. चुकलं माकलं तर त्याला तुम्ही संभाळून घ्याल. आपली मायापांखरं त्याच्यावर घालाल, तसं कदंबेश्वराला आपलं मूल माना. कदंबेश्वर चुकत माकत नाही असं थोडंच आहे?"

"शास्त्रीबुवा, हे सगळं ठीक आहे. कानाला गोड वाटतं." अतिशय सैरभैर होऊन ओक म्हणाले," पण सोळा वर्षांनंतर आम्हाला हे बाळ झालंय ते तापानं तड-फडतंय. आमच्या पोटात काय वेदना होत आहे ते कसं सांगू?"

शास्त्रीबुवा बोलले नाहीत.

"रागावू नका शास्त्रीबुवा," आपल्या बोलण्यातला वैताग जाणवून ओक म्हणाले, "पण इतक्या लांब, आडवाजूच्या मुलुखात आम्ही येऊन पडलोय्. वससाठी सुद्धा पांच कोस भातखाचरं तुडवीत जावं लागतं. मुंबई दूरच. पण बेळगांव गाठायचं म्हटलं तरी चार तासांचा प्रवास आहे. अशात जर बाळाचं दुखणं विकोपाला गेलं—"

"नको हो असं अभद्र बोलू," ओकांची पत्नी रडत म्हणाली.

"ओक, कदंबेश्वरानं अशी परिस्थिति

















अनुक्रमणिका

निर्माण केलीय् खरी," घसा किंचित् खाकरून शास्त्रीबुवा म्हणाले, "पण तुम्ही स्वस्थ राहा. बाळापाशी जाऊन बसा. मला अजूनहि वाटतंय की दुखणं साधं आहे. तुम्ही चित्त शांत ठेवा. मी श्रीशैलेश्वराला जाऊन ओलेत्यानं अभिषेक करतो. अति-बिकट संकट आलं कीं गांव शैलेश्वराकडे धाव घेतं. माध्यान्हीपर्यंत मी बाळाला तीर्थ घेऊन येतो.

"चला हो, आपण बाळापाशी बसू," ओकांची पत्नी नवऱ्याला म्हणाली,

"मलाहि आतनं वाटतंय, शास्त्रीबुवां-सारख्या माणसाचा शब्द खोटा व्हायचा नाही."

"नाही नाही सूनबाई," भिंतीचा आधार घेऊन उठून उभे रहात शास्त्रीबुवा म्हणाले, "तशी ग्वाही मात्र देऊ नकोस. तशी कुणी कुणाची ग्वाही देऊ नये."

शैलेश्वराचा अभिषेक आटपला. आसना-वरून उठताना शास्त्रीबुवानी मनोभावे प्रार्थना केली, "शैलेश्वरा, भक्त संकटात आहे. तूच लाज राख. माझं आयुष्य देऊन या मुलाचं दुखणं बरं कर. तुझ्या दर्शनाला आलेली मंडळी भलेपणा देऊन सुखरूप स्वस्थानी पोचू देत."

शास्त्रीबुवानी फूल ठेवून देवाचा कौल मागितला. कौल डावा मिळाला आणि शास्त्रीबुवांचा थरकांप झाला.

ते देवळाबाहेर आले आणि दीपमाले-समोरच्या कट्ट्यावर विसावले. शैले-श्वराचा डोंगर निर्मनुष्य होता. उन्ह कडक होते. डोंगराच्या उतारावरून चोहोकडून झाडी दाट होत गेली होती आणि सर्वत्र रातकिड्यांचे माध्यान्ह गायन चाललेले होते. कदंबेश्वराचा पितळी कळस सागाच्या बनातून वर चकाकत होता. शैलेश्वरामागून निघणारा ओढा जवळजवळ आटला होता. खडका खडका-तून करंगळीएवढी धार पाझरत होती.

शास्त्रीबुवाना पौषातला अभिषेक आठ-वला. डोंगरावर त्यावेळी झोंबरा गारठा होता. ओढा कुंडीत चांगला घो घो आवाज करून कोसळत होता. अंगा-वरच्या ओल्या वस्त्रामुळे काकडायला होत होते. त्यावेळी ते असेच माध्यान्ही-पर्यंत देवापुढे बसून डोंगर उतरले होते.

निम्म्या डोंगराखाली आल्यावर शास्त्री-बुवांना घराची कौले दिसू लागली. काय घडले असेल घरात ?

देवळाच्या प्रवेशद्वारापाशी आल्यावर त्यांची पावले जड झाली. जागच्या जागी घुटमळू लागली. प्रवेशद्वारापासून घराकडे पायवाट गेली होती. शास्त्रीबुवा घरा-जवळ आले. मंडपात ओक येरझारा मारीत होते. शास्त्रीबुवाना पहाताच ते म्हणाले, "बाळाचा ताप हाताला जरा कमी लागतोय्. थोडी पेज पण घेतलीन् त्यानं."

शास्त्रीबुवा बोलले नाहीत. समाधान-पूर्वक मान हलवून त्यानी तबक घडवंची-वर ठेवले, आणि स्वयंपाकघराच्या दारात जाऊन शास्त्रीणबाईना उद्देशून ते म्हणाले, "बरं का हो, मी आता एकदम रात्रीच भोजन करीन. माझी पोथी वाचनाची इतक्यात वेळ होईल."

मग ओकांच्या पत्नीपुढे शैलेश्वराचे तीर्थ ठेवून ते म्हणाले, "हे बाळाला घाला."

शास्त्रीबुवा देवळाच्या दिशेने निघाले. चार पावले जाऊन ते परत फिरले आणि ओकाना म्हणाले, "बाळाला उद्यापावतर बरं वाटेल. ताप उतरला की बैलगाडी करून देतो. मोटारनं बेळगांव गांठा. चांगल्याशा डॉक्टरला प्रकृती दाखवा आणि मगच त्याच्या सल्ल्यानं मुंबईला निघा."

शास्त्रीबुवा देवळात आले. सभामंडपात खांबाला टेकून बसले. बसल्या बसल्या त्यानी पायाच्या पिंढऱ्या चेपायला सुरुवात केली. पायात गोळे आले होते.

शैलेश्वराची चढण पूर्वीसारखी आवा-क्यातली राहिली नव्हती.

* *

गाडीवानाला बोलावणे गेले होते.

शास्त्रीबुवा आणि ओक अंगणात माच्यावर बसले होते. सामान बांधून तयार होते.

"अहो, बघितलीत का ही गंमत?" ओकांची पत्नी आतून आली आणि बाळाला नाचवीत म्हणाली, "बघा तरी". बाळाचा ताप पहाटे साफ उतरला होता. त्यामुळे तिचा चेहरा आनंदाने उजळून निघाला होता.

"कसली गंमत बुवा?" ओकानी विचारले.

"दातांचा ताप आला होता बाळाला." ती म्हणाली, "यानं आता तोंडात खडा घातल्यासारखा वाटला म्हणून मी तोंडात बोट घातलं. तर लुच्चा मला चावलान्. ह्या पहा. चांगल्या दोन कण्या हाताला लागताहेत."

"म्हणजे आणखी एक पुढचं पाऊल!" शास्त्रीबुवा म्हणाले, "बाळ वाढायला लागलं!"

गडग्याबाहेर बैलगाडी येऊन थांबली. नातवाचे बोट धरून शास्त्रीणबाई ओस-रीशी आल्या. ओकांच्या पत्नीने शास्त्रीण-बाईंच्या हाती लुगड्याची घडी दिली व नमस्कार केला. त्यानी ती मुकाट्याने घडवंचीवर ठेवून दिली. नातवाच्या हाती ओकानी खाऊसाठी रुपया दिला, आणि खिशातून काही नोटा काढीत ते शास्त्रीबुवाना म्हणाले, "आपली संभा-वना....."

शास्त्रीबुवानी निग्रहाने नकारार्थी मान हलविली. क्षणभराने ते म्हणाले, "माझी संभावना पावलेली आहे. पैसे ठेवून घ्या."

"रागावलात?"

"कशासाठी रागवायचं? अगदी किल्मिषरहित मनानं मी बोलतोय्" शास्त्रीबुवा उत्तरले, "ओक, पुरुषोत्तम-पंताना मी फार मानीत होतो."

ओक काही क्षण स्तब्ध राहिले. गाडीत चढण्यापूर्वी ते म्हणाले, "बरं आहे. येतो आम्ही. आल्यासारखी आपले चिरंजीव आणि सूनबाई यांची गांठ पडली असती तर बरं झालं असतं."

"हो ना. यजमान उपाध्यायांचं नातं प्रत्येक पिढीत पक्कं झालं पाहिजे." ओकांची पत्नी म्हणाली.

"चिरंजीवांची आता कोणाशीच गांठ

अनुक्रमणिका







कुलकर्णी दाम्पत्य सुखी आहे. त्यांच्या विवाहाला तीन वर्षे झाली. त्यांना अजून मूलबाळ कसे नाही यामागील त्यांची भूमिका समजावून घेण्यासारखी आहे. मुलांच्या बरोबर जबाबदारी येते. त्यांच्या संगोपनासाठी काळजी, कष्ट, वेळ व पैसाही आवश्यक असतो. मुलांच्या शिक्षणाची व इतर गोष्टींची संपूर्ण तरतूद करता न आल्यास नुसती मुले होऊन काय उपयोग? शिवाय वैवाहिक सुखाचा काळ काय पुन्हा येत असतो? म्हणून पहिले अपत्य जरा उशीराच होऊ देण्याचे त्यांनी ठरविले आहे. आपण सुखी असल्याचे ते सांगतात ते यामुळेच.



*कुलकर्णी दाम्पत्य सुखी आहे—*

## तसेच तुम्हीही?













अनुक्रमणिका

होणं शक्य नाही. त्याचे आमचे ऋणानुबंध संपले." शास्त्रीबुवा दाटलेल्या आवाजात उद्गारले.

ओक गाडीत चढावयाचे थांबले.

"म्हणजे?" ओकांची पत्नी पोटात चरर्रं होऊन म्हणाली, "सूनवाईबरोबर ते सासुरवाडीला गेलेत ना? नातू म्हणत होता."

"गेल्या पौषात ते कैलासवासी झाला. पौष शुद्ध अष्टमी." शास्त्रीबुवानी सांगितले.

"अयाई ग!" ओकांची पत्नी कळवळून म्हणाली, "दुखणं तरी काय झालं?"

"तेच कळलं नाही. एक दिवशी उलटीतून किंचित् रक्त पडलं. पुढं चार दिवस सपाटून ताप भरला आणि संपलं. महिन्यापूर्वी सूनवाईला थारेपालट म्हणून माहेरी पाठवून दिली. नातू आमच्या मंडळींच्या संवयीचा आहे. खरं तर आम्हालाच त्याला कुठं धाडणं आता जिवावर येतं. काही तरी सांगून त्याची समजूत काढलीय् झालं." शास्त्रीबुवानी उपरण्याने कपाळ पुसले.

ओक स्तब्ध झाले. त्याना काय बोलावे ते सुचेना. शास्त्रीबुवांचा हात घट्ट पकडून ते कसेबसे म्हणाले, "माझ्या हातून भलतीच चूक झाली शास्त्रीबुवा, काल उद्विग्न मनःस्थितीत तुमच्या जखमेवरच मी नकळत वार केले. तुम्हाला बापाच्या पोटातली वेदना कशी कळणार असं मी म्हटलं. क्षमा करा. पुत्रशोकाचं दुःख तुम्ही पचवलंय हे मला माहित नव्हतं."

"तुम्ही त्रस्त मनःस्थितीत निर्हेतुकपणानं बोललात," ओकांच्या खांद्यावर हात ठेवीत शास्त्रीबुवा म्हणाले, "मी तुम्हाला काही बोललो नाही. बोलणं शक्य नव्हतं. पण शोकानं माणूस वेडा झाला की त्याचं मन कसं स्वैर संचार करतं याचा प्रत्यय मला काल आला. परदुःखात सहभागी होणं ही गोष्ट सर्वस्वी अशक्य आहे, ओक. खरोखरीच कळवळून येतं म्हणून, उपचार म्हणून आपण तसं बोलतो, लिहितो. पण स्वतःच्या दुःखाचं ओझं जो तो स्वतःच वागवीत असतो. पुत्रशोक फार फार कठीण आहे. त्याला जाऊन तीन महिने नुकते होताहेत. या सगळ्या आवारात त्याचं वास्तव्य कोंडून राहिलं आहे. तो नाही हे सत्य. पण तो आहे असे गृहीत धरण्याखेरीज हातून व्यवहार पार पडत नाहीत. देऊळ आणि घर दोन्ही खायला उठतात. ही वेदना कुणाला तरी कळली पाहिजे, कुणाच्या तरी अंतःकरणापर्यंत पोचून तिथं रुतली पाहिजे असं मला अलीकडे सारखं वाटायचं."

"बोलावे किंवा न बोलावे अशा अवस्थेत किंचित् थांबून शास्त्रीबुवा पुढे म्हणाले, "तुमचं बाळ तापलं होतं आणि सूनवाई त्याला मांडीवर घेऊन बसल्या होत्या. पडवीतल्या अंथरुणावर पडून मी विचार करीत होतो. कदाचित् दुर्दैवानं काही अनिष्ट घडलं तर? तर काय होईल? ही पतीपत्नी धाय मोकलून रडतील. कपाळ बडवून घेतील. इथं आल्याबद्दल पश्चाताप पावतील. स्वतःला आणि घरातल्या माणसाला दोष लावतील. आणि अखेरीस कदंबेश्वराचीच इच्छा, कदंबेश्वराच्या दारीच हे अनिष्ट घडायचं होतं, बाळ आपला नव्हताच, तो पुण्यवान् होता, देवाच्या दारी त्याला मृत्यु आला, असलं काही वांझोटं समाधान पदरी बांधून परत जातील. पौषात मी जे भोगलं ते मला त्रयस्थपणानं पहाता येईल."

"शास्त्रीबुवा, कशाला आता हे सगळं ..." ओक त्याना थांबवीत म्हणाले.

"अजून संपलं नाही," शास्त्रीबुवा बोलतच राहिले, "तुम्ही मला कां क्षमा केली पाहिजे ते तुम्हाला कळायला हवं, ओक. मी पहाटे उठलो. स्नान करून आलो आणि भर मध्यान्ह रात्रीला असे विचार माझ्या मनात कां आले याचं आश्चर्य करीत राहिलो. मी अभिषेकाला बसलो परंतु त्यात मन लागत नव्हतं. माझा मुलगा आजारी पडला तेव्हा कदंबेश्वराला मी म्हणालो होतो, मी कुणाचं कधी वाईट चिंतलं नाही. यावेळी मला तसं म्हणायचा अधिकार नव्हता. तुमच्या पत्नी पहाटे देवळात आल्या. त्याना धीर द्यायलाहि मी पात्र नाही असं मला वाटायला लागलं. तुम्ही इतक्या दूरवरनं नवस फेडायला आलात. पदरी भक्तिभाव बांधून आलात. काहीहि असलं तरी मी तुमचं भलंच चिंतायला हवं होतं. पण सांगितलं ना, पुत्रशोक मोठा कठीण असतो."

"तुम्हाला फार मनःस्ताप झाला, शास्त्रीबुवा." ओक उद्गारले. यापेक्षा अधिक काही बोलण्यासारखे नव्हते असे त्याना जाणवले.

"आणखी एक सांगायला हवं." शास्त्रीबुवा पुढे म्हणाले, "तुम्हाला वाटलं असेल. तुमच्या बाळासाठी मी शैलेश्वराला जाऊन ओलेत्यानं अभिषेक केला. तसं नव्हतं. शैलेश्वराचा अभिषेक फक्त माझ्यासाठी होता. ओक, मुलाचं निर्वाण झालं त्या दिवशी असाच मी शैलेश्वराच्या अभिषेकाला गेलो होतो. उदंड श्रद्धा पोटी होती, आणि मन निर्विकार होतं. सारं पुण्य पणाला लावून शैलेश्वराकडे मुलासाठी आयुष्य मागितलं. देवानं उजवा कौल दिला होता. पण डोंगरावरून खाली आलो तो घरात आकांत उसळला होता. त्याच्या अगदी जाण्याच्या क्षणी मी त्याला भेटू शकलो नाही. आजहि डोंगर उतरताना माझी पावलं लटपटत होती. श्वास रोखून मी घरापाशी आलो आणि तुम्ही बाळाचा ताप उतरल्याचं सांगितलंत."

ओक स्तब्ध राहिले. शास्त्रीबुवांचा हात त्यानी हातात घेऊन घट्ट दाबला.

"बसा गाडीत. नाहीतर मोटरबस चुकेल." शास्त्रीबुवा म्हणाले, "आणि सूनवाई, बाळाचं उपनयन झाल्यावर पुन्हा एकदा या. आम्ही असू किंवा नसू. पण तुमच्या कुळाची राखण करीत कदंबेश्वर या स्थळी आहे."

शास्त्रीबुवा झपझप पावले टाकीत देवळाच्या दिशेने चालू लागले.

गाडीवानाने बैलांचा कासरा ओढला.














महाराज, या महाराष्ट्र देशी मावळ्यांचा उच्छेद झाला. मराठ्यांस पीडा झाली. रयत अन्नास मोताद....पोटापाण्याची तरतूद नसे....आजवरी महाराष्ट्र धर्म रक्षिला....पण हे काय जहाले !

# शिवाजीची चौथऱ्याहून सुटका!



—जयवंत दळवी

अवघ्या दोन दिवसात त्या भव्य मैदानावर छत्रपतींच्या पुतळ्याचे भव्य उद्घाटन होणार आहे. उभ्या भारतातच नव्हे, तर अख्ख्या आशियात एवढ्या उंचीचा पुतळा नाही. शिवछत्रपतींचा प्रचंड अश्वारूढ पुतळा. सात आठ लाखांचा खर्च. आता जय्यत तयारी झाली आहे. सिमेटाच्या उंच चौथऱ्यावर उधळणारा घोडा. घोड्यावर शिवाजी महाराज.

दोन दिवसातच शिवभक्त प्रधानाच्या हस्ते उद्घाटन. प्रधानांचे भाषण तयार आहे. त्याच्या प्रती आगाऊ वृत्तपत्रांकडे गेल्या आहेत—छत्रपतींची शिकवणूक आचरणात आणा! छत्रपतीनी साधलेले भावनात्मक ऐक्य साधा! छत्रपतींच्या आदेशाप्रमाणे समाजवाद आणा. . .वगैरे!

या घटकेला पुतळ्याच्या चारी बाजूला कापडी पडदे लावून त्याला बंदिस्त ठेवण्यात आले आहे. पुतळा उघड्यावर ठेवला असता तर कदाचित लोकांनी पाहिलाहि नसता. पण तो झाकून ठेवल्यामुळे लोकांचे लक्ष जाते. लोक येतात. पड्दा उचलतात. तो बांधलेला असला तर, पंड्याला भोक पाडतात, आणि वाकून वाकून आत पाहातात. पहाऱ्यावरचे शिपाई कावून जातात. या लोकाना पुन: पुन: पिटाळण्यापेक्षा एकदाचे उद्घाटन केलेले बरे असे त्याना वाटते. एकदा का उद्घाटन केले, की कोणी मुद्दाम लक्ष देखले तरी लोक पुतळ्याकडे पाहाणार नाहीत. एक शिपाई तर उद्घाटन करायला तयारहि होता. पण नोकरी जाईल या भीतीने स्वस्थ बसतो.

मध्यरात्र टळून गेली आहे. सारे लोक झोपले आहेत. पोलिसांची मोटरहि रात्रीची फेरी मारून गेली आहे. त्यामुळे पहाऱ्यावरचे पोलिसहि घरी जातात. पुतळा समितीचा नोकर हिरोजी बेवडा, जायला घर नाही म्हणून, छत्रपतीच्या पायाशी झोपला आहे. अंगावर फाटकी वस्त्रे. बाहेर भरपूर थंडी. कुडकुडत झोपला आहे. पोटात भूक आहे. म्हणून दगडावर पोट टेकून झोपला आहे. हिरोजी जातीचा मराठा. पण पुतळा-समितीत रोजगार मिळाल्यापासून तो स्वत:ला ब्याण्णवकुळी मराठा म्हणवतो आहे. कधी अधिक भाव वाढावा असे त्याला वाटते तेव्हा तो स्वत:ला शाण्णवकुळी मराठाहि म्हणवतो. पुतळ्यावर काम करणारे गरीब कारागीर














जुनी थेटरें, जुने प्रयोग...१

## आमच्या कंपनीत काय काय मिळते ?

नाटक मंडळ्या गावोगावी फिरत असताना नाटकांच्या खेळांच्या उत्पन्नाबरोबर आणखी काही उत्पन्नाच्या बाबी शोधीत असत असे आढळते. दुकानाच्या पाट्या रंगवून देणे नाटक मंडळ्यांना सोपे होते कारण कंपनीचा पेंटर बरोबर असावयाचाच. लग्नकार्य मुंजी इ. प्रसंगी स्वयंपाकासाठी आचारी आणि वाढपी देऊ अशीहि जाहिरात जुन्या हँडबिलात केली आहे.

महाराष्ट्र नाटक मंडळीच्या १९११ सालच्या हँडबिलात पुढील मजकूर छापला आहे.

कंपनीत किटसन दिवे भाड्याने दिले जातील व दुरुस्त केले जातील.

राजापूरकर नाटक मंडळीबरोबर कंपनीचा स्वतःचा छापखाना गावोगावी फिरत होता. त्या कंपनीची १९११ सालची नाटकाची जाहिरात पाहू.

आमचे छापखान्यात सर्व प्रकारचे काम छापून मिळेल.

आमचेकडे वाजाच्या पेट्या पायपेट्या हातपेट्या सायकली विकत मिळतील.

किटसन बत्त्या भाड्याने मिळतील.

गोकाककर संगीत नाटक मंडळीच्या सागरसंगीत गोपीविलास नाटकाच्या १९११ सालच्या हँडबिलात अनेक गमती आढळून येतात.

१. लहान मुलांची जरुरी आहे. मालकास समक्ष भेटावे.
२. आमचे हस्तपत्रकांवर कोणास जाहिरात देणे असल्यास समक्ष मालकास भेटून खुलासा करावा.
३. मंडळीतील कोणत्याही इसमाशी गांवातील कोणीही पैशाचा वगैरे व्यवहार केल्यास त्याची जबाबदारी मालकावर नाही.
४. आमचेकडे वाजाच्या पेट्या विकत मिळतील.
५. आमचे कंपनीत उंची अत्तरे सुवासिक तेले व लव्हेंडरे उत्तम प्रकारची मिळतील. शिवाय गॅसच्या बत्त्या दुरुस्त केल्या जातील व पेंटिंग काम करून दिले जाईल.

—केटी

आणि भुकेलेले गवंडी समोर असतात तेव्हा तो स्वतःला मर्द मराठाहि म्हणवतो! असो.

या घटकेला तो अगदी निवांत झोपला आहे एवढे खरे!

आणि एकाएकी काही तरी भयंकर होते. कडकडाट होतो. एकदम डोंगरकडा तुटावा तसा! चकमकाटाने विजेचे पाते लखलखते. हिरोजीला जाग येते. गडगडाट ढगांचा झाला असे त्याला वाटते. आता पाऊस पडला तर सकाळधर झोपायचे कुठे, असा विचार त्याच्या मनात येऊन जातो. पण डोळ्यावर झोप असते. पुनः गाढ झोपण्यासाठी तो कुशीवर होतो. नंतर उताणा होतो. फक्त एकदाच डोळे उघडून आकाशाकडे पाहातो.

"अरे देवा! महाराऽऽऽज–" अशी किंकाळी फोडून उठतो.

चौथरा चाचपून पाहातो. काय झाले. कळत नाही. डोळे फाडून पाहातो. छे! चौथऱ्यावर चौखूर उधळणारा घोडा नाही. वर पाहातो, छे! शिवाजीहि नाही. अरे बापरे! चौथरा मोकळा. तरी नशीब! चौथरा तरी आहे–एवढाहि एक पुसट विचार त्याच्या मनात येऊन जातो.

"महाराऽऽज—!"

अशी तो पुनः एकदा किंकाळी फोडतो. पण कुणीच ऐकत नाही. मग तो तडक धावत सुटतो. धावता धावता तो स्वतःशीच पुटपुटतो–"तरी बरं! चौथरा जाग्यावर आहे! नाही तर चौथऱ्याचे दगड मीच पळवले, माझं घर बांधायला, असा आळ आला असता...."

तो धावत सुटतो. त्याला घोडा कोण देतो? म्हणून तोच घोड्यासारखा धावतो. पुतळा-समितीच्या अध्यक्षांचे घर गाठतो. सुदैवाने अजून घरात दिवा दिसतो. पत्त्यांचा डाव चालू असावा. घराच्या दारावर तो धडाधड धडका देतो. जणु दिंडीदरवाजाच फोडायला निघाला आहे!

"कोण आहे रे?" आतून अध्यक्ष ओरडतात.

"मी हिरोजी...!" त्याला धड बोलताहि येत नाही.

अध्यक्ष दार उघडतात. पुढ्यात बत्ती ठेवून पत्त्यांचा डाव चालू असतो. बरे झाले! सुदैवाने पुतळा–समितीचे चिटणीस आणि खजिनदारहि डावात आहेत. जोडीला पुतळा तयार करणारे पुतळेकरहि आहेत.

"महाराऽऽज—" हिरोजी धापा टाकीत ओरडतो आणि मग जीभ चावतो. समोर छत्रपती नसून अध्यक्ष आहेत हे त्याच्या लक्षात येते.

"साहेब—" तो पुनः धापा टाकतो.

"अरे! झालं काय? असा म्यालास कशाने?" अध्यक्ष विचारतात.

"साहेब! महाराज पळाले—" हिरोजी रडू लागतो.

"कुठले महाराज?"

**हिरोजी इतका म्याला होता की त्याला क्षणभर महाराजांचे नांव आठवत नाही.**

**"अरे, कुठले महाराज?"**

**"छत्रपती शिवाजी महाराज!"**

**अध्यक्ष, चिटणीस, खजिनदार आणि पुतळेकर सारेजण एकदम खो खो हसतात. हिरोजी त्यांच्या तोंडाकडे पहात राहतो.**

"खरं सांगतो, साहेब! महाराज पळाले!"

"कुठून? आग्र्याहून?" अध्यक्ष पुनः हसतात.

"नाही साहेब! चौथऱ्याहून--"

"कुठला चौथरा?"

"एरवा वपनींग आहे ना?"

"अरे म्हणतोस काय?" चिटणीसांच्या पोटात गोळा येतो.

"तुमच्या पायाशपथ! महाराज पळाले!"

"आणि घोडा?" पुतळेकरांचे तोंड उघडे पडते.

"ते घोड्यावरूनच पळाले!"

"म्हणजे घोडाहि पळाला?" पुतळेकर ताठ होतात.

"होय साहेब!"

"वोंव! वोंव!" असे म्हणत पुतळेकर वाटोळे फिरतात आणि म्हणतात,

"आता कंवक्तीच!"

"काय झालं?" खजिनदार डोळे विस्फारतात.

तरीहि पुतळेकर वाटोळेच फिरतात आणि म्हणतात,

"कंवक्ति! एकवेळ महाराज गेले असते तरी परवडले असते, पण घोडा गेला म्हणजे कंबक्तीच!"

"अहो, पण कां?"

"अहो! तुम्हाला काय कळणार? महाराजांच्या दुप्पट मेटल घोड्यात आहे. शिवाजीच्या दुप्पट खर्चाचा घोडा आहे. घोडा आहे तो घोडा..." असे म्हणत पुतळेकर पुनः वाटोळे फिरतात.

मग सारेजण शिवतीर्थावर जातात. चौथरा चांचपून पाहातात. महाराज आसपास कुठे लपले आहेत की काय याची पाहाणी करतात. आणि थोडा वेळ डोक्याला हात लावून वसतात.

"पण हे असं झालं कसं?" एकमेकाना विचारतात.

"पण हा हिरोजी काय करीत होता?" अध्यक्ष एकदम संतापतात.

"मी सक्त पहारा करीत होतो, साहेब!"

"तू पहारा करीत होतास तर महाराज पळाले कसे?"

"हा लेकाचा कसला पहारा करणार? खातो आणि डारडूर झोपतो!" चिटणीस डाफरतात.

"नाही साहेब! झोपलो नव्हतो! सक्त पहारा करीत होतो!"

"मग महाराज जातील कसे? तू निश्चितच झोपला होतास—"

"नाही हो साहेब! जागा होतो! डोळ्यात तेल घालून पहारा करीत होतो."

"तेल?" खजिनदार जागे होतात. "तुला तेलाचं सँक्शन दिलं कुणी?"

"मूर्ख लेकाचा! झोपला! आता समितीचा अध्यक्ष म्हणून लोक माझ्या तोंडात शेण घालतील शेण–" अध्यक्ष तोंडात शेण पडल्यासारखं तोंड करतात.

"तोंडात शेण घातलं तर ते खाता येईल. मला लोक दगडांनी ठेचतील. लाखो रुपयांचा हा व्यवहार–" चिटणीस ओरडू लागतात.

"सगळीच वोंव आहे! मी खजिनदार आणि तुमची खोटी वावचरे 'पेड अप' करून वसलोय्. आता लोक पुतळा दाखवा नाही तर हिशेब दाखवा म्हणतील." खजिनदार कनवट घट्ट करतात.

"तुम्ही यावेळी वावचरांचे कसले बोलता?" अध्यक्ष चिडतात.

"म्हणजे काय?" खजिनदारहि चिडतात. "अध्यक्ष आणि चिटणीस यांचीच वावचरे अधिक. टॅक्सीभाडे आणि प्रवासभाडे. घरची मंडळी घेऊन तुम्ही निष्कारण दोन दोनदा आग्र्याला ताजमहाल बघायला गेला. वावचरे समितीच्या बोडक्यावर! आता लोक हिशेब मागतील!"

"आग्र्याला जायला नको?"

"कशाला जायचे तुम्ही आग्र्याला?"

"महाराज आग्र्याहून कसे पळाले ते प्रत्यक्ष वघायला नको?"

"महाराज काय तुमच्यादेखत आग्र्याहून सुटणार होते?"

"अरे कसले फालतू वावचरांचे घेऊन बसलात?" पुतळेकर भडकतात.

"फालतू?" खजिनदार डोळे वटारतात. "फालतू? एकेक वावचरात शिवाजीचा एकेक घोडा बसेल! सार्वजनिक कामे ही अशीच! कामे थोडी–वावचरेच खूप!"

"वावचरे!" पुतळेकर कपाळाला हात लावतात. "माझी बिदागी पन्नास टक्के सुद्धा मिळालेली नाही. मिळाली त्यातून घोडा सुद्धा सुटणार नाही"!

"पण आता सुटला ना घोडा?" चिटणीस ओरडतात.

या चर्चेने अध्यक्ष अस्वस्थ होतात आणि मग मोठ्याने ओरडतात,

"अहो, असा भांडणाने आणि चर्चने महाराज परत येणार का?"

तेव्हा महाराज पळून गेले आहेत याची सर्वांना पुनः एकदा जाणीव होते. सर्वजण गंभीर होऊन गप्प होतात. पण अशा गंभीर प्रसंगी गप्प बसणे त्याना इष्ट वाटत नाही. म्हणून अध्यक्ष एकदम हिरोजीच्या अंगावर उलटतात,

"हा हिरोजी महामूर्ख! याच्यामुळे महाराज हातचे सुटले!"

"नाही साहेब! मी जागा होतो!"

"जागा होतास तर महाराज पळाले कसे?"

"चौथऱ्यावरून घोड्याने उडी टाकली–"

"पण तू ओरडायचं तरी—"

"ओरडलो – ओरडलो, साहेब! खबर-











दार पुडे जाल तर–असाहि इशारा दिला!"

"मग?"

"तर त्यांनी तलवार उपसली–"

"खोटे, साफ खोटे–" पुतळेकर ओरडतात, "मी म्यानात तलवार ठेवलीच नव्हती. म्यानावर नुसती तलवारीची मूठच होती!"

"असेल हो!" हिरोजी म्हणतो, "त्याच्ये नुसतं म्यानचं गरगरा फिरविली असेल. काळोखात कुठं दिसायला?"

"पण तू मर्द मराठा म्हणवतोस! तू लढायला हवे होतेस–"

"कसला लढणार मी? माझेच कपाळ फुटले असते."

"अरे, निदान कां पळताय एवढे तरी विचारायला हवे होतेस?"

"अहो साहेब, विचारायला सवड तरी हवी? महालक्ष्मीवर पळाल्यासारखे घोडे पळाले."

"हे पहा, या चर्चेत आता अर्थ नाही!" चिटणीस आदेश देतात. "आपण महाराजांचा पाठलाग केलाच पाहिजे. नाहीतर घोड्यासकट आम्ही महाराजांना गिळले असा आमच्यावर आरोप व्हायचा. चला... चला...पळा...पळा..."

सगळे धावत सुटतात. हिरोजी मध्येच "हर हर महादेव" असे ओरडतो.

मध्येच श्वास घेण्यासाठी सगळे थांबतात. तेव्हा अध्यक्ष वळून म्हणतात,

"अरे हिरोजी, आम्ही आपले घोड्यासारखे धावतोय. गाढवा, महाराज कुठल्या दिशेने गेले ते तरी सांग–"

"उत्तरेकडे गेले साहेब—"

"मग आम्ही दक्षिणेकडे कां पळतोय?"

"दक्षिणेकडे कुठे? आम्ही हे पूर्वेकडे पळतोय."

"दिशा झक मारू दे! अरे गाढवा, बोट दाखवून दिशा दाखव."

हिरोजी बोट दाखवतो. कुठे तरी दाखवायचे म्हणून दाखवतो. कारण महाराज गेले तेव्हा तो झोपला होता.

"पाहा! म्हणजे आपण उलट्या दिशेने धावत होतो."

"पण आपण याच दिशेने धावू!" खजिनदार सुचवतात.

"कां?"

"या दिशेला फळांचं मार्केट आहे."

"फळांच्या मार्केटाशी महाराजांचा संबंध काय?"

"भुकेले असतील म्हणता?"

"छे हो! फळांचे पेटारे येतात जातात!" खजिनदार म्हणतात.

"पण महाराज मिठाईच्या पेटाऱ्यातून पळाले ना?"

"हल्ली कुठे मिळणार त्यांना मिठाईचे पेटारे? गेले तर फळांच्या पेटाऱ्यातून–चला——चला!"

सर्वांच्या डोक्यात प्रकाश पडतो. सर्वजण धावत सुटतात आणि मार्केटात जाण्या-येण्याच्या दरवाजावर गुप्त हेरासारखे उभे रहातात. तेवढ्यात एक ट्रक येऊन थांबतो. ट्रकमधून मोठाले पेटारे उतरले जातात. एकेक हमाल डोकीवर पेटारा घेऊन जाऊ लागतो तो दरवाजापाशी येताच अध्यक्ष हळूच हटकतात,

"काय आहे आत?"

"मोसंबी!"

"खोटे! उघडून दाखव!"

"अरे हट्!" असे म्हणून हमाल अध्यक्षांना कोपरानेच बाजूला लोटतो. तसे ते कोलमडतात. त्यामुळे पेटाऱ्याच्या तपासणीसाठी पुढे जाण्याचा कुणाला धीर होत नाही. पण हमाल कोपराने ढकलील या भीतीने आपण पुढे होत नाही असे कुणाला वाटायला नको म्हणून चिटणीस मागे सरत म्हणतात,

"जाऊ देत हे पेटारे. सुरवातीच्या पेटाऱ्यातून फळेच असणार. मधलाच एखादा पेटारा तपासा–"

"तपासा काय?" अध्यक्ष चिडतात, "हमालाने पेटारा उघडून तरी दाखवायला पाहिजे?"

तेवढ्यात खजिनदार युक्ति योजतात.

"निरोजी–दत्ताजी–राघोजी—" अशी नांवे घेऊन खजिनदार हाका मारीत सुटतात.

"हे काय चालले आहे?"

"आग्र्याहून पळताना शिवाजीबरोबर निरोजी, दत्ताजी, राघोजी हे सेवक होते."

"मग?"

"त्याना हाका मारतोय. असले तर चुकून ओ देतील. मग त्याच्याच डोकीवरचा पेटारा उघडायचा!"

तेवढ्यात हिरोजी चौकशी करून येतो आणि सांगतो,

"साहेब, हा मोसंब्यांचा ट्रक अहमदनगरहून आलाय्."

ते ऐकताच अध्यक्ष सर्वांवर भडकतात.

"कमाल आहे तुम्हा लोकांची! बाहेरगांवाहून येणाऱ्या ट्रकने महाराज कसे येतील? बाहेरगांवी जाणारा ट्रक पाहिला पाहिजे."

"चला. भलत्या फंदात पडू नका!" पुतळेकर म्हणाले, "माझ्या शिवाजीची उंची सोळा फूट आहे. या दोन फूट लांबीच्या पेटाऱ्यात ते कसे बसतील? आणि एवढा मोठा घोडा कुठं ठेवतील? चला—!"

चला म्हणताच सारे चालत रहातात. अध्यक्ष तोंड मिटून चालतात. हमालाने 'चल हट्' म्हटल्यामुळे त्यांचा अपमान होतो. शिवाय त्याने कोपर मारल्यामुळे कुशीत दुखापत होते. बाकीचे सर्वजण बारकाईने पाहाणी करीत रस्त्याला लागतात. फिरफिर-फिरतात. मध्येच समितीच्या वावचरांवर सारेजण हॉटेलात चहा–पाणी आणि भोजन सुद्धा करतात. पुनः भ्रमंती सुरू करतात.

संध्याकाळ होता होता मात्र ते हताश होतात. पण आता एक शेवटचा प्रयत्न करावा असे ठरवतात.

मध्येच एका इसमास अडवून चिटणीस विचारतात, "येथून एखादा घोडेस्वार जाताना आपण पाहिला काय?"

तो म्हणतो, "होय!"

"कुठल्या दिशेने गेला?"

"याच रस्त्याने–"

"किती वेळ झाला?"

"पंधरा मिनिटे झाली!"

"दाढी होती?"–खजिनदार खात्री करून घेतात.

"कोणाला?"

"स्वाराला—"

"पाहिली नाही. या दिशेने जा. जरा धावलात तर सांपडेल!"

म्हणून सर्वजण धावत रहातात. ते असे कां धावत आहेत ते कुणाला कळत नाही. पण लोक बघत रहातात 'काय घोडे धावताहेत!' असेहि कोणीतरी म्हणतात आणि हंसतात.

थोडे पुढे जातात तर दुरून गॅसवत्त्यांच्या प्रकाशात एक मिरवणूक जाताना दिसते. ती मिरवणूक पाहून खजिनदार हातपाय गाळतात.

"अरे देवा, आम्ही फसलो."

"आता काय झाले?" अध्यक्ष विचारतात.

"कात्रजची दिशाभूल!"

"म्हणजे?"

"एका दिशेने बत्त्या जाणार, तर महाराज दुसऱ्या दिशेने पळणार–"

"हे बघा, आता आम्हाला आणखी धावडू नका!" अध्यक्ष वैतागतात.

तेवढ्यात खजिनदार ओरडतात—

"तो पाहा स्वार! डोक्यावर मोठी जरीची छत्रीहि आहे. छत्रपतीच ते. पळा पळा–"

"हर-हर महादेव!" हिरोजी मध्येच चेव येऊन ओरडतो.

सर्वजण पुनः धावू लागतात.

मिरवणुकीत बरेच लोक होते. मध्यभागी घोड्यावर स्वार होता. त्याच्या डोकीला बाशींग होते.

"अरे ही लग्नाची मिरवणूक आहे!" अध्यक्ष पुनश्च हताश होतात.

"शिवाजी एकदा लग्नाच्या मिरवणुकीत सामील होऊन पळाले होते. त्यांना ही संवय आहे!" खजिनदार आपले इतिहासाचे ज्ञान दाखवतात.

सर्वजण लग्नाच्या वरातीत सामील होतात. जमेल तेवढी हेरगिरी करतात.

म्हण जेव्हां सर्वांकडे चोरट्या नजरेने पाहातात. मध्येच त्याना एक दाढीवाला दिसतो. त्याच्या अंगावर सुरवार, लांब कोट आणि डोकीवर जरीचा फेटा असतो. नाकहि टोकदार दिसते. हेच महाराज असावेत. खजिनदार आपल्या साथीदाराना डोळयाने खूण करतो. सर्वजण त्या दाढीवाल्याच्या भोवती घेरा घालतात आणि तसेच बोलत रहातात.

"महाराज–" मध्यच चिटणीस हाक मारतात, अगदी हलक्या आवाजात! आणि त्याच्याकडे पाहात महाराज मंद स्मित करतात.

चिटणीस सर्वांना पुनः डोळयाने खूण करतात. हेच ते अशी मान हालते. त्यासरशी सर्वांची छाती धडधडते आणि सर्वांच्या अंगाला बेसुमार घाम सुटतो.

वरात एका भव्य वाड्यापाशी थांबते. आता कसोटीचा काळ! हिरोजी तर 'हरहर म्हादेव!' असे ओठातल्या ओठात पुटपुटतोहि !

महाराज मिरवणुकीतून वाड्याकडे जायला वळतात. त्याना चिटणीस आणि खजिनदार आता धरणार, तोच महाराजच त्यांना धरतात आणि म्हणतात, "छे छे! तुम्हाला असे मध्येच जाऊ देणार नाही. मसाला दूध तयार आहे. ते घ्या आणि जा! अरे घनाजी, या साहेबाना माडीवर घेऊन जा."

खजिनदार घनाजीकडे संशयी नजरेने पाहातो. पण त्यांच्याकडे पाहायला मात्र घनाजीला वेळ नसतो. सर्वांना नजरकैद केल्याप्रमाणे घनाजी त्याना माडीवर घेऊन जातो. खजिनदार भयभीत नजरेने सगळीकडे पाहातात. माडीला खिडक्या खूप असतात. त्या पाहून खजिनदाराच्या छातीत धडकी भरते.

शेजारी बसलेल्या चिटणीसांच्या कानात खजिनदार म्हणतात,

"धोका दिसतोय!"

"कां?"

"बोटे तुटतील, चिटणीस, बोटे तुटतील!"

"कां हो?" चिटणीस बोटे तुटू नयेत म्हणून दोन्ही हातांच्या मुठी आवळून धरतात.

"शाईस्तेखानाची बोटे खिडकीतून पळता पळताच तुटली होती—"

सर्वजण थरकाप घाबरतात. इतके की आसपास इतर मंडळी दूध पीत असताना त्या चौघापांच जणाना बोटांनी कप सुद्धा धड उचलता येत नाही. पण कसेबसे दूध पिऊन उठतात आणि हात खिशात टाकून पळ काढतात. नमस्कारासाठी सुद्धा हात बाहेर काढण्याचा त्याना धीर होत नाही!

आता सर्वजण इतके थकतात की दोन पावले उचलण्याची सुद्धा त्याना ताकद उरत नाही.

"चाललो तेवढे खूप झाले!" मध्यच म्हणतात.

"एवढे चालून थकलात? तर महाराज आग्र्याहून महाराष्ट्रात कसे आले असतील?"

खजिनदाराच्या या प्रश्नाने सर्वांना शरम वाटते. ते पुनः चालू लागतात.

तेवढ्यात नवल घडते.

त्या छोट्या टेकडीवरील शिवमंदिराच्या आवारात झाडाखाली एक स्वार उभा दिसतो. शेजारी उंच घोडा.

"तो पाहा – तो पाहा–"

"होय–होय! तोच घोडा—तेच छत्रपति—" पुतळेकराना ओळख पटते.

सगळे धावत सुटतात. टेकडीच्या पायथ्याशी खिडीसारखा दरवाजा आहे. त्या दरवाज्यापाशी एक तगडा इसम उभा. तो त्याना हटकतो आणि अडवतो.

"तुम्ही कोण? कुठल्या गांवचे?"

"आम्ही महाराजांचे भक्त!"

"जाता येणार नाही! मागे फिरा..."

त्यासरशी खजिनदार खिशातून दहा रुपये काढतात आणि पहारेकऱ्याच्या हातावर ठेवतात. पैसे घेऊन पहारेकरी रस्त्याला लागतो.

सर्वजण टेकडीच्या पायऱ्या चढून वर येतात.

"गोधर्म प्रतिपालक हिंदुपदपातशाही संरक्षक श्रीमंत छत्रपति शिवाजी महाराज की जय—"

सर्वजण एकसाथ ललकारतात आणि सपशेल लोटांगण घालतात.

त्यांना पाहून महाराज चमकतात.

"तुम्ही कोण?" करडी वाणी कानावर पडली.

"आम्ही आपले सेवक, महाराज!" चिटणीस म्हणतात, "मी शेजी प्रभूंचा वंशज!"

ते ऐकून बाकिच्यांना राग येतो. ही वशिलेबाजी त्याना सहन होत नाही. पण आपणहि वशिला लावावा म्हणून प्रत्येक जण तानाजी, मूरारबाजी वगैरेंची सुचतील तशी नांवे घेतात.

"थोडक्यात आम्ही मर्द मराठे!" अध्यक्ष सांगतात.

"सांप्रत सर्वच मराठ्यांना मर्द म्हणण्याचा रिवाज आहे काय?" महाराज विचारतात.

सर्व मर्द मराठे खंगतात. त्यांना क्षणभर बोलताच येत नाही.

"आपण इतक्या सहजतेने गडावर कसे पावलात?"

"पराक्रमाची शर्थ केली महाराज–"

"पहारेकऱ्याने हटकले नाही?"

"हटकले महाराज! पण त्याच्या हातावर दहा मोहोरा ठेवल्या–"

"आई भवानी!" महाराज विषण्ण झाले. "हे काय जाले? प्राण गेले तरी जावोत. आज्ञा पालन करावे. आज्ञेत चालावे असे पहारेकऱ्यास वजावून आम्ही सांगितले. राजे यांस भय काही लागू देत नाही. हे संकट परिहार करतो. असे बोलिला. खातरजमा जाली म्हणोन आमी वर आलो! आणि हे काय जाले—"

"झाले गेले जाऊ द्या, महाराज! सांप्रत मोहोरा देऊनच काम होते!" अध्यक्ष सांगतात आणि हात जोडून उभे रहातात.

"मोहोरा घेऊन माणसे वाटतात! तानाजी मालुसरे, बाजीप्रभू देशपांडे, अरे त्यांना करोडो मोहरा मिळत्या! पण त्यानी राजियास दिलेल्या शब्दाखातर

अनुक्रमणिका







जिवाची खिरापत केली. त्यांचे हे वंशज—" महाराज शब्दागणिक खंगतात.

"क्षमा असावी महाराज—" खजिनदार ओणवे होतात.

"उमेद होती, दौलतीचा वंदोवस्त बहुत तरतुदीने होईल—" महाराज कष्टी होतात.

"खाविन्दानी क्षमा करावी" खजिनदार म्हणतात. "दौलतीचा बंदोबस्त आम्ही करू. खोटी वावचरें मागे घेऊन योग्य ती तरतूद करू!"

"हे कसले वोलणे?" महाराज गोंधळतात.

तेवढ्यात अध्यक्ष खजिनदाराच्या दंडाला चिमटा घेतात आणि हळूच म्हणतात, "हे कसले वोलणे? ती दौलत नव्हे. महाराज राज्याचा वंदोवस्त—"

"अस्से—अस्से ! महाराज तो वंदोवस्त ठीक आहे! आपण चलावे!"

"छे—छे!" महाराज वैतागतात. "या उपरि तुमी आग्रहास न पडिता तुरंत निघोन जीव वचावून कळेल तसे निघावे. शिवाजी राजे यांशी युद्धाचा प्रसंग पाडू नये—"

"युद्धाचा प्रसंग. . ." चिटणीस गर्भगळीत होतात.

"महाराज, म्यानात तलवार ठेवलेली नाही—" पुतळेकर सावध होतात.

त्यासरशी महाराज तलवार उपसतात, तोच लोखंडी मूठच हाती येते.

"हे काय जाहले? राजे यांस दगा—" शिवाजीराजे आणखी खचतात.

"महाराज, दगा फटका होणार नाही. सात लाख मोहोरांची जोखीम आहे. चौथऱ्यावर तुम्ही उभे राहिलेच पाहिजे."

"कां वरे?"

"तुम्हाला पाहून महाराष्ट्राला स्फूर्ति येईल!" अध्यक्ष बोलतात.

"हे तुमचे कसले वोलणे ? या महाराष्ट्र देशी ईश्वरी अंश उरला नाही. मावळ्यांचा उच्छेद जाला. मराठ्यास पीडा जाली. रयत अन्नास मोताद. शिक्षणास पारखी. पोटापाण्याची तरतूद नसे. आमी महाराष्ट्रधर्म रक्षिला त्याचे हे फळ? मनास उमेद होती या महाराष्ट्र देशी सोनियाचा दिवस उगवेल. सर्वांची खैर होईल! पण हे काय जाहले?"

"महाराज, ते सर्व पाहून घेता येईल. आता वेळ नाही. उद्घाटनाची वेळ येऊन ठेपली आहे. आपण तुरंत चलावे—"

असे म्हणून सर्वजण महाराजांना घेरा घालतात आणि घेऊन येतात.

दुसरे दिवशी प्रचंड जनसमुदायाच्या समक्ष प्रधानजी अनावरण करतात.

महाराजांचा चेहरा कष्टी दिसतो. सर्वांनाच दिसतो असे नाही. कारण कुणाचे त्यांच्या तोंडाकडे लक्ष नसते.

"शिवाजी महाराज, छत्रपती शिवाजी महाराज—महाराष्ट्राचे दैवत—मानबिंदु—" प्रधानजी भाषण करतात.

वरून डोळ्यातून दोन चार थेंब पडतात

"पाहा! हा पर्जन्य नव्हे! हे छत्रपतींचेच आनंदाश्रु आहेत—" प्रधानजी सांगत आहेत.' लोक 'छत्रपती शिवाजी महाराजकी जय' अशी गगनभेदी आरोळी ठोकत टाळ्या पिटत आहेत.







अनुक्रमणिका

ना नासाहेब सुभेदारांचा तो तंतुवाद्य संग्रह पाहून माझे मन थक्क झाले. काय एकेकाचा छंद असतो पाहा–कुणाला नाणी जमविण्याचा छंद; तर कुणाला पोष्टाची तिकिटे जमविण्याचा छंद. कुणाला जनावरांची चम्मडी जमविण्याचा छंद, तर कुणाला ऐतिहासिक कागदपत्रे जमविण्याचा छंद. खुद्द नानासाहेबांच्या ओठावर सकाळपासून सांजपर्यंत पदाची एक ओळ खेळत असते. "कुणालाँ वेड कनकाचे। कुणाला कामिनी जाचे। भ्रमाने राजसत्तेच्या। कुणाचे चित्त ते नाचे ।। असा हा सगळा वेडचांचा बाजार !"

बरे; नानासाहेबांना यातील एक तरी वाद्य वाजविता येते म्हणता ? छे ! नांव काढू नका. ते कधी कुतूहल म्हणून देखील यातील एकाही वाद्याच्या तारेला शिवत नाहीत, आणि दुसऱ्यालाही शिवू देत नाहीत. आटोकाट प्रयत्न करून, हजारो रुपये खर्चून पैदा करून आणलेल्या आपल्या संग्रहातील प्रत्येक तंतुवाद्याला त्याच्या आकाराप्रमाणे काचेची सुबक कपाटे करून त्यात त्यांनी ती काळजीपूर्वक ठेवली आहेत.

अनेक जातीच्या वीणा. ब्रह्मविणा, रुद्रवीणा, किन्नरीवीणा विचित्रवीणा, नकूल वीणा, आलापिली वीणा, दंडि विणा, मयुरी वीणा, सुर वीणा.... अबबब ! वीणेचे किती प्रकार हे !

"आणि हे सरंग्याच्या आकाराचं कसलं वाद्य हो ?"

"तो ना ? अहो तो सारिंदा. अति उत्तरेकडचे हे लोकवाद्य. हे पैदा करायला मला नऊशे रुपये खर्च आला. तसाच हा कछुआ. तो कासवाच्या आकाराचा म्हणून कछुआ ! हा रबाव तानसेनच्या घराण्यातला; आणि हा सरोददेखील प्राचीन आहे !"

"आणि हे कसलं विचित्र वाद्य हो नाना ? खाली तंबोरा, त्यावर सतार, वरती सरोद आणि पोटावर स्वरमंडळ. किती उंच वाद्य हे ! तारा तर अगदी सोन्यासारख्या चकाकतात !"

"हं; ते ना ? स्वरशृंगार. एका थोर परंतु दुर्दैवी कलावंतानं घडविलेलं. हे वाजताना त्या चारही वाद्यांची गोडी अनुभवायला मिळायची. जो त्या वाद्याचा कर्ता, तोच त्याचा वादक होता. त्याच्याशिवाय या वाद्याला दुसरा कुणीही हात लावू शकणार नाही. हिंदुस्थानातील अनेक घरंदाज वादक हे वाद्य पाहून गेले. अनेकानी खटपट करून पाहिली पण कुणालाही ते कसं वाजवायचं याचा अंदाज देखील लागला नाही."

"पण याचा कर्ता कोण ?"

"राघोबा शिरगावकर. गोव्याचा एक अजोड, अष्टपैलू कलावंत. उंच पुरा, सावळ्याच वर्णाचा; पण पाहता क्षणीच छाप पडावी अशा डौलदार व्यक्तिमत्वाचा. डोळे मात्र नेहमी रक्ताळलेले. काय सुंदर वाजवायचा राघोबा शिरगावकर हे वाद्य. अहाहाहा ! तरफांवर मिजराब फिरवून एखाद्या रागाचे स्वर त्यानं छेडले की वाटे, विश्वातील सारं मांगल्य, सारा आनंद एकत्रित होऊन त्या जागी स्थिर झालेला आहे. मध्य सप्तकात गत वाजू लागली की, एखादा घरंदाज गायक आपल्या भरदार गळचानं गातो आहे असं वाटे. वर्षभर अविश्रांत झटून स्वतःच्या कल्पनेनं राघोबानं हे वाद्य तयार केलं.

"इथं या पुण्यात बाहुलीच्या हौदाजवळच्या वाड्यात तो वीस वर्षं राहिला. उभ्या आयुष्यात त्याचं कुणाशीही पटलं नाही. माझी त्याची मैत्री जमली, आणि त्याच्या जीवनाच्या अंतापर्यंत ती कायम टिकली. वास्तविक संगीत क्षेत्रातील कोणत्याही एका अंगाचा मला स्पर्श नाही. ना मी गाऊ शकतो, ना मी वादन करू शकतो. राघोबाच्या संगतीमुळे मैफली मात्र रग्गड ऐकल्या. त्यामुळे संगीताची भाषा तेवढी कळली. हे स्वरशृंगार घरात आलं आणि तेव्हापासून वाद्यं जमविण्याचा छंद जडला.

"तशी ही सर्व वाद्यं राघोबा लीलया वाजवायचा. स्वरशृंगार मात्र रहीमानबाईंच्या नाचाच्या किंवा गाण्याच्या साथीला वाजवायचा. अन्यथा नाही."

"रहीमानबाई ?"

"हो रहीमानबाई. जयपूरची प्रख्यात कलावंत रहीमानबाई. एका मैफलीसाठी ती महाराष्ट्रात आली. तिच्या गाण्याच्या किंवा नाचाच्या साथीला योग्य असा तबलिया सापडेना. कुणीतरी राघोबाचं नांव सुचविले. तशी कार्यक्रम घडवून आणणारी मंडळी राघोबाला धुंडित आली. राघोबा प्रथम तयार होईना; पण मोठ्या मिनतवारीनं एका अटीवर तयार झाला. 'जेवढी बिदागी बाईला द्याल तेवढीच मला दिलीत तरच मी साथ करीन' अशी अट त्यानं घातली.

रहीमानबाईंच्या कानावर ही गोष्ट गेली तेव्हा ती संतापली म्हणाली–




सीने में सुलगते है अरमाँ
आँखोमे उदासी छायी है
अब दिल है न दिल के अरमाँ है।
बस, मैं हूं, मेरी तनहाई है ।।

ही गज़ल ज्या कोणा शायराने लिहिली तिची प्रचिती देणारी ही प्रभावी, तितकीच दर्दीली संगीत–कथा

—गोपाळकृष्ण भोबे

अनुक्रमणिका








"अरे आज या हिंदुस्थानात असा कुणीही साजिंदा नाही, की जो माझी साथ करायला तयार होणार नाही. ज्यानं रहीमानबाईंची एकवेळ संगत केली त्याचं नांव अलम दुनियेत गाजलं. बडे बडे साजिंदे माझी साथ फुकट करायला तयार होतात, आणि कुठला कोण कोपऱ्यात पडलेला हा, की जो मला अडवून धरतो ? तो इतका मोठा असता तर दख्खनेत येऊन खब्दाड लपवून का बसला असता ? माझ्याशी गाठ आहे म्हणावं बच्चंजी ! ठीक आहे. आणा त्याला. मैफलीत फाड फाडून त्याला खाल्ला नाही, तर ही नांवाची रहीमान नव्हे. भर मैफलीत त्याची नाचक्की झाली की तो बिदागीचं नांव-देखील काढायचा नाही. मैफल बरखास्त व्हायच्या आधीच पाठच्या दारानं पळून जाईल."

"रहीमानबाईंची ही घमेंड खोटी नव्हती. काय त्या बाईचा रुबाब. तिच्यासाठी स्वतंत्र गालिचे अंथरले जात. गालिच्यांवर अत्तरं शिंपडली जात. बैठकीवर चढायच्या पूर्वी तिनं एका पायातला मखमली चढाव काढला की, तिचा एक नोकर पुढं होऊन, तो हातात घेऊन, कपाळाला लावून खिशात ठेवी आणि दुसऱ्या पायातला चढाव काढला की दुसरा नोकर तशीच क्रिया करून आपल्या खिशात ठेवी. देखणे-पणा चार बायकात उठून दिसावा एवढाच; पण तेज विलक्षण होतं. लखनौच्या मोठमोठ्या उस्तादांकडून तिला तालीम मिळाली होती. गाण्यातले सर्व प्रकार ती सारख्याच तयारीनं गात असे. तिचं उस्तादी गाणं जितकं मोठं तितकीच रसेली तिची ठुमरी. ठुमरीचा अदा करताना ती श्रोत्यांना बेफाम करीत असे. रहीमानबाई गायली की जशी मैफल समाप्त होत असे तशीच ती एकदा नाचली की तिच्या नर्तनानंतर कुणीही नर्तकी नाचायला तयार होत नसे.

तिची पहिली मैफल मुंबईला झाली. मी त्या मैफलीला मुद्दाम हजर राहिलो. नखशिखांत जरतारीनं नटलेली रहीमानबाई बैठकीवर येऊन बसली. आणि थोड्याच वेळात राघोबा गिरगावकरानं मैफ-लीत प्रवेश केला. डोक्याला लखनवी टोपी, अचकन, सुरवार असा रुबाबदार थाट. तो बैठकीवर जाऊन बसला. रहीमानबाईनं त्याच्या-कडे तुच्छतेनं एक कटाक्ष टाकला. त्यानं तबला जवळ ओढला. एक दोन मिनिटातच तो सुरात लावला. ठुमरीला लागणारे तबलेही झटाझट सुरात लावून ठेवले. डग्ग्याच्या आंगठ्यात सरकवून त्याची घुमारी जोखली आणि बायाच्या घुमारीच्या संगतीनं तबल्या-वर सण्णदिशी अशी एक थाप ठेवून दिली की, कानशिलात बसल्या-सारखी रहीमानबाई चमकली. तिनं राघोबाच्या नजरेला नजर लावली. जणू तिला म्हणायचं होतं 'उस्ताद, ओळख पटली बरं का ! आदाब स्वीकार करा !'

"त्या जलशात पारडं सर्व बाबतीत जड ठरलं ते राघोबाचं. ख्याल गाताना राघोबानं ठेकाच असा बांधला की, रहीमानबाईला अस्ताई भरता भरता नाकी नऊ आले. पुढं तर राघोबानं सगळी मैफलच





अनुक्रमणिका

खाऊन टाकली. श्रोत्यांकडून प्रत्येक वेळी टाळ्या दिल्या जायच्या त्या राघोबाला. रहीमानबाईला नव्हे. ठुमरीत लग्ग्या फिरविताना राघोबा अशा कूट अंगानं आणि खुबीनं फिरवू लागला की, रहीमान-बाईला लय सांभाळता येईना. ती वारंवार चुका करू लागली आणि शेवटी तिनं आपलं गाणं एकाएकी बंद करून आपण तावडतोब नाचणार असल्याचं जाहीर केलं.

"गालातल्या गालात हंसत राघोबा तबा याच्या गादीचे बंद बांधून उठू लागला तशी रहीमानबाई म्हणाली–

"उस्ताद, थोडीसी देर और ठहरना. इसी महफील में मेरा नाच भी हो जाय. संगत और ही को करना पडेगी !"

"मगर मैं तो सिर्फ गाना वजाने के लिये आता हूं. नाच वजाना मेरा काम नही है. अगर गाना है तो रातभर भी बैठ सकता हूं."

"नहीं नहीं उस्ताद. ऐसा न कीजियेगा. जो चाहे सो मांग लीजयेगा. मैं आप को दे दुंगी. मगर मेरे नृत्य की संगत अवश्य कीजियेगा !"

"रहीमानबाईनं डोळ्यात प्राण आणून केलेली विनंती राघोबा मोडू शकला नाही; पण रहीमानबाई धूर्त होती. गणिकाच ती. गाण्यात राघोबानं भाव खाल्ला; निदान नृत्यानं तरी त्याची हुट्टी नरम करीनच करीन अशा उमेदीनं तिनं ते विनंतीचं नाटक केलं होतं; पण राघोबा कसला वस्ताद. तो तिचं वारसं जेवलेला होता. अशा कैक नृत्यांगनांना त्यानं थरथर कापवलं होतं. चाळ बांधून कथकाच्या अस्सल मोंगली वेषात रहीमानबाई येऊन उभी राहिली.



सारंगीवर लेहरा वाजू लागला. आपल्या कमानदार भिवया उडवीत नेत्रकटाक्षानी रहीमानबाईनं प्रेक्षकांना थोडा वेळ घायाळ केलं. आणि प्रारंभिक विशेष न लांबवता लगेच तिनं चक्करदार बोलांच्या सवाल-जबाबांना सुरवात केली. तिचे सवालाचे बोल राघोबानं सहज वाजविले पण राघोबाच्या जवाबाचे बोल तिला उचलता येईना. राघोबानं तिला साफ लोळविली. इतकी की, ती शेवटी शरण आली. आणि भर सभेत तिनं राघोबा उस्तादांची शागिर्दी पत्करल्याचं जाहीर केलं.

"राघोबाबरोबर ती पुण्यात आली. आपल्याबरोबरच्या माण-साना तिनं परत लखनौला धाडून दिलं. तीन वर्षं ती त्याच्याजवळ राहात होती. तो तिचं सर्वस्व होता. पत्नी देखील करणार नाही अशी सेवा ती करायची. तिचे आप्तु नातलग तिला घेऊन जाण्याकरिता अनेक वेळा आले; पण रहीमानबाई गेली नाही. आपल्या अंगच्या गुणावर हजारो रुपये कमावणारी ती कलावंत स्त्री, सर्वस्वावर पाणी सोडून इथं बाहुलीच्या हौदाजवळच्या वाड्यातल्या दोन खणाच्या खोल्यात आनंदानं राघोबाजवळ राहिली.

"मैंने अपनी जान उन के ऊपर कुर्बान किया है. जिंदगी यही खतम हो जाय, मगर मैं वापस नही लौटुंगी !" असं ती वारंवार सांगायची.

"तिचा आणि राघोबाचा संबंध होता असं समजणं उघडच आहे. लोकानी संशयीतपणानं, कुत्सितपणानं कुजबुजायचं काही कारणच नव्हतं. राघोबाजवळ ती उघडपणे पत्नीसारखीच राहात होती. पाहाणाऱ्याला वरवर तरी तसं वाटत होतं. परंतु खरी गोष्ट वेगळीच होती."

"कोणती ?"

या प्रश्नावर थोडा वेळ शून्यात पाहात नानासाहेब गप्प राहिले. त्यानी सुस्कारा सोडला. पानसुपारी खलबत्त्यात कुटून बार भरला. आ करून त्यावर तंबाखूची चिमूट टाकली, आणि जवळच्या खिडकी-तून पिचकारी बाहेर थूंकून येत ते म्हणाले–

"खरं म्हणजे रहीमानबाईचा आणि राघोबाचा तसा कोणताही संबंध नव्हता. आपल्या देवस्वरूप वाद्यावर हात ठेवून शपथ घेऊन त्यानं माझ्याजवळ एकदा तशी कबुली दिलेली होती. कदाचित त्याच्या शपथेवर माझाही विश्वास बसला नसता. तसा विश्वास न बसणे हा मनुष्य स्वभावच आहे; पण रहीमानबाई ज्या दिवशी इथून गेली त्या दिवशीच्या घटनेनं माझा तो विश्वास पक्का झाला.

"त्याचं असं झालं की, जयपूरच्या महाराजानी रहीमानबाईला बोलावणं पाठवलं ती जायला अजिबात तयार नव्हती पण महाराजांकडून आमंत्रण घेऊन जो दूत आला होता तो प्रथम पुण्याच्या कलेक्टराकडे आला. आणि कलेक्टरांच्या खाजगी कारभाऱ्या-बरोबर पत्ता काढीत तो राघोबाच्या मुक्कामावर आला. मी त्यावेळी तिथं होतो. राघोबा रहीमानबाईकडून एका मुष्किल चक्रदाराची तालीम करून घेत होता. खुद्द जयपूरच्या महाराजांकडून आमंत्रण आलं म्हटल्यावर दुसरी कोणतीही कलावंत स्त्री हुरळून

गेली असती; पण रहीमानबाईनी प्रथम स्पष्ट नकार दिला. ऐन भरात आलेली तालीम सोडून आपण येऊ शकत नाही हे कारण तिनं सांगितलं. कलेक्टरांचा तो खाजगी कारभारी माझ्या ओळखीचा होता. माझ्याशी झालेल्या त्याच्या सांकेतिक बोलण्यावरून या आमंत्रणाच्या बुडाशी काही तरी गंभीर मामला असल्याचं मला जाणवलं. आज संध्याकाळी, आपण काय तो निर्णय घेऊ असं सांगून मी त्यांची त्यावेळेपुरती बोळवण केली. वाड्याच्या फाटकाबाहेर मी आणि राघोबा त्याना पोहोचवायला आलो. मी आसपास सहज पाहिलं तेव्हा मला आढळून आलं की, गुप्त पोलिसांनी आपली नजर या वाड्यावर ठेवलेली आहे. कदाचित राघोबा रहीमानबाईला घेऊन गोव्यात पळून जाऊ नये म्हणून ही पाळत असावी. मी राघोबाला त्याची जाणीव करून दिली तसा तो तुच्छतेनं हुंकार देऊन हसला.

"आम्ही दोघे घरात परतलो तसा राघोबा दरवाज्यातूनच रहीमानबाईला करड्या आवाजात हाक मारून म्हणाला—

"रहीमान, तुझं सगळं सामान आवरायला लाग. उद्या सकाळी महाराजांच्या माणसाबरोबर तुला जयपूरला जावं लागेल."

"रहीमानबाईला हुंदका आवरला नाही. इतका वेळ कोंडून ठेवलेल्या उमाळ्याचा बांध फुटला. ती ओक्साबोक्सी रडू लागली; पण राघोबानं तिकडे ढुंकूनही पाहिलं नाही. हाताची घडी घालून तो दाराच्या चौकटीतून घरात पडलेल्या उन्हाच्या कवडशाकडे एकटक पहात बसला होता. थोड्या वेळानं तो उठला. त्यानं स्वर-शृंगार उचललं. त्याच्या तरफांवरून एकदा उगाच नख फिरवलं, आणि नाद विरायच्या आत ते गवसणीत टाकून तिचं तोंड गच्च बांधून ते खुंटीला अडकवून टाकलं. आणि हात झाडून पुन्हा हाताची घडी घालून पहिल्यासारखाच तो बसला.

"रहीमानबाईच्या डोळ्यांतून आसवांच्या झरी वहात होत्या. थोड्या वेळानं ती राघोबाच्या जवळ आली. आणि एकदम खाली वाकून तिनं त्याची पावलं घट्ट आपल्या छातीशी धरली. तिच्या हुंदक्याना पारावार नव्हता. तो प्रसंग पाहाताना माझेदेखील डोळे भरून आले. कुणाही सहृदय माणसाचं काळीज पिळवटून टाकणारा प्रसंग होता तो. हुंदके देता देता ती म्हणाली—

"देवता है बाबा आप, देवता है! आयुष्यात असा माणूस मी पाहिला नाही. तीन वर्षं मी तुमच्याजवळ राहिले पण चुकून देखील तुम्ही मला स्पर्श केला नाही. नानासाहेब, तुमच्या समक्ष सांगते, स्त्री असताना देखील मर्यादा सोडून सांगते, कधी कधी माझ्याच मनात पाप डोकावलं. मैफल संपवून किंवा रियाज संपवून रात्री सुखात एकटी झोपली असताना मनात घर केलेल्या पापाला कंफ चढू लागे. वाटे उठावं आणि बेफामपणे सरळ उस्तादांच्या कुशीत जाऊन झोपावं; पण तसं करायची आजपर्यंतची छाती झाली नाही. दुसरा कुणी असता तर या रहीमानचा गुलाम झाला असता. दिवसभर त्यानं माझ्या पायाशी लाळघोटेपणा केला असता; पण या देवतेनं तीन वर्षांत चुकून देखील कधी वाकड्या नजरेनं माझ्याकडे पाहिलं नाही. मी जाते नानासाहेब; या माझ्या देवतेला तुमच्या देव्हाऱ्यात ठेवून










जाते. याला सांभाळा. फार फार मोठा कलावंत आहे हा. उत्तरेत राहाता तर रत्नं–माणकं उधळली गेली असती याच्यावर. मला ठावूक आहे; एकदा जयपूरच्या हद्दीत पाऊले टाकल्यावर पुढे जन्मभर माझी तिथून सुटका व्हायची नाही; पण काळजात एक फार मोठी, अमोलिक अशी, सुखद याद ठेवून जाते आहे मी. ती याद अखंडीतपणे माझी सोवत करील !"

"दुसऱ्या दिवशी सकाळी रहीमानबाई गेली. जाताना तिनं केलेल्या विलापाचं वर्णन करायचं सामर्थ्य माझ्यात नाही; पण तिची गाडी अदृश्य होईपर्यंत राघोवा गंभीरपणे उभा होता. गाडी दिसेनासी झाली तेव्हा थोडेसे हंसून तो म्हणाला–

"पगली कहीं की ! असं आकाश कोसळल्यासारखं रडायचं ? जन्माचं कल्याण करून घ्यायला जाते आहे ही; पण भावनेच्या आहारी जाऊन वेडयासारखं वागते आहे. चला नानासाहेब !"

"म्हण्जे राघोवा, रहीमानवाई गेली याच्याबद्दल तुझ्या मनाला काही वाटलं नाही ?"

"नाही, काहीसुद्धा वाटलं नाही. असे अनेक कलावंत इथं आले की, मला भेटून जातात. काही चार दिवस राहातात, काही आठवडा राहातात. मजजवळची काही विद्या घेऊन जातात. ही तीन वर्षं राहिली. केव्हातरी तिला इथून जावं लागणार हे मला ज्ञात होतंच. आणि म्हणूनच मी तिच्याशी निरपेक्ष नातं ठेवलं."

"आणि खुद्द जयपूरच्या महाराजानी तिच्या इच्छेनं तुला तिथं बोलावणं पाठवलं तर ?"

"मी जाणार नाही. माझा अपमान केलेल्या वैऱ्याचा सूड घेतल्याखेरीज मी इथून कुठंही जाणार नाही !"

"वैऱ्याचा सूड ? म्हणतोस काय राघोवा तू ?"

"त्याची मुद्रा संतापली. डोळे अधिक आरक्त झाले. कानाची पाळी हलू लागली. हुंदका गुदमरावा तसा आकाशाकडे पाहून तो गुदमरला, आणि पाठ फिरवून झपाझप चालू लागला. मी त्याच्या पाठोपाठ धावलो. त्याला अडवला. माझी शपथ घालून त्याला एका टांग्यात बसवला आणि माझ्या घरी घेऊन आलो. याच हॉलमध्ये आम्ही दोघे बसलो होतो. टांग्यातून घरी येईपर्यंत तो गप्प होता; पण नंतर तो धो धो बोलू लागला."

"माझ्या वैऱ्याचा सूड उगवायचा आहे मला नानासाहेब, वैऱ्याचा सूड !"

"अरे, पण तुझा वैरी कोण ते तरी सांगशील ?"

"रावजी शिरगावकर. माझ्या गांवचा मस्तवाल जागिरदार. त्यानं माझा विनाकारण अपमान करून मला या दशेला आणलं !"

"कां ?"

"कां ! श्रीमंतीची मस्ती असलेल्या निर्बुद्ध माणसाला दुसऱ्याचा अपमान करायला काही कारण लागतं ? मी जन्मलो शिरगांवला; पण वयाच्या आठव्या वर्षी जो तिथून वाहेर पडलो तो जवळ जवळ अठ्ठावीस वर्षांच्या दीर्घ कालावधीनंतर पुन्हा शिरगांवात पाऊल ठेवलं. उत्तर हिंदुस्थानातल्या कित्येक संस्थानांतलं मी पाणी प्यायलो होतो. त्यामुळं माझ्या शरीरात खूप फरक पडला होता. माझ्या जन्मगांवच्या परगण्यातील लोकाहून वेगळाच वाटण्याइतपत.

"माझ्यापूर्वी गोव्यातल्या एकाही कलावंतानं उत्तरेच्या हद्दीत पाऊल टाकलं नव्हतं. गाण्यावजावण्याचं अंग आम्हाला जन्मतःच, पण गाणं आणि वाजविणं हे केवळ तेथील देवळातल्या देवाची सेवा करण्यापुरतं. मीही तियंच खितपत पडलो असतो; पण झालं काय की, सावंतवाडीला माझी एक मावशी होती. तिच्याकडे जत्रेला म्हणून मी गेलो, आणि वाडीच्या राजाच्या दरबारात उत्तर हिंदुस्थानातून फिरत फिरत तियं आलेल्या एका ब्राह्मण गवय्याचं गाणं मला ऐकायला मिळालं. आठ वर्षांचं वय होतं माझं. ते गाणं आणि तो दरवारी थाट पाहून मी गुंग होऊन गेलो. ते दृश्य पाहाण्याची आयुष्यातली पहिलीच वेळ होती.

"गवय्या जियं उतरला होता त्या जागी मी दिवसभर घोटाळत राहू लागलो. त्या गवय्यानं मला पाहिलं. जवळ वोलावलं. मी भीत भीत जवळ गेलो. ते म्हणाले – "मुला, तुला काही गाणं वाजविणं येतं का ?"

"मी होय म्हणताच त्यानी मला गायला सांगितलं. लगेच त्याना मी एक भजन गावून दाखवलं. ते खूप झाले. वरोवरच्या माणसांना म्हणाले—

"अशा गळ्याची मुलं संगीत शिकली तर फार मोठं नांव काढतील ! मुला, आणखी काय काय येतं तुला ?"

"मी त्याना पखवाज वाजवून दाखविला आणि चौघडयातली सर्व वाद्ये मला अवगत असल्याचेही सांगितलं. त्यावर ते म्हणाले–

"मग तू चलतोस का आमच्यावरोवर ? आम्ही तुला तयार करू. जा तुझ्या आई वडिलाना विचारून ये !"

"एवढं वोलून ते सरकारच्या वाडयावर निघून गले.

"दुसऱ्या दिवशी ते वाडीहून निघताना कुणालाही न कळवता मीही त्यांच्या मंडळीत सामील झालो. बुवांच्या बरोबर कित्येक मंडळी होती. त्यात मी सहज खपून गेलो. त्यामुळे पुण्याला पोहोचेपर्यंत माझी विशेष चौकशी झाली नाही. पुण्यात आल्यानंतर मात्र गवयीबुवांचं लक्ष माझ्याकडे गेलं. त्यानी चौकशी केली;












तेव्हा मी अनाथ असल्याचं त्याना सांगितलं. त्याना कळवळा आला आणि त्यानी मला आपल्याबरोबर ठेवून घेतले.

"या गावातून त्या गावात, या शहरातून त्या शहरात असा फिरत मी गवयीबुवांबरोबर ग्वाल्हेरला गेलो. तब्बल दहा वर्षे मी ग्वाल्हेरात होतो. त्यानंतर जलशांच्या निमित्तानं रामपूरला आलो. रामपूरच्या उस्ताद वझीर खां साहेबांकडे सेवेला राहून वीणा, रबाब आदि वाद्ये शिकलो. उस्ताद बोलिवखशांकडे तबला आदि हत्यारं वाजवायला शिकलो. उस्ताद इनायतखां साहेबांकडे गाणं शिकलो. हे करताना या सर्व उस्तादांबरोबर मी अनेक संस्थानं फिरलो. प्रसंगी तबल्याची साथ करण्यापासून पडेल ती कामं केली आणि रामपूरहून लखनौला आलो.

"लखनौ हे थोर कलावंतांचं आगर. तबल्यातील नचकरन बाज, लखनवी बाज, ठुमरी गायन इत्यादि प्रकारांचा अभ्यास लखनौला झाला. आता शिकायचं फारसं राहिलं नव्हतं. विद्या अपरंपार आहे; पण आयुष्य फार थोडं; म्हणून अनेक उस्तादांचे आशीर्वाद घेऊन मी व्यवसायाला सुरवात केली. जिथं जिथं गेलो तिथं यशो-देवतेनं मला माळ घातली. पैसा मला पाण्यासारखा मिळाला; आणि पाण्यासारखाच मी तो खर्च केला.

"इतकी वर्षं घर विसरलो होतो, गांव विसरलो होतो, पूर्वायुष्य सारं काही विसरलो होतो; पण नर्तक विदादिननं मला आपल्या ताफ्यावरोबर मुंबईला आणलं. आणि इतक्या जवळ आल्यानंतर मला माझ्या गांवची विलक्षण ओढ वाटू लागली. विदादिनचा दौरा आटो-पला तसा मी त्याचा निरोप घेऊन थेट शिरगावला आलो. प्रथम मला कुणी ओळखेना. माझी भाषाही मी जवळ जवळ विसरलो होतो; पण रक्ताची ओढ रक्ताला पटली. माझे सर्व आप्तवर्गही माझ्याभोवती गोळा झाले. मी मिळविलेली विद्या पाहून थक्क झाले. काही वर्षंतरी मी गोव्यात रहावं आणि कलावंत वर्गाला शिकवावं, असा आग्रह करू लागले.

"आपल्या जन्मग्रामी राहावं. संगीत विद्या देऊन तेथील समाजाची सेवा करावी. ही विद्या किती मोठी आहे याची जाणीव त्याना करून द्यावी असं मलाही वाटू लागलं. आणि मी तसा निर्णयही घेतला. तो काय ? वीस पंचवीस शिष्य शिष्यिणी हां हां म्हणता माझ्याभोवती गोळा झाल्या. त्यांच्या प्रेमात मी डुंबत होतो. माझं घर आणि घराचा आसमंत नादानं दुमदुमून गेला होता. मला कशाचीच ददात नव्हती. मी फिरायला निघालो की, माझी शिष्य मंडळी माझ्या भंवती भंवती फेर धरून असत. नबाबासारखी माझी राहाणी आणि वेष !

"आमचं गांव मासळीसाठी प्रसिद्ध. बालपणापासून माझा पिंड मासळीवर पोसलेला; पण मधली वरीच वर्षं तशी मासळी खायला मिळाली नव्हती. मी सकाळ संध्याकाळ शिरगांवच्या लहानशा बाजारात जाऊन टोपलीच्या टोपली खरेदी करायचा आणि माझी शिष्य मंडळी ती घरी आणून त्याचे नाना पदार्थ करून मला घालायचे. एवढ्यातच एक नाजुक धागाही आयुष्याला लपेटला. माझ्या दूरच्या नात्यातली अतिशय देखणी मुलगी माझा संसार मांडायला आपण होऊन तयार झाली. खरं म्हणजे ती आली होती नाच गाणं शिकायला; पण तिची इच्छा पाहून माझी जोडीदारीण म्हणून मी तिला पसंत केली. तिच्याशी माझा जीव गुंतला. पुढच्याच एका मुहूर्ताला माझं लग्न होणार होतं. सोन्याला आता जिकडून तिकडून फांद्या फुटत होत्या. त्याचा डेरेदार वृक्ष होणार होता.

"एका दिवशी एक लुकडासा माणूस माझ्या दारावर आला आणि कुर्यानच म्हणाला–

"सावकारानी तुला वाड्यावर बोलावलं आहे !"

"त्या लुकड्या माणसाची अरेतुरेची भाषा मला सहन झाली नाही. मी त्याला म्हटलं, तुझे सावकार का नाही येत इथं ? त्याना सांग की, मी त्याना बोलावलेलं आहे. किंवा खुद्द त्यानाच मला आमंत्रण द्यायला सांग. त्याशिवाय हा राघोबा तुझ्या सावकाराच्या वाड्यावर येणार नाही.

"माझा निरोप घेऊन तो माणूस निघून गेला; पण माझ्या शिष्यांची मुद्रा पालटली. माझ्या या शिष्यांपैकी जे माझ्या गावचे होते ते म्हणाले, "उस्ताद, बोलावणं धाडणारे हे सावकार म्हणजे रावजी शिरगावकर. ते या गावचे मालक. तुम्ही त्यांची प्रजा. अजून तुम्ही त्यांच्या वाड्यावर वर्णी लावली नाही ? त्याना राग आला असेल आणि म्हणून त्यानी तसं बोलावणं केलं असेल !"

अहा, भारत विराजे, वर्ष हे 'पर्यटनी' गाजे . . . १



"बाई, हे फार झालं. मी तुम्हाला फक्त सँडल काढून या म्हटलं...!"




दिवाळीचा सण, आनंदाचा-पण
गृहिणींना वाटे कसोटीचा क्षण

टंचाईचा काल, गृहिणींचे हाल
पाहुण्यांना फराळ काय हो द्याल?

लाडू नि चकली, पाहुण्यांना रुचली
लोणची पापडांनीं लज्जत वाढली

मसाला सुपारी, फारच न्यारी
बेडेकर उत्पादनें, सर्वांना प्यारीं!

*गृहिणींची आवडतीं*

# बेडेकर उत्पादनें

**व्ही.पी. बेडेकर अॅन्ड सन्स प्रायव्हेट लि.**
**मुगभाट, मुंबई-४ • पेरूगेट, पुणे-२.**

B. VASANT






"राग कशाबद्दल ? मी त्यांचं काही वाकडं थोडंच केलेलं आहे. त्यानी मला तेवढ्या सन्मानानं आमंत्रण पाठवलं असतं तर मी गेलोही असतो; पण एखाद्या टांगेवाल्याला बोलवावं तसं काय बोलावणं हे ? ही काय पद्धत झाली ?"

"मोठमोठ्या सरदारदरकदारांकडून नित्य सन्मानाची वागणूक मिळवून आलेला मी, त्या टिचभर सावकाराच्या वाड्यावर वर्णी लावायला मी काय एखादा डोंबारी होतो ? सावकाराकडून पुन्हा निरोप आला नाही; सावकारही मला बोलवायला आले नाहीत आणि मीही त्यांच्या वाड्याकडे फिरकलो नाही; पण रावजी शिरगांवकरानं डूख धरला. तो त्या अनादाराचा बदला घ्यायची संधी शोधू लागला. आणि माझ्या दुर्दैवानं त्याला हवा तसा मोका सांपडला.

"सकाळी दहा वाजता मासळीचा बाजार भरायचा. मी माझ्या शिष्यपरिवारासह बाजारात आलो. मी बाजारात पाऊल ठेवलं की मासळी विकणाऱ्या स्त्रिया माझ्यावर तशाच माझ्या शिष्यांवर तुटून पडायच्या. आपली टोपली घ्यावी म्हणून विनंत्या अर्ज करायच्या. मी मासळी पहात चाललो होतो. इतक्यात सहसा न दिसणारी अशी माशांनी भरलेली एक टोपली मला दिसली. चांदीच्या मुठीची काठी माझ्या हातात होती. काठीचं टोक त्या मासळीच्या टोपलीवर ठेवून मासळी विकणाऱ्या बाईला मी सबंध टोपलीची किंमत विचारली. इतक्यात जवळूनच एक करडा आवाज आला—

"रोझी, मासळी कुणालाही विकायची नाही. सबंध टोपली शिरप्याबरोबर घरी घेऊन जा!"

"रोझीनं माझी काठी आपल्या हातानं दूर करायचा प्रयत्न केला. पण काठीचं टोक टोपलीवर अधिकच घट्ट दाबीत मी म्हटलं—'रोझी, म्हणशील ती किंमत देईन, टोपली मला हवी!' तशी रोझी म्हणाली—

"सावकाराचा हुकूम आहे बाबा; मला आता ही मासळी विकता येणार नाही."

"कोण सावकार?"

"मी सावकार! रावजी शिरगांवकर म्हणतात मला!"

"मी मागं वळून पाहिलं तो एखाद्या दुष्ट माणसासारखा दिसणारा, लांब कोट, धोतर व पायात बूट घातलेला एक किडकिडीत इसम माझ्या मागे उभा होता. मी त्याला जुमानले नाही. मी म्हटलं तुमच्या आधी मी ही टोपली बघलेली आहे; आणि मला ती हवी आहे!"

"पण रोझी ती तुला देईल? शामत आहे तिची? उचल बघू ती त्या जागेवरून ?"

"माझं मन हट्टाला पेटलं आणि मी त्या टोपलीला हात घालणार तोच रोझी कडाडली—

"पाटील हात लावशील तर खबरदार! सावकाराची आहे ती. उभा जन्म काढायचा आहे आम्हाला इथं. तू चार दिवसांचा

( दीपा. १०१ )

पाव्हणा. पैसे काय येतील किती आणि जातील किती. त्याची तमा नाही आम्हाला. बाजूला हो इथून. पाटीला हात लावशील तर परिणाम वाईट होईल!"

"मी बाकलेला उभा झालो. आमच्या भोवती सबंध बाजार जमा झाला होता आणि रावजी खदखदा हंसत होता. हासत हासत छद्मीपणानं तो म्हणाला—

"राव्या, अरे तुझी आई अन्नावर पोसली या गांवच्या आणि तू कुठं चार गांवं फिरून आलास आणि एवढा उन्मत्त झालास काय? वाड्यावर येऊन वर्णी लावायचं देखील भान तुला राहिलं नाही? आता तुला शिक्षा एकच, आणि तो म्हणजे ही मासळीची पाटी उचल, डोक्यावर घे आणि वाड्यावर नेऊन पोचव. उचल ती पाटी. मी तीन वार म्हणायच्या आधी उचल आणि घे डोक्यावर. नाही उचलत? मग दाखवतोच तुला माझा इंगा. शिरप्या माझी पेढीवरची रायफल घेऊन ये. राव्या, तीन खून माफ आहेत मला या पुर्तुगेज राज्यात. एक केलाय मी. दुसरा तुझा. इथल्या इथं तुझ्या मस्तकाच्या चिंधड्या उडवून रक्ताच्या थारोळ्यात उताणं पडलेलं तुझं मडं सगळ्यांना पहायला मिळेल! उचल लवकर पाटी!"

"एवढं बोलणं होईपर्यन्त शिरप्या रायफल घेऊन आला. लोक भयभित झाले. माझे शागिर्द पुढे झाले आणि पुढील भयानक प्रसंग टाळावा म्हणून त्यानी लगबगीनं ती पाटी उचलून माझ्या डोक्यावर ठेवली. रावजीचा आत्मा शांत झाला. त्यानं रायफल पुन्हा शिरप्याकडे परत दिली. रागानं मी थरथर कापत होतो. मी निःशस्त्र होतो ; रावजी सशस्त्र होता. मी माझ्या कलेत राजा होतो; रावजी गांवचा राजा होता. माझ्या कलेच्या साम्राज्यात त्याची ब्र काढण्याची शामत नव्हती; त्याच्या वडिलार्जित श्रीमंतीच्या राज्यात माझीच काय पण विपमतेविरुद्ध, अन्यायाविरुद्ध लोकांची देखील ब्र काढायची छाती नव्हती. एरवी शारीरिक बळाच्या बाबतीत मी त्याची चामडी सोलून त्याला धोबीपछाड आपट आपट आपटला असता. त्याचं चिपाड होईपर्यंत धोपटून त्याला मारला असता; पण गावचा मालक तो



होता. प्रजा त्याची होती. रोझी त्याची होती आणि त्या गावच्या मातीचा कण न् कण त्याचा होता.

"पाटी डोक्यावर घेऊन मी उभा होतो. अजून पाऊल उचललं नव्हतं. रावजी माझ्यासमोर तसाच विकट हास्य करीत आजूबाजूला विजयी मुद्रेनं पाहात उभा होता. माझ्या डोक्यात विजेसारखा एक विचार चमकून गेला. वेळ न दवडता मी संधी साधली आणि मासळीनं भरलेली माझ्या डोक्यावरची पाटी सारं बळ एकवटून मी रावजीच्या पायावर आदळली. रावजी कळवळला, किंकाळला, कोलमडला. पाठीवर कोसळला. एकाएकी असं काही घडेल हे त्याच्या स्वप्नातदेखील नव्हतं. शिरप्याकडे रायफल होती, तिचं श्राप ओढायचं त्याला भान राहिलं नाही. तो आपल्या मालकाला सावरायची धडपड करू लागला. त्याचा पाय मालकाच्या धोतरात अडकला. मी त्याच्यावर जोरानं थुंकलो. आणि डोळ्याचं पातं लवतं न लवतं इतक्या झटक्यात तिथून पळालो. पाठून लोकांचा गिल्ला अस्पष्टपणे माझ्या कानावर येत होता. मी थांबलो नाही. एकसारखा पळत शिरगांवची हद्द ओलांडून पेडण्यात आलो. तिथून लपत छपत सावंतवाडीला आलो आणि मजल दरमजल करीत पुण्यात पोहोचलो.

"नानासाहेब, या आयुष्याचं आता एकच ध्येय आहे. ज्यानं विनाकारण अपमान करून मला माझ्या भरल्या आयुष्यातून उठवलं त्याचा खून केल्याशिवाय माझं मन शांत होणार नाही. जोपर्यंत ते घडणार नाही तोपर्यंत हा राघोबा जिवंत असून मेल्यासारखाच. चोवीस वर्ष रक्ताचं पाणी करून मिळविलेली संगीत विद्या कुजून गेली तरी मला पर्वा नाही त्याची. रावजीचा खून केल्यामुळं कदाचित मला तुरुंगात जावं लागेल. पकडला गेलो तर फासावर चढवला जाईन; पण मला तसं व्हायला नको आहे. त्याचा खून करूनही मला जगायचं आहे. विषमता भुई-सपाट केलो त्याचा आनंद भोगायचा आहे. आणि ते कार्य हातून घडलं नाही तर आत्महत्या! मी फक्त संधी येण्याची वाट


...तरी हजार वेळा मी सांगत होतो की मध्ये मध्ये तोंड घालू नको म्हणून...

पहातो आहे. ती येईल याची मला खात्री आहे!

"राघोबाच्या मनातल्या दुखावलेल्या नागाला त्यावेळी व्यवहाराचं गोंडस तत्वज्ञान ऐकवणं किती कठीण आहे याची जाणीव मला होती. खून चढलेल्या माणसाला आर्तपणानं केलेला उपदेश कुचकामाचा ठरतो. तरीही बोलायचं तेवढं गुळमुळीत मी बोललो पण राघोबा हसला. बैठकीवरून उठला. खिडकीतून बाहेर थूंकला. कदाचित रावजी शिरगावकर या त्याच्या शत्रूवर थुंकला होता तसाच.

"या घटनेनंतर अशीच काही वर्ष उलटली. स्वतःच्या डोळ्यातल्या बाहुल्याकडे–थक्क होऊन दचकून बघावे, इतक्या द्रुतगतीने निघून गेली. राघोबा पुण्यातच होता. माझ्या त्याच्या गाठी भेटी होत होत्या. काही स्त्री–पुरुषाना तो गाणं बजावणं शिकवीत होता. माझ्या आग्रहानं एका गायनशाळेत अध्यापनाचं काम त्यानं पत्करलं होतं. संगीत शास्त्रावर तो एक ग्रंथही लिहीत होता. उत्तरेकडचे अनेक संगीतकार त्याच्या बिऱ्हाडी उतरत. तो त्यांचे जलसे करी. त्यांना मानपान करी. अडलेल्या संगीतकाराला स्वतःजवळचे असलेले नसलेले देई. आणि एखाद्या घमेंडखोराची भर जलशात अब्रूही घेई. मला वाटलं मागचं आयुष्य आता तो विसरला असेल. ज्या अपमानानं त्याच्या मनात आग धुमसत होती तिचं आता शमन झालं असेल; पण कसचं काय आणि कसचं काय!

"एका मध्यरात्री तो माझ्याकडे आला. मोठमोठ्यानं हाका मारून त्यानं मला झोपेतून उठवलं. त्याच्या डाव्या काखोटीला गवसणीत बांधलेलं स्वरशृंगार होतं. आणि उजव्या हातात रुमालात बांधलेलं एक पुडकं.

"नानासाहेब, स्वरशृंगार ऐकवायचंय तुम्हाला. नाही म्हणू नका. तुमची झोपमोड झाली. माहित आहे मला. मी असा अवेळी तुमच्याकडे कधी आलो नाही, पण आजच्या या घटकेपुरती तुम्ही माझी विनंती मोडू नका, पुन्हा कधीही मी तुम्हाला असा त्रास देणार नाही, पण माझं एवढं म्हणणं ऐकाच!"

"मी काही बोललो नाही. मुकाट्यानं त्याला वर घेऊन आलो. त्यानं वेळ लावला नाही. गवसणीतून स्वरशृंगार काढून त्याच्या तारा झपाझप जुळवून घेतल्या. तरफांवरून हळुवारपणे त्यानं नख फिरवलं. एखाद्या वासराच्या पाठीवरून मायेनं हात फिरवताच त्याचं अंग थरारतं तसं ते वाद्य थरारलं. त्याच्यात चैतन्य आलं. आणि त्याचा झंकारलेला नाद कानी पडताच माझे आळसावलेले डोळे खाडकन् जागे झाले. त्या वाद्यावर मान आडवी टाकून, भिवया संकोचून राघोबा एक करुण धून वाजवीत होता. जणू आपल्या हृदयाच्या तारा छेडून गात होता. कित्येक वर्षे अंतरंगात साठवलेली वेदना त्या स्वरातून तो ओतत होता. शेवटी आपल्या बोटातील नखीला त्यानं बेफाट वेग दिला. तो वेग इतका विलक्षण होता की, त्यातून झंकारलेल्या सहस्र सुरातून तंतूसारखा एकच एक स्वर प्रकाश किरणासारखा पसरत असल्यासारखं मला वाटलं. त्या स्वराच्या दिव्यत्वानं मी शहारलो.

माझ्या अंगावर काटा-उभा राहिला. राघोबा लोखंड तापावं तसा तापला होता. वरपासून खालपर्यंत तारेवर त्याचे डाव्या हाताचे रक्ताळलेले मधले बोट नाचत होते. मला राहवेना. मी एकदम ओरडलो—राघोबा पुरे आता.

"त्यानं आपलं वादन थांबवलं. स्वरशृंगार दोन्ही हातांनी उचललं आणि माझ्या पायावर ठेवलं!"

"हे काय करतोस राघोबा!"

"काही नाही, रहीमाननं मला देव म्हणून तुमच्या देव्हाऱ्यात ठेवण्याची तुम्हांला विनंती केली, पण माझं सर्वस्व मी तुमच्याकडे आज गहाण ठेवायला आलेलो आहे!"

"म्हणजे?"

"म्हणजे असं की, या स्वरशृंगारासकट माझी आजपर्यंत मिळवलेली संगीत विद्या मी तुमच्याकडे गहाण ठेवायला आलेलो आहे. बरोबर शास्त्रावर लिहिलेलं हे पुस्तक. या तारणावर मला फक्त तीनशे रुपये द्या. माझं काम झालं की, मी तुमचे पैसे व्याजासकट फेडून हे सोडवून घेऊन जाईन. एवढे उपकार कराच. नाही म्हणू नका."

"अरे पण तुला तीनशे रुपये हवे असतील तर नुसतेच घेऊन जा. त्यासाठी ही भाषा कशाला? तुझे माझे तसे संबंध आहेत का?"

"नाही नानासाहेब, तसं होणार नाही. आजपर्यंत मी कुणाची दमडी घेतलेली नाही. तसा माझ्यावर कधी प्रसंगच आला नाही. अडलेल्या कलावंतांना या हातानी मी हजारो रुपये वाटलेले आहेत. पण आज माझ्यावर अचानक प्रसंग आला. ज्या संधीची वाट पहात होतो ती संधी जमून आलेली आहे. पुन्हा आयुष्यात तशी संधी येईल की नाही सांगता येत नाही. आता तुम्ही वेळ दवडू नका!"

"कसली संधी राघोबा?"

"माझ्या अपमानाचा सूड उगवायची. गोव्यातल्या सांखळी गांवच्या राण्यांनी बंडाचा उठाव केलेला आहे. अनेक जमीनदाराना ते लुटत आहेत. या चार दिवसात एका रात्री शिरगांववर हल्ला करायचा त्यांचा बेत आहे. मला त्याची वित्तंबातमी आहे. ज्या संधीची मी वाट पहात होतो ती कशी जमून आलेली आहे. एका लष्करी अंमलदारानं मला रायफल द्यायचं कबूल केलेलं आहे! पण त्याला दीडशे रुपये हवे आहेत. शंभर रुपये मी तुमच्याकडे ठेवून जात आहे. ते माझ्या घरमालकाला वर्षाचं भाडं म्हणून द्या. आणि राहिलेले पन्नास मला वाटखर्चाला हवेत!"

"तुला काय वेडबीड लागलंय राघोबा?"

"नानासाहेब, आता नसत्या बोलण्यात हुज्जत घालीत बसू नका. माझ्या मनावर त्याचा कोणताही परिणाम होणार नाही. मुकाट्यानं मला रक्कम द्या. नाहीतर या क्षणी मी तुमच्या दरवाज्यावर डोकं आपटून प्राण देईन!"

"नाईलाजानं मी राघोबाला पैसे दिले. तो तीरासारखा निघून गेला, काळोखात अदृश्य झाला. तो गेल्या क्षणापासून मी सचिंत होतो. सकाळ होताच त्याच्या बिऱ्हाडी जाऊन आलो पण त्याचं दार बंद होतं. तिथं कशाचाच मागमूस नव्हता. गुपचुप मी परतलो.

"आणि राघोबा गेल्याच्या सहाव्या दिवशी सकाळी इथले दोन पोलिस माझ्याकडे आले. मला पोलिस प्रमुखानं बोलावल्याची त्यांच्या हातात नोटीस होती. चौकशीत कळले की बाहुलीच्या हौदाजवळच्या वाड्यात एक माणूस मेलेला असून रायफलीनं गोळी झाडून घेऊन त्यानं आत्महत्या केलेली आहे. माझ्या नावाचं पत्र तिथं सांपडलं म्हणून पोलिस प्रमुखानं मला बोलावलं होतं.

"धडधडत्या अंतःकरणानं मी तिथं पोहोचलो. राघोबानंच आत्महत्या केली होती. मला लिहिलेल्या पत्रात त्यानं म्हटलं होतं—

"नानासाहेब, राण्याच्या बंडाचा पुर्तुगेज शिपायानी बिमोड केला. बहुतेक बंडवाले पकडले गेले; पण शिरगांववर नुसता हल्ला होणार, आपण लुटले जाणार या भयानं धक्का बनूनच रावजी शिरगावकर मी शिरगांवात पाऊल ठेवायच्या आधी दोन दिवस मेला. वास्तविक माझी आत्महत्या मी शिरगावच्या बाजारात ज्या ठिकाणी माझा अपमान झाला त्या जागीच केली पाहिजे होती; पण रावजीसारख्या मदांध इसमाच्या टाचाखालची मांजरं बनून लाजिरवाणं जिणं जगणाऱ्या शिरगांवच्या लोकांचे हात माझ्या प्रेताला देखील लागू नयेत असं मला वाटलं. माझ्या आत्महत्येला कुणीही जबाबदार नाही. त्यासाठी कुणालाही त्रास होऊ नये. आयुष्यातील सर्व आशाआकांक्षावरील माझा विश्वास उडाला. रावजीला मारून एकप्रकारे सामाजिक विषमतेचाच मला बळी घ्यायचा होता; पण माझ्या वैऱ्यानं माझाच सूड घेतला. आता आयुष्यात करण्यासारखं काही राहिलं नाही. माझी पृथ्वीमोलाची संगीत विद्या, मी लिहिलेला ग्रंथ आणि मी तयार केलेलं माझं स्वरशृंगार तुमच्याकडे तारण आहेच; पण माझा आत्मा तुमचा कायमचा ऋणी राहील. ज्या हत्यारानं मी त्या विषमतेला ठार करणार होतो ते हत्यार आता माझ्याच कामी आणीत आहे!"

हॉलमधल्या विजेच्या दिव्याच्या प्रकाशकिरणानी स्वरशृंगाराच्या तारा चकाकत होत्या. त्या चकाकीच्या झोतातून दोन रक्ताळलेल्या डोळ्यांची आकृती दिसू लागली. आणि त्या डोळ्यातून अंगार सांडतो आहे असा मला भास झाला. जणू त्या डोळ्यातल्या अंगाराला म्हणायचे होते—

रावजी अजून कुठं मेलाय? तो जिवंत आहे. त्याला गाडून टाक. त्याला गाडून टाक !!! ●












# तुम्हाला माहीत आहे-

ज्या उद्यमी लोकांजवळ नव्या उद्योगांच्या निर्दोष, भक्कम योजना आहेत, त्यासाठीं आवश्यक तें ज्ञान व ते यशस्वी-पणें चालविण्याची कुवत आहे, पण त्यासाठी पुरेसें भांडवल नाही, अशा लोकांना स्टेट बँक आता कर्ज देते.










अनुक्रमणिका

# मराठीतील पहिली स्त्री-नाटककार



हिराबाई पेडणेकर

प्रा. म. ल. वराडपांडे एम. ए.

मासिक 'मनोरंजन'च्या जानेवारी १९१३ च्या अंकात 'मुंबईतील रंगभूमि' या सदराखाली खालीलप्रमाणे मजकूर आहे :

"येथे नमूद करण्यासारखी एक अभिनंदनीय गोष्ट ही की 'दामिनी' हे नाटक एका महाराष्ट्रीय स्त्रीने – त्यातही विद्येत मागासलेल्या जातीतील एका विदुषी स्त्रीने – लिहिले असून, महाराष्ट्र रंगभूमीवर स्त्रीने लिहिलेले नाटक येण्याचा हा हा प्रसंग केवळ अपूर्व होय. याबद्दल नाटककर्ती श्री. हिराबाई पेडणेकर आणि नाटक मंडळीचे चालक श्री. भोसले यांचे आम्ही मनःपूर्वक अभिनंदन करतो. 'दामिनी' हे नाटक उच्च दर्जाचे असून, नीतिदृष्ट्या अतिशय श्लाघ्य व शुद्ध आहे. मनोहर व योग्य रीतीने वाढविलेले संविधानक, भिन्नवृत्तीची उच्चनीच दर्जाची पात्रे, रम्य व चटकदार प्रसंग इत्यादी अनेक प्रशंसनीय गुणांनी हे नाटक युक्त असून, त्यातील पद्ये सुबोध, सरळ, काव्यप्रतिभादर्शक, व कर्णमनोहर चालीवर रचलेली आहेत."

पण आपल्या नाट्यकृतींनी व ललित व्यक्तिमत्वाने १९०० ते १९१७ पर्यंत १७ वर्षे जिने मराठी नाट्यसृष्टी गाजवली व "पहिली मराठी स्त्री नाटककर्ती" होण्याचा मान पटकावला त्या हिराबाई पेडणेकरांचा नामोल्लेख देखील बहुतेक मराठी नाट्येतिहासविषयक ग्रंथात आज आढळत नाही. अशा परिस्थितीत त्यांच्या चरित्रविषयक माहितीचा अभाव असावा यात आश्चर्य नाही. काळाच्या विशाल रंगमंचकावरील विस्मृतीचा मखमली पण अभेद्य पडदा दूर सारून मराठीच्या या आद्य महिला नाटककर्तीच्या उपेक्षित जीवननाट्याचे व वाङ्मयीन कर्तृत्वाचे मनोज्ञ दर्शन सर्वप्रथम घडविण्याचे श्रेय प्रसिद्ध टीकाकार श्री. गजानन त्र्यंबक उर्फ भाऊसाहेब माडखोलकर यानाच सर्वस्वी आहे. एका पोरक्या, उपेक्षित जातीत जन्मलेल्या मुलीची गौरवपूर्ण पण तितकीच करुणरम्य कहाणी सहृदयाच्या मनाला पीळ पाडल्यावांचून रहात नाही. कर्णाच्या नशिबी हीन जातीत जन्मल्यामुळे जे भोग आले, तेच विसाव्या शतकात हिराबाईंच्या वाटी आले. पण कर्णाप्रमाणेच मनाच्या जखमा लपवून प्राप्त प्रतिकूल परिस्थितीतही स्वकर्तृत्वाचे तेज पाडल्याशिवाय त्या राहिल्या नाहीत.

हिराबाईंचा जन्म रविवार दिनांक २२ नोव्हेंबर १८८५ रोजी पहाटे ४.३५ च्या सुमारास झाला, असा त्यांच्या जन्मपत्रिकेत निर्देश आहे. जन्मस्थानाचा उल्लेख जरी पत्रिकेत नसला तरी सावंतवाडी येथे त्यांचा जन्म झाला अशी माहिती मिळते. हिराबाईंच्या मातोश्री शांतुबाई मूळ पेडण्याच्या. सावंतवाडीपासून गोमांतकात पेडणे सुमारे सतरा मैल आहे. तेथे पेडणेकरांचा वडिलार्जित वाडा आहे. परंतु शांतुबाई आपल्या वहिणींसह सावंतवाडीलाच रहात. हिराबाईला मातृसुख फार काळ लाभले नाही. आई बालपणीच निवर्तल्यामुळे हिराबाई आपल्या भावासह मुंबईला आपली मावशी भीमाबाई यांच्याकडे आली. भीमाबाईंना मुंबईचे प्रसिद्ध उद्योगपती शेठ रायचंद प्रेमचंद यांचा आश्रय होता. मेमळ भीमाबाईंनी या पोरक्या पोरांच्या शिक्षणाची व्यवस्था







अनुक्रमणिका

ज्या कलावंत स्त्रीने विविध नात्याने सतत सतरा वर्षे मराठी रंगभूमीची सेवा केली, तिच्या मृत्यूची बातमीदेखील एकाही मराठी वृत्तपत्रात आली नव्हती.... एक सुगंधी फूल परिस्थितीच्या दडपणामुळे अज्ञातवासात सुकून गेले....

केली. मुंबईला हिराबाईंचे शिक्षण नवीवाडीतील मिशन स्कूलमध्ये त्या वेळच्या मराठी सातवीपर्यंत झाले. त्यांचे संगीत शिक्षण कै. परशुरामपंत वर्वे, शंकरराव धळेकर, भास्करबुवा बखले वगैरे नामांकित गायक नटांच्या हाताखाली झाले. त्यामुळे बाईंना नाटकाविषयी आकर्षण निर्माण होणे स्वाभाविक होते.

हिराबाईंच्या नाट्यप्रतिभेचा पहिला उन्मेष प्रस्फुटीत झाला त्यावेळचे सुप्रसिद्ध नाटककार श्री. गोविंदराव देवल यांच्या वत्सल सहवासात. देवलांचा भीमाबाईशी स्नेह होता व हिराबाईंना तर ते आपली कन्याच समजत. देवलांच्या बंधूंची ती कन्या होती असाही प्रवाद होता. देवलांच्या सान्निध्यात हिराबाईंची विकासोन्मुख प्रतिभा उमलू लागली व त्याला १९०४ साली पहिले फळ आले. हिराबाईंचे पहिले नाटक 'संगीत जयद्रथविडंबन' हे १९०४ साली प्रसिद्ध झाले. त्यावेळी हिराबाई अवघ्या एकोणीस वर्षांच्या होत्या. हेच स्त्री नाटककर्तीने लिहिलेले मराठीतील पहिले नाटक. देवलांना हिराबाईंचे विलक्षण कौतुक वाटणे स्वाभाविक होते. या नाटकाविषयी श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांनी चार अनुकूल शब्द लिहावे अशी त्यांची इच्छा होती. श्री. कोल्हटकर आपल्या आत्मवृत्तात लिहितात, "मी मुंबईस यानंतर एक वर्षाने गेलो असता गोविंदराव देवल मला किर्लोस्कर कंपनीच्या बिऱ्हाडी भेटले व माझ्या हाती एक लहान छापील पुस्तक देऊन ते म्हणाले, "हे नाटक एका सुशिक्षित नायकिणीने लिहिले आहे. तुमचे या नाटकासंबंधी अनुकूल मत झाल्यास ते तुम्ही विविधज्ञानविस्तारात प्रसिद्ध करावे... पुस्तकावर कर्तीचे नांव हिराबाई पेंडशेकर असे दिले होते. (नाटकातील पदांची रचना सुंदर असून देवलांच्या कवितेच्या धर्तीवर होती. 'कर्तीचे हे अपत्य तुमच्याच साह्याने निर्माण झाल्यासारखे वाटते' असे मी त्यास थट्टेने म्हटलेही. पण 'या नाटकाच्या रचनेशी माझा काही संबंध नाही. कर्ती स्वतःच पद्यरचनेत कुशल आहे' असे त्यानी खात्रीपूर्वक मला सांगितले-".

ही घटना कोल्हटकरांनी आत्मवृत्तात १९०२ सालची म्हणून दिली आहे. पण नाटकावर प्रसिद्धीवर्ष १९०४ छापलेले आहे. अर्थात ही घटना १९०४ चीच असावी. कोल्हटकरांच्या स्मरणशक्तीने त्यांना दगा दिलेला दिसतो. हे नाटक स्वतः हिराबाईनी रचल्याची ग्वाही देवलांनी आवर्जुन कोल्हटकरांना दिली. नाटकाची पदे ऐकण्यासाठी कोल्हटकर हिराबाईंच्याकडे गेले व त्यांचा ग्रह अत्यंत अनुकूल झाला. पण कोल्हटकर या नाटकाबद्दल चार गौरवपर शब्द विविधज्ञानविस्तारात लिहू शकले नाहीत. २९ जून १९०५ रोजी तेल्हाऱ्याहून श्री. वि. सी. गुर्जर यांना पाठवलेल्या पत्रात कोल्हटकर लिहितात, "हिराबाई पेडणेकरांच्या 'जयद्रथ विडंबनावर 'नायकिणीच्या पुस्तकासंबंधाने अनुकूल टीका घेणे बरोबर दिसणार नाही असे' त्यांनी मला सांगितले."

कोल्हटकरांच्या पत्रातील मजकूर पुरेसा बोलका आहे. त्यावर भाष्य करण्याची आवश्यकता नाही. त्याच पत्रात कोल्हटकरांनी नाटकावर अकरा आक्षेप घेऊन 'जयद्रथ विडंबनातील पद्यरचना साधी, सुबोध पण मनोरम झाली आहे. तथापि विचार अगदीच साधे आहेत; व संविधानकही चांगले साधले नाही असे, मला वाटते" असे मत त्यांनी दिले आहे.

'जयद्रथ विडंबनांवर देवलांची छाप पडणे अपरिहार्य होते. श्री. माडखोलकर 'व्यक्तिरेखे'त लिहितात, "जयद्रथ विडंबन हे नाटक देवलांचा कित्ता समोर ठेऊन लिहिले आहे हे उघड दिसते. त्याचे कथानक साधे, सरळ, भाषा सोपी, आणि पदे सुबोध आहेत. देवलांच्या 'शारदा' आणि 'संशयकल्लोळ' या नाटकात जो घरगुती खोचक विनोद आढळतो, तो सुद्धा या नाटकात नाही. हिराबाई चांगल्या कवयित्री आहेत आणि रसानुकूल चालीत त्या गोड पद्यरचना करू शकतात... इतर नायकिणींसारखीही एक केवळ अक्षरशत्रु संगीतज्ञ स्त्री नसून, स्वतः नवीन चाली बांधणारी आणि सुश्लिष्ठ पद्यरचना करणारी निर्माणक्षम बुद्धीची, कल्पक, व्यासंगी स्त्री आहे अशी जाणीव बाईंनी या आपल्या नाटकाने करून दिली."

बाईंनी हे नाटक आपल्या मावशीला अर्पण करून आपली कृतज्ञता व्यक्त केली.

**हिराबाईकडे प्रतिष्ठित साहित्यिकांची ये-जा असे.**



श्री. कृ. कोल्हटकर



गो. ब. देवल



न. चिं केळकर



नानासाहेब जोगळेकर









अनुक्रमणिका

अर्पणपत्रिकेत' 'हे पुस्तक माझ्या परमपूज्य मातोश्री ती. स्व. सौ. भीमाबाई पेंडणेकर यांस त्यांच्या दातृत्वगुणाबद्दल व अंगी असलेल्या वात्सल्यादिक अनेक सद्‌गुणांबद्दल प्रेमपूर्वक समर्पण केले आहे' असा मजकूर आहे. या नाटकाची किंमत ८ आणे दिली आहे. त्याच्या मुखपृष्ठावर 'हे पुस्तक सौ. हिराबाई पेडणेकर यांनी केले व ते मुंबई येथे इंदुप्रकाश छापखान्यात छापले' अशी नोंद आहे. त्याचा आकार ३॥" × ५।" असून पृष्ठसंख्या ७१ आहे. (हे नाटक रंगभूमीवर आले नाही.)

**'जयद्रथ विडंबन—ऐतिहासिक घटना'**

या नाटकाने मराठी रंगभूमीच्या क्षेत्रात एक इतिहास निर्माण केला. मराठी नाट्यक्षेत्रात स्त्रीने लिहिलेले हे पहिलेच नाटक. नाटकाचा विषय धार्मिक आहे. कौशल्यपूर्ण संविधान व नाट्य याची उणीव रसाळ पदरचनेने भरून काढण्याचा प्रयत्न केला आहे. बाईंच्या प्रसादपूर्ण कवित्वशक्तीचा प्रत्यय या नाटकातील पदातून येतो. या पदरचनेने व त्याला दिलेल्या मधुर चालीने तत्कालीन-साहित्यिक विलक्षण प्रभावित झाले होते. ही पदे ऐकण्यासाठी तत्कालीन अग्रगण्य नट व किर्लोस्कर कंपनीचे एक मालक श्री. जोगळेकर व श्री. देवल यांच्यासह कोल्हटकर हिराबाई-कडे गेले. काव्य आणि संगीत यांचा मधुर संगम हिराबाईंच्या ठिकाणी झाला होता. त्याने कोल्हटकर विलक्षण प्रभावित झाले. व त्यांच्या परिचयाचे रूपांतर लवकरच घनिष्ट स्नेहात झाले. ह्या स्नेह-संबंधांचा कोल्हटकरांच्या भावविश्वावर फार खोल परिणाम झाला. आपल्या आत्मवृत्तात कोल्हटकर लिहितात: 'हिराबाईंशी परिचय झाल्यापासून एका बुद्धिमान स्त्रीच्या सौंदर्याचा व विक्रमाचा बराच चांगला आदर्श मिळाल्यासारखा होऊन माझ्या सौंदर्याभिरुचीचे पोषण होऊ लागले. १९०५ नंतर कोल्हटकरांनी लिहिलेल्या नाटकाच्या नायिका जास्त सरस वठल्या याचे श्रेय कोल्हटकर हिराबाईंना देतात.' 'प्रेमशोधन' नाटकाच्या नायिकेची व्यक्तिरेखा कोल्हटकरांनी हिराबाईंवरून घेतली आहे असे त्यांनी स्वतः कबूल केले आहे. बाईनाही कोल्हटकरांच्या नाट्यगुणांचे आदरयुक्त कौतुक होते. त्यामुळे त्या लवकरच कोल्हटकरांच्या शिष्यसंप्रदायात सामील झाल्या.

हे नाटक जरी रंगभूमीवर आले नाही तरी ते प्रसिद्ध झाल्यावर बाईंची कीर्ति तत्कालीन विद्वद्वृंदात वेगाने पसरली. कोल्हटकर, केळकर, गडकरी, चिंतामणराव वैद्य, वि. सी. गुर्जर, रेंदाळकर, ठोंबरे, वरेरकर प्रभृती ज्येष्ठ व श्रेष्ठ नाटककार व साहित्यिक हिराबाईंकडे जाऊ येऊ लागले. त्यामुळे हिराबाईंचे व्यक्तिमत्व समृद्ध होऊ लागले व त्यांच्या नाट्यगुणांचा विकास होऊ लागला. मासिक 'मनोरंजना'तून बाईंच्या कविताही प्रसिद्ध होऊ लागल्या. त्यांची साहित्यिक मित्रमंडळी त्यांना कौतुकाने जॉर्जा सँड म्हणत. 'रचिशी वेशभूषा अथवा कुसुम-चापपाशा' ही आपली सुप्रसिद्ध कविता केळकरांनी स्वाक्षरात तिला अर्पण केली. ती हिराबाईंनी आपल्या घरी फ्रेम करून लावली. गडकरी तिला हिराभगिनी म्हणत. बाईंचे घर तत्कालीन विद्वानांचे आश्रयस्थान झाले होते.

**थोरामोठ्यांनी मानलेली मर्मज्ञ संगीतकार**

हिराबाई संगीतकलानिपुण असून त्यांच्याजवळ चालींचा चांगला भरणा होता. कोल्हटकर, खाडिलकर, केळकर गडकरी वगैरे नाटककारांनी हिराबाईंकडून आपल्या पदांना चाली लावून घेतल्या. 'अप्रकाशित गडकरी' या पुस्तकात गडकऱ्यांची जी रोजनिशी प्रसिद्ध झाली आहे. त्यात 'रविवार १४ मे १९१६ मुंबई' या खाली हिराबाईंकडून बारा चाली आणल्या असा उल्लेख आहे. २२ मे १९१६ रोजी पण 'हिराबाईंकडून दोनतीन चाली आणल्या. एक पद केले, असा मजकूर आहे. तत्कालीन मराठी



"फॉरीन एक्स्चेंज म्हणजे काय... ते विचारत होतीस ना?"

नाटयसंगीतावर हिराबाईंच्या संगीत-कलेने किती परिणाम केला हे यावरून वाचकांच्या सहज लक्षात येईल.

### असे मूर्ती सांवळी ठेंगणीशी

हिराबाई दिसायला कशा होत्या? त्यांच्या उपलब्ध छायाचित्रावरून त्या साधारण ठेंगण्या असाव्या असे वाटते. श्री. मामासाहेब वरेरकरांनी दि. २१ एप्रिल १९६३ रोजी 'तरुण भारता'त प्रसिद्ध केलेल्या लेखात 'पाणीदार मोहक डोळयाची तरतरीत तरुण स्त्री' असे बाईंचे वर्णन केले आहे. बाईंचे शेवटचे यजमान श्री. कृष्णाजी नारायण नेने म्हणतात "वर्णाने सावळया पण रेखीव अशा त्या होत्या." "अप्रकाशित गडकरी"च्या प्रस्तावनेत आचार्य अत्रे 'हिराबाई सुस्वरूप होत्या' असं सांगतात तर कोल्हटकर त्यांच्या 'विभ्रमयुक्त सौंदर्याचा' आत्मवृत्तात उल्लेख करतात. तात्पर्य हिराबाई सावळया रंगाच्या, तरतरीत, मोहक, मृगनयनी, रेखीव, सौष्ठवपूर्ण होत्या.

### कोल्हटकर–तंत्राची स्पष्ट छाप

कोल्हटकर यांच्या सहवासाचा व मार्गदर्शनाचा परिणाम बाईंच्या दुसऱ्या नाटकावर स्पष्ट दिसतो. त्यांच्या नाटयकृतीचा आदर्श ठेऊनच त्यांनी आपले दुसरे नाटक 'दामिनी' लिहिले. 'संगीत दामिनी' हे नाटक १९१२ साली प्रसिद्ध झाले. त्याचा आकार ४॥" × ७।" असून पृष्ठसंख्या ११२ व मूल्य १२ आणे होती. ते नाटक कर्नाटक प्रेसमध्ये छापून स्वतः हिराबाईंनीच प्रसिद्ध केले. त्यावर प्रकाशक हिराबाई पेडणेकर, गांजावाला चाळ, कांदेवाडी मुंबई असा पत्ता आहे. त्या नाटकाला जोडलेल्या प्रास्ताविकात बाई लिहितात : "सुमारे पांचसहा वर्षापूर्वी एका पौराणिक कथानकाच्या आधारे मी 'जयद्रथ विडंबन' नांवाचे एक लहानसे संगीत नाटक लिहिले. मजसारख्या एका अशिक्षित स्त्रीची ती अगदी सामान्य कृती असतांना देखील, स्त्रीशिक्षणाविषयी कौतुक व कळकळ असणाऱ्या अनेक विद्वान व रसिक गृहस्थांना ती आवडली,

(दीपा. ११)



श्रीमती हिराबाई व श्रीयुत कृष्णाजी नारायण नेने

असे कळल्यामुळे प्रोत्साहन येऊन एक मोठे स्वतंत्र नाटक लिहावे, असे मला वाटू लागले. प्रस्तुत नाटक हे त्याच विचाराचें फळ आहे.

'दामिनी' हे नाटक किर्लोस्कर नाटक मंडळीने रंगभूमीवर आणावे, अशी हिराबाईंची फार इच्छा होती. कंपनीचे एक मालक व हिराबाईंचे पहिले यजमान श्री. नानासाहेब जोगळेकर यानी त्या दृष्टीने बरेच प्रयत्न केले. पण शंकरराव मुजुमदार, गणपतराव बोडस प्रभृती मंडळीनी त्याला प्रखर विरोध केला. किर्लोस्करसारख्या प्रतिष्ठित नाटयसंस्थेने नायकिणीचे नाटक रंगभूमीवर आणण्याची कल्पनाच त्यांना सहन होईना. त्यावेळी गडकऱ्यांचे 'गर्वनिर्वाण' हे नाटक देखील कंपनीसमोर होते. हिराबाईंसारख्या सामान्य स्त्रीने, आपले नाटयगुरु कोल्हटकर यांच्याप्रमाणे, नाटक लिहिण्याचा प्रयत्न करावा ही गोष्ट गडकऱ्यांना मुळीच रुचली नाही. हिराबाईंच्या नाटयलेखनाविषयी तत्कालीन उच्चभ्रु समाजात काय भावना होती हे गडकऱ्यांच्या खालील कवितेत प्रतिबिंबित झाले आहे–

**नाचतो मोर। नाचते पहा लांडोर**
**त्याचा आनंदाचा नाच। दिवे लावले**
**जाळुनि पाच**
**कोठे हिरा, कुठे ही काच। बघुनी समोर**
**॥ नाचते ॥**
**कमअस्सल या अक्करमाशा। ताज्या**
**रक्ता जळवा जशा।**
**करिती जगती स्वैर तमाशा। रूप अघोर**
**॥ नाचते ॥**

यात मोर म्हणजे कोल्हटकर व लांडोर म्हणजे हिराबाई हे चाणाक्ष वाचकांच्या लक्षात आले असेलच.

### कोल्हटकर हरले, भोसले विजयी झाले

हे नाटक आपले नाटयगुरु कोल्हटकर यांना अर्पण करण्याची हिराबाईंची इच्छा होती. पण कोल्हटकरांनी हे समर्पण स्वीकारले नाही. आपल्या आत्मवृत्तात कोल्हटकर लिहितात, "हिराबाई पेडणेकरांचे दामिनी नाटक प्रसिद्ध होऊन रंगभूमीवर आले होते. त्यास मी सूचनाद्वारा बरीच मदत केलेली असल्यामुळे ते मला अर्पण करण्याचा बाईंचा विचार होता पण तसे केल्यास टीकाकारांच्या

हाती एक नवे शस्त्रच तयार करून दिल्यासारखे होईल, असे माझ्या चुलत्यांचे मत पडल्यामुळे मी त्या गोष्टीला मान्यता दिली नाही."

पण बाईंच्या नाटयलेखनाची कदर ललितकलादर्शचे गुणी मालक व सुप्रसिद्ध नट केशवराव भोसले यानी केली. त्यानी बाईंचे नाटक बसवायला घेतलं व ते बसवलेही उत्तम. त्यावरचा मासिक 'मनोरंजन'चा अभिप्राय लेखाच्या सुरुवातीला उद्धृत केला आहेच. केशवराव स्वत: दामिनीची भूमिका करीत. ह्यातील मधुर पदरचनेमुळे प्रेक्षक तृप्त होत. 'अप्रकाशित गडकरी'च्या प्रस्तावनेत आचार्य अत्रे लिहितात, "दामिनी हे नाटक केशवराव भोसले यांच्या ललितकलादर्श नाटक मंडळीनी रंगभूमीवर आणले होते. किर्लोस्कर कंपनीसाठीही बाईंनी दुसरे नाटक लिहिले नसून दामिनी हेच नाटक त्यांना सादर केले होते व तेच नाटक ललितकलादर्शने रंगभूमीवर आणले".

नटवर्य गणपतराव बोडस लिहितात, "बाईंचे दुसरे नाटक 'दामिनी' कै. केशवराव भोसले यांनी रंगभूमीवर आणले पण ते फार दिवस चालले नाही. त्यातील पदे गोड होती. प्रसिद्ध नाटककार श्री. वरेरकर आपल्या तरुण-भारतातील लेखात लिहितात, 'त्या नाटकावर ऑथेल्लो नाटकाची थोडीशी छाया आहे. रचना जरा विस्कळित वाटली. त्यातील पदे जितकी उत्तम आहेत, तितकीच ती गेय आहेत. आणि काव्यमयही आहेत. त्यातल्या बहुतेक चाली मानापमान नाटकातही आलेल्या होत्या. पण त्या नाटकातल्या पदापेक्षा 'दामिनी' नाटकातील पदे जास्त कर्णमधुर होती. मानापमान नाटकाच्या प्रयोगात जोगळेकरांच्या तोडीने किबहुना कांकणभर सरस ती पदे केशवराव म्हणत असत. श्री. माडखोलकर लिहितात, "या नाटकाचे कथानक गुंतागुंतीचे, रचना कृत्रिम, भाषा अलंकारिक आणि पदे कल्पनामंडित आहेत. सारांश, कोल्हटकरांच्या नाटकातील गुणावगुणाचा ठसा या नाटकावर उमटलेला स्पष्ट दिसतो."

या तिन्ही अभिप्रायांचे मर्म लक्षात घेता पदरचना-कौशल्य हिराबाईंच्या ठायी असले, तरी नाटयरचनेचा गुण मात्र त्यामानाने कमी होता असे दिसते. हिराबाईंचे नाटयकर्तृत्व या दोन नाटकांपुरतेच सीमित आहे.

**रंगभूमीला झालेला अपघात**

इतक्यात १९११ च्या नोव्हेंबरमध्ये



जुनी थेटरें, जुने प्रयोग, जुन्या जाहिराती ! ...२

## हल्याळकरांच्या दोन टांगा !

मुंबईला एल्फिन्स्टन आणि रिपन अशी दोन थेटरे जवळजवळ होती. मागील बाजूने दोन्ही थेटरांची रंगभूमीकडील बाजू एकमेकासमोर येत असून मध्ये एक बारा पंधरा फुटांचा खाजगी रस्ता होता. रंगभूमीच्या बाजूस रंगपट, कपडेपट असावयाचा. त्या खोल्यास जोडून दोन्ही थिएटरांचा एक व्हरांडेवजा भाग या खाजगी स्वरूपाच्या रस्त्यावर एकमेकासमोर येत होता.

त्या काळात विजेचे जुन्या तऱ्हेचे मोठ्या पात्यांचे पंखे प्रेक्षकांच्या डोक्यावर फिरते ठेवलेले असून रंगभूमीवर किंवा रंगपटात विजेचे पंखे नव्हते. रविवारी दिवसा प्रयोग असला तर रंगभूमीवर वा रंगपट कपडेपटीच्या खोल्यांत फार उकाडा व्हावयाचा. ज्या पात्रांचे रंगभूमीवर काम नसे अशी पात्रे व्हरांडयात उघडया हवेवर येऊन बसत. समोरील व्हरांडयात त्या थेटरातील खेळांची पात्रे हवेसाठी येऊन बसलेली असावयाची. एकमेकांच्या जागेत जाऊन सुद्धा नटवर्गाच्या गप्पा गोष्टी चालत. रंगलेल्या पात्रांच्या रंगणाऱ्या गप्पागोष्टीना कधी कुणाची आडकाठी होण्याचा संभव नव्हता.

एकदा गंमत झाली. शाहूनगरवासीचा प्रयोग एल्फिन्स्टनमध्ये चालू होता. समोर रिपन थिएटरमध्ये लक्ष्मीकांत प्रासादिक नाटक मंडळीचा शारदा नाटकाचा प्रयोग चालू होता. रविवार दिवसाचा खेळ. रंगभूमीवर खूप उकाडा होत असल्याने दोन्ही कंपन्यामधील नटवर्ग मागच्या बाजूस व्हरांडयात जमला होता.

नटश्रेष्ठ गणपतराव जोशी रंगून आपल्या एंट्रीची वाट पहात बसलेले होते. लक्ष्मीकांत प्रासादिक कंपनीचे मालक नटवर्य दत्तोपंत हल्याळकर समोरच्या बाजूस येऊन गणपतरावांशी गप्पागोष्टी करीत बसले होते. पानतंबाखू जमविला जात होता.

हल्याळकरांची देहयष्टी मोठी रुबाबदार भव्य आकाराची. त्यांचा आवाज पहाडी असला तरी त्यांचे गाणे कानाना अतिशय गोड. हल्याळकरांची शारदेच्या प्रयोगात कोदंडाची भूमिका होती. चांगले दर्शन आणि गोड गाण्याने त्यानी खूप लोकप्रियता मिळविली होती. कोदंडाची रंगभूषा वेषभूषा सजवून ते गणपतरावांशी बोलत बसलेले असताना त्यांच्या बाजूने 'कोदंड' 'कोदंड' असा एकदम ओरडा सुरू झाला. कोदंडाची रंगभूमीवर एंट्री होण्याची वेळ आली परंतु कोदंड मात्र रंगभूमीपासून पन्नास साठ फूट अंतरावर दुसऱ्या थेएटरमध्ये जाऊन गप्पा मारीत बसलेला !

हल्याळकरानी दोन टांगात त्यांच्या बाजूचा व्हरांडा गाठला आणि पायऱ्या चढत असताना तेथूनच त्यानी 'नामे ब्राह्मण खरा' ही कोदंडाची साकी नेहमीपेक्षा आणखी वरच्या टीपेत सुरू केली. पद संपेपर्यंत ते रंगभूमीवर जाऊन उभे राहिले.

इतक्या लांबून सुरू झालेली त्यांची साकी अगदी पिटातल्या प्रेक्षकानासुद्धा प्रथमपासून स्पष्ट ऐकावयास मिळाली. आतमध्ये काही गोंधळ झाला याची प्रेक्षकाना जरासुद्धा कल्पना आली नाही. हल्याळकरानी आपल्या भरदार उंच आवाजाच्या सामर्थ्याने आणि समयोचित अशा प्रसंगावधानाने ही वेळ निभावून नेली होती.

—केटी



अनुक्रमणिका

बाईंचे यजमान श्री. नानासाहेब जोगळेकर यांचे ऐन तारुण्यात अकस्मात् निधन झाले. नानासाहेब जोगळेकर मर्दानी सौंदर्याचा नमुना असून मानापमानातील धैर्यधराच्या भूमिकेमुळे ते कीर्तीशिखरावर आरूढ झाले होते. हिराबाईंचे त्यांच्यावर विलक्षण प्रेम होते. वेश्याव्यवसाय करण्याचा मावशीचा सल्ला न मानता हिराबाई अत्यंत अल्प वर्षासमावर १९०१-पासून जोगळेकर यांच्या आश्रयाला होत्या. त्यांच्या मृत्यूचा धक्का हिराबाईंना सहन झाला नाही. त्यांच्या प्रकृतीवर व मेंदूवर त्याचा अनिष्ट परिणाम व्हायला लागला. अशा वियुक्त, व्यथित व विकल हिराबाईंना सहृदय कोल्हटकरांनी खामगांवास स्वतःजवळ वेगळे बिऱ्हाड करून आश्रय दिला. श्री. माडखोलकर लिहितात "आत्मवृत्ताच्या मूळ हस्तलिखितात या घटनेचा स्पष्ट उल्लेख होता पण मुद्रित आवृत्तीत तो नाही बहुधा १९१३ सालची ही घटना असावी."

पण हिराबाई फार काळ खामगांवाला राहिल्या नाहीत. त्या १९१४–१५ च्या सुमारास मुंबईस परतल्या. पण त्यांचे प्रतिभाजीवन संपुष्टात आले होते. वीज पडलेल्या वेलीसारखी त्यांची अवस्था झाली होती. त्यांना पुन्हा काव्याचे हिरवे, लसलशीत धुमारे फुटलेच नाहीत. दरम्यानच्या काळात हिराबाई व कोल्हटकर यांच्यात विविध कारणामुळे गैरसमज होऊन त्यांचे संबंध संपुष्टात आले.

१९१५ च्या सुमारास हिराबाईंचा परिचय बी. बी. सी. आय रेल्वेतील असिस्टंट कंट्रोलर ऑफ स्टोअर्स श्री. कृष्णाजी नारायण नेने यांच्याशी झाला. श्री. नेने रसिक व साहित्यप्रेमी होते. हिराबाई नेनेसाहेबांच्या आश्रयाला गेल्या. १९२७ साली सेवानिवृत्तीनंतर श्री. नेने कोकणात गुहागर तालुक्यातील आपले मूळगाव पालशेत येथे हिराबाईंसह जाऊन राहिले. तेथेच १८ ऑक्टोबर १९५१ रोजी कॅन्सरच्या विकाराने त्यांना देवाज्ञा झाली. श्री. नेने यांच्याजवळ हिराबाई सुमारे ३६ वर्षे होत्या. पण आपल्या कलाजीवनाला पूर्णविराम देऊनच त्यांनी नेनेंच्या घरात प्रवेश केला होता. "संगीत व साहित्य क्षेत्रातील प्रतिष्ठा त्यांना समाजात सुप्रतिष्ठीत करण्याच्या बाबतीत उपयोगी पडली नाही व चाळीशी उलटल्यावर अखेर नटव्या नाटकी दुनियेचा निरोप उद्वेगाने घेऊन त्या मानीनीला अज्ञातवासात उत्तरायुष्य घालवावे लागले"–(माडखोलकर)

हिराबाईंबद्दल लिहिताना श्री. वरेरकर म्हणतात, "सर्वसाधारण समज असा आहे की मराठी भाषेतल्या पहिल्या स्त्री-नाटककार म्हणजे गिरिजाबाई केळकर. पण गिरिजाबाईंच्या कितीतरी वर्षे आधी हिराबाईंनी 'जयद्रथ विडंबन' आणि 'दामिनी' ही दोन नाटके लिहिली होती. त्यापैकी 'दामिनी' हे नाटक केशवरावांनी रंगभूमीवर आणले होते . . . पण त्यांच्या (हिराबाई) विशिष्ट सामाजिक परिस्थितीमुळे त्या मागे पडल्या. मराठी रंगभूमीवर जे काही अपघात घडले होते, त्यातला हा एक अपघात होय."

ज्या कलावान स्त्रीने तत्कालीन रंगभूमीवर विविध नात्याने सतत सतरा वर्षे प्रभाव गाजविला तिच्या मृत्यूची बातमीदेखील त्यावेळी एकाही मराठी वृत्तपत्रात आली नाही. एक सुगंधी फूल आपल्या सुगंधाचा दरवळ उनलवते न उमलवते तोच परिस्थितीच्या दडपणामुळे निर्माल्यवत् झाले व शेवटी अज्ञातवासात सुकून गेले . . . . . . ●●●











अनुक्रमणिका



—पद्माकर गोवईकर

तिच्या मनातला आंबा आतल्या आत म्हवरून घमघमला, आणि त्याच्या मनाला दीसभर जांभळाचे घोस लटकले. मग तोंडातल्या पानाने तोंडे, गाल लाललाल करू लागली. दोघाना जोंधळ्याचे ते दाट रान विरळ वाटू लागले.

# चूक भूल



बंडोबा मुतनाळे ह्या इसमाला रात्री अंगावर फक्त लंगोट असल्याशिवाय झोप येत नसे. ही सवय त्याला लहानपणापासून लागली होती की काय कोण जाणे. पण असे होते खरे. याचे एक कारण त्याला ती संवयच होती, हे एक, आणि दुसरे, कपडे स्वत:ला धुवायला लागायचे तेव्हा जास्तीत जास्त दिवस ते चांगले ठेवायचे हा त्यातला निर्मळ हेतू. काही असो, त्याला ही सवय होती हे खरे. लंगोटावर धोतर आले की त्याची झोप उडालीच. कंबरेला फक्त लंगोट हवा, की मग झकास झोप. एक दोन वेळा त्यानं धोतर नेसून झोपायचा प्रयत्न केला. पहाटेपर्यंत झोप नाही. पहाटे उठून धोतर फेडले आणि पुन्हा झोपला. झोपला ते दिवस डोक्यावर येईपर्यंत—जाग नाही. काय त्याच्या लंगोटात जादू होती कोण जाणे, पण अशी झोप लागायची. 'अगायायाया ह्ये भलतंच झालं' करून मग घाईघाईने तो उठायचा. बाकीचे गडी त्याची टिंगल करायचे.

"बंड्या लेका, लगीन झाल्यावर कसं व्हायाचं रं?" मार्त्या म्हणाला.

"त्यात काय व्हायाचंय?" जगन्यानं विचारलं.

"बायकू दील अशी रोजच्याला झोपून?"

"का झालं?"

"रोजच्याला?"

"मी म्हनतो दील," जगन्या म्हणाला, "बायामाणसास्नी त्याची आवड आसतिया......"

"आं?"

"हां! पण पोरबाळं झाल्यावर त्येंच्या देखतबी असा नांगळ्यानं झोपनार व्हय रं?"

"कोन लगीन करतंय?" असे बंडोबा मऊ आवाजात बोलायचा. आणि त्याचे ते बोलणे इतरांच्या खिदळण्यात बुडून जाई.

असे असले तरी बंडोबा मुतनाळे हा देवाघरचा सौम्य आणि

अनुक्रमणिका

सात्विक आविष्कार होता. लंगोटावर झोपण्यामुळे सभ्य नाही असे होण्याचे काय कारण? इंग्लंडात तर लाँड्रीचा खर्च फार येतो म्हणून बायासुद्धा लंगोटावर झोपतात. बंडोबा तर मर्द गडी होता. त्यानी लंगोटावर झोपायचे नाहीतर कुणी? असे झोपूनसुद्धा आदर्श सभ्य राहता येते ह्याचे तो उदाहरण होता. बंडोबा एवढा जबरदस्त सभ्य होता की, त्याला स्वतःच्या मुतनाळे या आडनांवाची सुद्धा शरम वाटत होती. वाडवडिलांनी खूप कर्ज ठेवले असते तरी चालले असते, पण हे आडनांव काय म्हणून ठेवले असेल, असे त्याला वाटायचे. एकदा तालुक्याला मामलेदार कचेरीत सात—बाराचे उतारे आणायला म्हणून तो गेला होता. मामलेदारापासून शिपायापर्यंत चकचकीत नाण्यांचा हुरडा प्रत्येकाच्या हातावर ठेऊन तो कागद मिळण्यासाठी दार धरून बसला. त्याने पैसे दिल्याबरोबर लगेच कागद देणे बरे दिसणार नाही, म्हणून कारकुनाने तासभर त्याला बसवून मगच वर असलेले कागद घ्यायला त्याला हाक मारली. आणि इथे सारे बिघडले.

"अहो, मुतनाळे ऽऽ" कारकुनाने हाक मारली. ते आडनांव ऐकून पलिकडच्या टेबलावर काम करणारी शेलाटया अंगाची एक पोरगी फिस्सकन् हसली. बंडोबाला ही गोष्ट फार लागली. एक पोरीने आपल्या आडनांवाला हंसावे म्हणजे काय? तेहि तालुक्याच्या? शहरगांवची असती तर एक ठीक होते. बंडोबाला वाटले, भुईमुगाच्या शेंगेसारखे फटकन् उचलून आपल्याला तिने फोडले.

फोलकट होऊनच तो गांवाकडे आला. आल्याबरोबर त्याने झालेला किस्सा आपल्या दोस्ताना सांगितला. ती पोरगी आपल्या आडनांवाला कशी हसली. त्याने आपला अपमान कसा झाला आणि आपण आडनांव बदलायचे कसे ठरवले आहे हे सगळे त्याने सविस्तर सांगितले. आणि वर कोणते आडनांव ठेऊन घ्यायचे हेहि विचारले. सल्ला विचारला तशी सगळयानी त्याची टिंगलच उडवली. खुराड्यातल्या कोंबडयांगत सगळे कॉंक् कॉंक् कोऽऽ करून हसले. त्या हसण्याने बंडोबा शरमला. त्याला इतकी शरम वाटली, इतकी शरम वाटली की, त्याला वाटले आपण एक देखणी कोंबडी आहोत. आपल्याला पका पका अंडी पडताहेत आणि ते पाहून सगळे कोंबडे चोची वासून हसताहेत. बराच वेळ त्याला असे वाटत राहिले. त्या वाटण्याने तो जास्तच लाजला आणि मंडळी आणखी केकाटत राहिली.

थोडया वेळाने सावरून तो म्हणाला, "लेकानू, टिंगल उडीवता व्हय माझी?"

"मुतनाळया लेका—"

"ए, मारत्या, मला मुतनाळया म्हणू नगं. . . . ."

"बरं राह्यलं. बंडया लेका, टिंगल कुनी उडीवली रं त्या पोरीनं का आमी. . . . . . ?"

"बघा की म्याच्यायला. ती फ्यें फ्यें करून हसली तवा गुंबगुल्या झाल्या आसतिला.."

"ते जाऊ द्या. . . नांव बदलायची कायतरी आयडिया सांगा. . ."

"आयडिया कशाची त्यात?" जगन्या चार हापिसात येऊन जाऊन फिरल्यापैकी होता. त्याने सुचविले, "सर्कारी ग्याझेटात आर्जू करून कळीव, की अश्यान् असं नांव बदलायचं हाय. . ."

"ह्ये आनि ग्याझेट कसलं?" बंडोबाने विचारले.

"कशाचं ग्याझेट घेऊन बसलास खुळ्या!"

"मंजे?"

"त्यापरीस आसं कर. . . ."

"कसं?"

"गांवच्या वेशीवर एक दांडगा पाळणा बांध. . . चांगला फुलानी सजीव. . . त्यात आडवा हो. अन् इंदिरा गांधीस्नी बोलावून चांगलं लेजीम लावून बारसं कर. . . झटक्यात नांव बदलतय् बघ. . ." किश्या बेनवाड आसं बोललं आणि पुन्हा सगळे क्वाक् क्वाक् कोऽ करून केकाटले. बंडोबाला पुन्हा पका पका अंडी पडताहेत असे वाटले.

"ए साडेशिटलीच्यानो, मागनागत बोला की रं बाईब..."

बंडोबा असे रडकुंडी येऊन म्हणाला तसे गंभीर होऊन किश्या म्हणाला,

"एक बोलू का?"

"बोल..."

"त्ये शिणिमात एक शी. रामचंदर म्हून हाय बघ.."

"बर मग!"

"तसं कायतरी करून घे तुज्या आडनांवाचं. . ."

"मजी कसं काय बरं?"

"मजी विग्रजीत मुतनाळयाचं काय हुतं बग. अन् त्ये नांवाच्या मागं लावायचं बग..."

"त्ये आनि कुटं बगायचं?"

"कुरकळण्याच्या दत्त्याला इचार की. झटक्यात सांगील त्यो..."

"म्या एकला न्हाई जायाचो बगा. तुमी चला समदं.."

"थोत तुज्यायला... बरं चला....."

सगळे मिळून कुलकर्ण्याच्या दत्त्याकडे गेले. त्याला घोळात घेऊन किश्यानं शेवटाला विचारलं,

"मंग तसं मुतनाळयाचं काय हुईल हो विंग्रजीत?"

"तसं म्हणजे?" कुलकर्ण्याला अगदी फालतू गोष्टीतसुद्धा क्रॉसिंग करायची संवय होती.

"त्ये शी. रामचंदरसारकं."

"तसं व्हयं?"

"हां!"

"तसं म्हणजे. बघा ह्यांचं, एम. बंडोबा होईल..."

"ह्याक.. यम बंडोबा.."

"यम नव्हे, एम."

"त्येच यम्बंडोबा"

कुलकर्ण्याने नाद सोडला. आणि मंडळी यम्बंडोबा म्हणत पांगली..



अनुक्रमणिका






असा हा-बंडोबा सभ्य आणि सात्विक होता. आडनांवातहि अश्लीलता राहू नये यासाठी झटणारा यम्बंडोबा सभ्य होता तसा देवभक्तहि होता. डोक्यात सदैव देवाबद्दलचे विचार. रस्त्यात भेटणाऱ्या प्रत्येक देवळाला तर तो नमस्कार करीत असेच, पण एखादा दर्गा दिसला तरी मनातल्या मनात ढुंगण वर करून तो त्यापुढे नमाज पढलेला असे. देवात कसली जातपात? हे सगळे जग देवाच्या इच्छेने चालले आहे. आपण सगळे देवाचे 'शेवक' आहोत. सृष्टीतील प्रत्येक हालचाल देवाच्या इच्छेने होत असते. झाडाचे पान देखील देव येऊन हलंवतो. देवाने पहाट केली ती उठलेल्या जिवाला एकदम सुख वाटावे म्हणून. दिवस केला तो शेते पिकावीत म्हणून, पाऊस केला तो त्यांना पाणी मिळावे म्हणून, संध्याकाळ केली ती रात्रीच्या–झोपेची तयारी करण्यासाठी आणि रात्र केली ती झोपण्यासाठी म्हणून. हे सगळे चक्र देवाच्या आज्ञेने चालले आहे. देव त्या चक्रात बोट घालतो आणि ते फिरवतो. मग रात्र, पाऊस काय त्याला वाटेल ते सुरू होते. यम्बंडोबा अशा विचाराने सदैव पछाडलेला असे. त्या नादात त्याने एकदा सवयीने रस्त्यावरच्या गाईच्या शेपटीखाली हात लावून नमस्कार केला. थोडे पुढे गेल्यावर त्याला कळले की, ते विष्ण्या परटाचे गाढव होते... इकडे तिकडे बघून त्याने पैरणीला हात पुसला होता.

बंडोबा मुतनाळे हा जसा देवभक्त होता, तसा तो सदवर्तनीहि होता. अष्टगंधासारखे सगळे गुण त्याच्या ठायी एकवटले होते. सदवर्तनी- राहण्याचे कारण मुळातच तो स्त्री द्वेष्टा होता. बाई जातीची पेरणी ही देवाने केलेली फार भयंकर चूक आहे. ती त्याची त्यालाहि कबूल असली पाहिजे. बापईगड्याला देवाने घातलेले ते फार मोठे साकडे होते, असे यम्बंडोबांचे मत होते. त्यामुळे त्याने मरेपर्यंत लग्न न करण्याचे ठरवले होते. देवाने केलेली चूक शक्य तितकी आपण तरी सुधारावी म्हणून त्याने नुसते लग्न करण्याचेच नव्हे, तर ताटीवर आडवे होईपर्यंत ब्रह्मचारी राहण्याचे वयात येण्यापूर्वीच ठरवले होते. बाईचे कोमल हृदय, तिची काळजाला डवरे पाडणारी नजर, आणि तिचा तो साळुंखीगत मंजुळ आवाज या गोष्टी माणसाला मसणवटीत पोचीवणाऱ्या आहेत, तर त्यांच्या वाटेला जाच कशाला?

बायांच्या विषयात तो एवढा कडक असे की रानातसुद्धा बायांचा घोळका जियं काम करायचा त्याच्या नेमके-विरुद्ध असलेल्या तुकड्यात तो काम करीत असे. स्वतःची शेतीवाडी असली तरी जोंधळ्याच्या रानाचा त्याने तसा कधी दुरुपयोग केला नाही. आता घरमालकीणीचा चेहेरा त्याला दिवसातून दोनतीन वेळा बघावा लागे. पण तिला त्याने बहिण मानल्यामुळे तसे गर्ह्य वाटण्याचे त्यात कारण नव्हते. ताई तेलीण तिचे नांव. बाई विधवा होती. ऐन वयात तिच्या जवानीचं कोळसं झालं होतं. असे असले तरी ताई तेलीण दिसायला बऱ्यापैकी होती. तिचे नको तिथले अवयव मजबूत होते. चालणारा सहज तिच्यामागे चालत राहिला असता तर हातातले काम विसरून तो ती जाईल तिथपर्यंत तसाच चालत राहिला असता. शिवाय तिचा वर्ण सावळा होता आणि काठी शेलाटी होती.

पण असे सर्व ठाकठीक असले तरी बंडोबा मुतनाळ्यासारख्या ब्रह्मचाऱ्याला त्याचे आकर्षण वाटत नव्हते. याचे एक कारण त्याने ताई तेलीणीकडे नजर भरून कधी पाहिलेसुद्धा नव्हते. आणि दुसरे नांवाने आणि नात्यानेसुद्धा ती त्याची ताई होती. कधी तरी महिन्याचे भाडे देताना तिचा सर्वांग देह तो पाहात होता. ते सुद्धा किती, अगदी खिनभर. तेवढ्याने काय कळणार?

तेलीण मात्र त्याच्याकडे बघून पुष्कळ वेळा खाजगी हंसत असे. आणि भाडे देतेवेळी सुद्धा दोन पायावर डुलत म्हणायची, "अडचन आसंल तर ऱ्हाऊं द्या या म्हयन्याला." बंडोबाला पैशाची तशी फारशी अडचण कधीच पडत नव्हती. पण पुष्कळ वेळा त्याला असे वाटे की, ताई म्हणतीय् तर एकदा तरी आपण अडचण आहे असे म्हटले पाहिजे. तेहि कधी झाले नाही. तिच्या या बोलण्याने जोंधळ्याचे पोते सुटावे तसे त्याच्या मनात काहीतरी भळाभळा वाहात राहायचे. आणि असे वाटले रे वाटले की, तो सरासरा धोतार फेडायचा आणि नुसत्या लंगोटावर उठाबशा काढायचा, नाही तर भिंतीच्या आधाराने शीर्षासन करायचा. मग थंड डोक्याने विचार करायचा की, या सुगीला घर बांधायला काढलेच पाहिजे. वास झालं ह्ये दुसऱ्याच्या घरात ऱ्हानं. तो मनात असे म्हणत होता आणि प्रत्यक्षात तेलणीच्या घरात राहत होता. ब्रह्मचारी कावळ्याचे तिरडीशिवाय काही बांधले जात नाही हे बंडोबाला माहित नव्हते.

बंडोबाला खरे तर काहीच माहित नव्हते. या नेमचंद बाईबद्दल एक दिवस जगन्या आणि मारत्या कागाळी घेऊन आले. ते दोघे काही दिवस तिच्या पाठी गुंगले होते. पण तिचं मन आपल्याकडे लागत

---

अहा, भारत त्रिराज, वर्ष हे पर्यटनी गाज.... ३



गरिबीचा जवळून अभ्यास करण्यासाठी परदेशात जाताहेत म्हणे ......... हे पर्यटन वर्ष आहे ना?

अनुक्रमणिका

नाही हे बघितल्यावर त्यांनी तिचा नाद सोडून दिला होता. नाद सोडला होता पण तिची पाठ त्यानी सोडली नव्हती. ते तिच्या मागावर होते. आपल्यावर नाही तर दुसऱ्या कुणावर हिचे मन उडचा घेतंय हे कळायला नको का, म्हणून वाघरासारखे ते तिच्या मागे होते. सकाळ-संध्याकाळ ती तांब्या घेऊन बाहेर पडली तरी ह्या दोघांपैकी एकाच्या हातात तांब्या असायचाच. नुसताच तांब्या उसात ओतून परत यायचे पण तिची पाठ सोडायचे नाहीत. आता इतके मागे लागल्यावर कायतरी घावणारच की हो! एक दिवस रातच्याला गावाबाहेर चांदण्यात ही बया कुणाच्या तरी मिठीत बसली होती. कुलकुलु आवाजात बारीक बोलत होती. पाखरासारखा आवाज काढून हसत होती. जगन्या आणि मार्त्यानं ते पाहिले. पुढे जाऊन दोघाना दावून धरण्याचे धारिष्ट त्यांना नव्हते असे नाही. पण त्यांचा तो हेतू नव्हता. त्यांना नुसती तिची भालगंड पाहायची होती. त्यांनी पाहिले. गडी कोण होता ओळखू आला नाही. तिला मात्र त्यांनी ओळखले. आणि त्याच पावली घावत येऊन त्यानी ही गोष्ट बंडोबाच्या कानी घातली,

"आयला, लई लाखाची हाय की रं!" मार्त्या म्हणाला.

"थोत त्याच्यामायला ह्यो ह्या तेलणीच्या!" जगन्याने मोघमात न ठेवता नांव घेऊन शिवी हाणली.

"तेलीण!" बंडोबा दचकला.

"व्हय तेलीण...!"

"कोंची!"

"तुजी घरमालकीन."

"आन् का केलं तिनं?"

मग मारत्याने आणि जगन्याने वग लावावा तशी सगळी हकीकत सांगितली. गावाबाहेर चान्नं कसं पडलं होतं, चान्न्यात दोघं बांघावर कशी बसली होती, जगन्यानं प्रथम कसे पाहिले, आणि थोड्याच वेळात मिठीत जाताना मारत्याला ती कशी सायनासंगीत सापडली हे त्यांनी अगदी समग्र बंडोबाला ऐकवले... मुतनाळयाला एक भोवळ यावी तसे झाले. त्याचा विश्वासच बसेना. जगात इतके वाईट प्रकार असतात? आपण बहिण मानलेली तेलीण कुणाच्या तरी मिठीत जाते? कुणाचं तरी मुकं घेती? आता या कहाराला काय म्हणायचे? जीव घावरा होऊन बंडोबा म्हणाला,

"मार्त्या—जगन्या, आसं व्हायचं न्हाई. माजी आक्का त्यातली न्हवं..."

"मुतनाळ्या लेका..."

"जगन्या, मला मुतनाळ्या म्हणू नंग..."

"आरं बेन्या, आमी डोळ्यानं बघटलं ते खोटं आन् तुझं खरं व्हय?" मारत्याने जवळजवळ बंडोबाची मानच धरली.

"माजा इस्वास न्हाई..." बंडोबा म्हणाला.

"रांडच्या, त्वा उंद्याच्याला जाऊन बग की..."

"आरं त्यो कशाचां बगतोय! ह्यो निस्ता तिचं भाडं भरत बसनार हितं; माजी आक्का... माजी आक्का करीत...आक्काला वापरल्यात तकडं दुसरंच."

मारत्याच्या या बोलण्याने बंडोबाचे मस्तक अगदी गरम होऊन गेले. त्याची कानशिले तापली. रागाने तो म्हणाला,

"लेकानो, किडं पडतील तुमच्या तोंडात..."

"बंड्या लेका, तेलीण तकडं मिठ्ठ्या मारतीय आन् आमचं किडं पाडतोस व्हय?"

"आरं, बिनअक्कल्या, तू सोत्त जाऊन बग की..."

बंड्याला हे पटले. त्याचे दोस्त थोर कुळातले जरी नव्हते तरी नालायकसुद्धा नव्हते. उगाच एखाद्याबद्दल असं बोलणाऱ्यातले ते नव्हते. अशी आग लावण्यात त्यांचा काय प्राफिट होता? ते म्हणतात त्यातला बराचसा भाग खरा असलाच पाहिजे. एरवी आपण बहिण म्हणून मानलेल्या तेलणीबद्दल असे बोलायचे त्यांना काय कारण? आपण दस्तुरखुद्द डोळ्यांनी बघीतलेच पाहिजे. असे मनाशी ठरवून तो म्हणाला,

"म्या डोळ्यानी बघटल्याशिवाय खरं मानणारा न्हाई..."

"जा बघून ये, जा..."

"चांगला चष्मा लावून जा बघ, उन्हाळ्याचा... मंग सांग".

"पन माजी आक्का तशी न्हाय..."

"तुज्या आक्काला लाव चक्का..."

दुसरे दिवशी बंड्या रागारागानेच रानात कामाला गेला. रागारागाने त्याने खूप काम केले आणि रागारागाने भाकरीहि खूप चापली. संध्यकाळी मोटेचा नाडा खांद्यावर टाकून तो घराकडे परतला. आला ते भाकरीबिकरी न करता दार लावून तसाच घोंगड्यावर पसरला. तिन्हीसांज झाली, अंधार पडला, चांगली रात्र झाली तरी उठला नाही. असा बराच वेळ पडून राहिला. दहा वाजण्याच्या सुमाराला अंदाजाने उठला. बाहेर रात्र चांगली जमून आली होती.

दाराला नुस्ती कडी लटकवून तो घराबाहेर पडला. बाहेर पडता पडता त्याने चांगले जवळ जाऊन बघितले. तेलीणीच्या घरालाहि बाहेरून कडी होती. संशय येऊ नये म्हणून आत तिने दिवा तसाच ढणाढणा जळत ठेवला होता. मग बंडा तिथं थांबला नाही. झपाझपा आडवाटेने बाहेर पडला. गावाबाहेर आला. रात्र चांगलीच झाली











होती. सुरेखं चांदणं पडले होते. लिवाच्या झाडामागून वाटोळा चंद्र वर आला होता. झाडाझुडपांच्या सावल्या पसरल्या होत्या. रातकिडे ओरडत होते. गार वारे वाहात होते. सगळे कसे छान वाटत होते.

बंडोबा झपाझपा चालत होता. इतक्या सुंदर, शीतल वातावरणाचा त्याच्यावर नाही म्हटले तरी परिणाम झाला होता. डोक्यातला राग कोमट झाला होता. चांदण्यात लांबच लांब पसरलेली शिवारे बघता बघता त्याला वाटले की, काय ह्ये कोष्टक आहे ? हे लक्स् सावणाच्या फेसावाणी दिसणारं चान्न देवानं कशासाठी निर्माण केलं आसंल ? उन्हाळा, पावसाळा एक शेतीसाठी केला, रात्र झोपायला केली, सकाळ उठायला केली, पण हे चांदणे कशासाठी, कुणासाठी असेल बरे ? हा रानवट फुलांचा आंग तापवणारा वास, पाटातनं संथ वाहात जाणाऱ्या पाण्यावर तरंगणाऱ्या फेसासारखे हे चांदणे खरोखरीच कुणासाठी असेल बरे ? पांखरे, जनावरे, इतकेच काय पण माणसेसुद्धा यावेळी झोपून जातात. मग हे कोणासाठी ? रात्री जागणाऱ्या वाघ-सिहासाठी ? छया: ! तसं नसंल.

रानातल्या वाकड्यातिकड्या शेलाटच्या वाटेने चालता चालता बंडोवा मुतनाळच्या एकाएकी थांवला. त्याचं भिरमिटल्यालं डोकं एकदम ठिकाणावर आले. कुणीतरी गोड आवाजात हसल्याचे त्याला ऐकू आले... नंतर मंजुळ बारीक आवाजात बोलल्याचेहि ऐकू आले. बंडोबाने कान घोड्यासारखे ताठ केले. डोळे उंदरा–मांजरासारखे टवकारून बघितले. समोर भुरके चांदणे पडले होते. सावल्या पसरल्या होत्या. प्रकाश होता पण तोंडाला तोंड दिसत नव्हते. आणि पंचवीस पावलावरच्या एक झाडाच्या खोडाला टेकून कुणीतरी गुलहौशी जोडी चोचीत चोच देत होती. बंडोबाने आकृतीवरून ओळखले. ती ताई तेलीणच होती. तो आवाजहि तिचाच होता. पाठमोरा वसलेला तो भलादांडगा गडी कोण होता, हे मात्र त्याला ओळखू आले नाही. पण त्याच्याशी त्याला काही कर्तव्य नव्हते. ताई तेलीणीचा घाणा त्याला बघायचा होता. तो त्याला दिसला होता. त्याचे काम संपले होते. मघाच्या प्रश्नांचे उत्तरहि त्याला त्यात घावले होते. हा रानवट फुलांचा वास आणि हे पांढरेफेक चांदणे वाघसिहासाठी नसते, तर ते ताईतेलणीसाठी आणि तिची मेंड पाडणाऱ्यांसाठी असते हे उत्तर देवानेच त्याला दिले. हे सगळे देवाच्या आज्ञेनेच चालले आहे तर चालू द्या म्हणून पुढे न जाता मागल्या पावलाने तो परत फिरला. लगालगा घराकडे आला. दार लावले आणि अंगाखाली कांबळं घेऊन घराच्या आढ्याकडे बघत तो झोपी गेला. मात्र नुसता लंगोट लावूनसुद्धा आपल्याला पहाटेपर्यंत झोप कशी आली नाही हे त्याला कळले नाही.

दुसरे दिवशी सकाळी तो उठला, तो आपला ब्रह्मचर्याचा आणि लग्न न करण्याचा बेत बदलला पाहिजे असे त्याला कळून चुकले. नुसते कळून चुकले नाही, तर त्याने निश्चय केला. हनुमानजयंति असल्यासारखा ओल्यानेच सकाळी तो मारुतीला गेला. आणि आता ह्या शेवटच्याच फेऱ्या म्हणून त्याने अकरा प्रदक्षिणा घालून मारुतीला राम राम ठोकला. तसाच पुढे होऊन तो जगन्याकडे गेला. त्याला साग्रसंगीत हकीकत सांगितली. इतके दिवसांचे उपोषण सोडणार आणि लगीन करणार हेहि सांगितलेच. आणि वर पोरगी बघायलाहि सांगितले.

"ह्ये यकदम वेष्ट केलं बंडोवा, तुमी" जगन्या म्हणाला, "तरी आमी म्हनत हुतोच, कितींदि आसं उंडग्या जोगत्यावानी राहनार म्हनू. . . "

"तर काय वो !" मारत्या मघेच म्हणाला, "हिजड्याचे कमाई दाढीवारी चालली होती."

"एऽऽ आता हलकट बोलनं करु नगा. पोरगी काढा पयली..."

"ह्ये वगा, त्यापरीसं आमच्यापैकी कुनाला तरी न्हे की नांदवायला"

त्यापेक्षा पुन्हा रिकामा खंडू म्हणून राहिलेले बरं असे बंडोबाला वाटले, पण. . .

नाही–होय करता करता, मारत्या-जगन्याने बंडोवासाठी मुलगी पाहणे आणि दरम्यानच्या काळात बंड्यानेहि कुठे खाजगीत जमते का पाहण्याच्या प्रयत्नात राहाणे, असे ठरले.

आणि प्रॅक्टीस नसतानादेखील बंडोबाला दोन तीन दिवसातच त्या गोष्टीत यश आले.

नव्यानेच कामाला आलेली साळ्याची धुरपी मोठी देखणी होती. पाटातले पाणी पाट भरून मुसमुसत जावे तशी ती त्याच्या नजरेसमोरून जात-येत होती. पिवळ्या धम्मक नागिणीच्या अंगागत तिची कांति होती. बंडोबाचे मन त्याच्यावरून वळवळत गेले. काळ्याभोर रानात खुरपे घेऊन ती कामाला वाकली होती. खोचा खवला होता. गुढग्यापत्तर पिंढऱ्या उघड्या होत्या. केळफुलाच्या आतल्या गाभ्यावाणी मऊशार. कमरेत वाकली की पाठीवरचा पदर ढळून पाठ उघडी पडायची. त्या हळदीच्या रानावरून बंडोबा भिरभिर लोळून याचा. असे लोळण्यात त्याला फार झकास वाटत होते. आजपर्यंत आपण वाकळासारख्या निर्जीव वस्तूवर कसे लोळलो याचेहि त्याला आश्चर्य वाटू लागले. झोप लागली तरी धुरपी त्याच्यासमोर वाकून काम करीत राहायची. आणि मग आपल्याला झोप लागते याचे त्याला वाईट वाटू लागले. त्यासाठी तो धोतर नेसून झोपू लागला










अनुक्रमणिका

मग झोप उडाली. पण आपण जागे राहिलो तरी देवाने रात्र निर्माण केली असल्यामुळे घुरपी तिकडे झोपल्यालीच असणार हे त्याच्या लक्षात चार रात्र ओळीने जागरण केल्यावर आले. मग त्याला देवाचा लई राग आला. कशाला ही रात्र देवाने निर्माण केली ? हा सूर्य तरी लेकाचा कशाला मावळतो ? संध्याकाळी मावळतीला गेला की फिरून उलटा तसाच उगवतीला फिरला तर काय ह्याच्या बापाचे बुडंल का ? माणसंबी फार आळशी झाल्यात. कामं करायला नकोत भडव्यास्नी. बत्त्या लावून रात्री कामं केली तर काही बिघडंल का ? असा तो विचार करीत होता आणि न झोपता तापल्या डोक्यानी जागत होता. काही नाही तरी आपण तिच्या गालावरचा मुरमाचा फोड व्हावे, असे त्याला वाटत होते.

एक दिवस धडाकत्या काळजाने त्याने घुर्पीला एकटं गाठून विचारलं.

"घुर्पे ?"

"ऊं ऽऽ "

"रोज येनार न्हवं काय कामाला ?"

"ईन की... आमी काय, रोजगारामागली गाडवं..."

"तसं न्हवं..."

"मंग कसं ?"

"काम् केलं न्हाईस तरी चालंल..."

"आनि वो ?"

"रोज याचं..."

"हं ऽऽ "

"आन् खुरपे घिऊन निस्तं माज्यापुढ्यात वाकून उभं न्हायचं..."

वाऱ्याने केळ गदगदावी तशी घुरपी हसून हसून गदगदली. म्हणाली, "चला, कायतरी हलकटावाणी बोलताय्..."

"आगं, खरंच..."

ती खुरपं घेऊन उठली. जोंधळ्याच्या रानातलं बाटूक काढू लागली. एकमेकांकडे बघून हसत कामं करण्यात वेळ गेला. तिचा आंबा आतल्या आत म्हवरून घमघमला. आणि त्याच्या मनाला दिसभर जांभळाचे घोस लटकले.

मग कधीकाळी आपण ब्रह्मचारी होतो हे बंडोबा पार विसरूनच गेला.... जोंधळ्याच्या रानाचा जोंधळ्याखेरीज आणखीहि काही उपयोग होतो हे त्याला कळू लागले. पुष्कळ वेळा त्याला जोंधळ्याचे रान फार विरळसुद्धा वाटू लागले. तेव्हा त्याने पुढच्या वर्षी दाट पाल्याचा ऊंस लावायचा मनात योजून ठेवले. ऊन-सावली विसरून दोघं रानात अंगाला अंग अवदार रेलून बसू लागली. तोंडातल्या पानाने एकमेकांची तोंडे, गाल लाल लाल करू लागली. तसे करताना एक दिवस बंडोबा तिला म्हणाला,

"घुर्पे ऽऽ"

"ऊंऽ"

"लगीन करचिला का माज्यासंगट..."

"लगीन ?"

"हां !"

"आन् ते कसं जमंऽ ?"

"कां ग ?" आई-बास्नी इचरंकी तुज्या..."

"आई-बा कुनीच न्हाई मला..."

"आं ? मंग आबा साळी तुजा कोन ?"

"मामा हाय लांबचा..."

"मग त्याला इचारं..."

"डोस्कं फोडून कनकावळा करुन ठिवंल माजा त्यो–मानूस हाय म्हय त्यो..."

"मी काय वडचाखोडयाच्या पोटचा हाय काय ? काय करील ते बघतो मी. . . !"

बंडोबा असे म्हणाला आणि त्या उद्योगालाच लागला. जगन्या मारत्याला त्याने ही सगळी हकिकत सांगितली आणि दोन दिवसात आबा साळ्याचा ह्या गोष्टीतील अंदाज घ्यायला सांगितले. दोघानी दोन दिवसात वार्ता आणली की साळ्याला घुर्पीचं लगीन करायचं आहेच, पण त्यो चहुंअंगानं खाली आल्यानं एक छदाम खर्चं करनार न्हाई म्हनतोय... आणि मुलगा चांगला बाळबोध वळणाचा हवा.

म्हणजे सगळे कसे जमून येत होते. बंडोबाला पैसा नको होता आणि शिवाय तो बाळबोध वळणाचा होता. म्हणजे घुर्पीची गाठ पडायच्या आधी का होई ना, होता.

मग एक दिवशी जगन्या-मारत्याशिवाय आणखी दोनचार सभ्य लोक घेऊन बंडोबा खुद्द साळ्याला आढळायला गेला.

सकाळचा टाईम असल्याकारणाने साळी उघडाच ओसरीवर बसला होता. चंचीचा बारदाना जवळ ठेऊन पान जमवीत होता. अशावेळी ही माणसे आत शिरली...

नमस्कार–चमत्कार झाल्यावर आबा साळी उघडया पोटावरची बेंबी कुरवाळत म्हणाले,

"हं, मंडळी, काय काढलंय आज ?"




उ...उ...रे...उकडा...

हा प्रश्न ऐकल्याबर आधी ठरलेला एक माणूस थोडा हलला. त्यातल्या त्यात पुढे सरकून, जमिनीवर बोटानी रेघा मारीत म्हणाला,

"न्हाई म्हंजे, परवाच्याला आपलं बोलणं झाल्यालच हाय. आपल्या मावळणीची लेक घुरपदाबाईच्या लग्नाबद्दल..."

"आस्सं... आस्सं..."

"हे बंडोबा मुतनाळे... आपल्याच गावात असतात."

"म्हंजे आपल्या नाना मुतनाळयाचे चिरंजीव का ?" आबांनी विचारलें.

"व्हय की.." साळी ओळखतोय म्हटल्यावर एका सुरात सगळे म्हणाले.

मग आलटून-पालटून सगळयानी बंडोबाबद्दल समग्र माहिती साळयाला दिली. बंडोबा एकटा कसा आहे, त्याला आई-बा कसे नाहीत, स्वतःचे घर कसे नाही; वडिलार्जित घर विकून त्याने सावकाराच्या घशातून सहा एकराचा तुकडा कसा सोडवून घेतला, आणि घर नसल्यामुळे तो ताई तेलणीच्या घरात भाड्याने कसा राहतो, शिवाय लग्न झाल्यावर तो नवे घर बांधण्याच्या विचारात कसा आहे, हे सर्व त्यानी साळयाला मोठ्या मनोरंजकपणे सांगितले. आणखी शिवाय बंडोबाच्या बाळबोधपणाच्या गोष्टीहि त्यानी मोठ्या चतुरपणे सांगितल्या. बंडोबाची भलावण त्यानी अशी उत्तम केली. साळयाला तास-दोन तास नुसते घोळसून टाकले. जेरीला येऊन साळी म्हणाला,

"मंग आता ठरवायलाच पाहिजे..."

"कसं लाखातलं बोललात..."

"म्हटलं न्हाई बंडोबा, की, आबानाना आपल्या भाईर जायाचं न्हाईत म्हनू..."

"अहो, चार लोकांचं ऐकल्यात म्हणून त्यास्नी मानत्यात गावात."

"व्हय की ऽ !"

"का आबानाना, खरं हाय का न्हाई..."

"व्हय बाबानूं..." आबा साळी अगदीच मऊ आवाजात बोलला. एवढा रंगेल आणि धिप्पाड गडी पण सगळयानी हुलीवर घालून त्याला तयार केला. बंडोबा मुतनाळेसारखे बाळबोध स्थळ हुडकून घावणार न्हाई... घुर्पीचेहि सोने होईल. शिवाय तुमच्या मागली काळजी जाईल. दिवस कसले आलेत आणि उफाड्याची पोर घरात कशाला ठेवायची ? असे चुहुबाजूनी बोलून मंडळीनी साळयाला तयारच केला.

"मग कसं काय करायचं ?" कुणीतरी अखेरचे विचारले.

खरे तर साळी मनातून हुरळूनच गेला होता. एक पैशाचा खर्च न येता घरात वाढवलेल्या पोरीचं लग्न होऊन जात होते. कोण नाही म्हणेल ? त्याच्या मनात उत्तर तयारच होते. पण विचार केल्यासारखे दाखवीत तो म्हणाला, आता तुमी काय वाईट सांगनार न्हाई. एवढं प्रकास स्थळ हाय म्हनताय तर करून टाकू..."

आबा साळयाचे उत्तर ऐकून सगळयानी श्वास सोडले. आसने बदलली. सगळयांनी त्या नादात आपापल्याच चंच्या काढून तंबाखू



जुनी थेटरें,
जुने प्रयोग...३

### आंतडी हुबेहूब काढून दाखवू !

प्रयोगामधील काही वैशिष्टयपूर्ण आकर्षणे कुशलतेने सांगण्याची जुनी मनोरंजक पद्धत...

अळतेकर हिंदु नाटक

१८७३ साल.

"मौजेची रात्र–देवेंद्र वृषपर्वा युद्ध व वृषपर्व वध—श्रीयाळ चरित्र–नारायणराव पेशवे यांचा मृत्यु.

यात पहिल्या भागात तरवार देखावा होईल. दुसऱ्या भागात चिल्हाळाचे शीर कापून शीर आणि धड याचा देखावा दाखविला जाईल. तिसऱ्या भागात नारायणरावाचे पोट फाडून साखर भात व आतडी हुबेहूब दाखवू.

यात ४ रस असून शोकरस पूर्ण होईल. फार्स रात्र राहिल्यास चमत्कारिक होईल.

राजापूरकर नाटक मंडळीच्या १९११ सालच्या हॅंडबिलात पुढील आकर्षणे सापडतात.

नवीन खेळ ! नवीन सीन ! नवीन कपडे !

विजेच्या लाईटमध्ये अद्भूत व आश्चर्यकारक देखाव्यांसह देखावे–चावडी, कीर्तनाचा थाट, बादशाहाचा दरबार, विठ्ठलमंदिर, व श्री पांडुरंगाचे ठिकाण, महाराचे रूप-बदलणे. इ. देखावे प्रेक्षणीय होतील.

–केटी

खायला सुरुवात केली...

मग याद्याचे ठरले. साखरपुडा ठरला आणि चार महिन्यांनी तीथहि धरायची ठरली. मात्र उठता उठता आतल्या घरातून घुर्पीची मामी बोलली. तिने एक अट घातली,

"पर बंडोबानं सध्याचं घर सोडावं..."

"आन् ...??"

"आन् दुसरीकडं कुठं तरी ऱ्हावं..."

"कां वो ?"

"ती ताई तेलीन बाई वंगाळ हाय. तियं आमच्या जावयानं ऱ्हाऊ ने... !"

"ह्यो एक नवाच पाईंट काढलाय तुमी..."

तेवढ्यावरून फिसकटू नये म्हणून त्यातल्या एका समजूतदार माणसाने म्हटले,










"खरं हाय... लई साडं शिटलीची बाई हाय ती ! बंडोबा, मामी म्हनत्यात तर घर बदलून टाका उद्याच्या उद्या."

"बरांय्.." बंडोबा न म्हणून सांगतो कुणाला ?

बंडोबाने घर बदलायचे ठरले आणि मंडळी उठली. खुषीत येऊन जगन्या बंडोबाला म्हणाला,

"बंड्या लेका, आतम कनिष्ट म्हंजे आजच्याला कोंबडीचं कालवाण पायजे बघ..."

"देऊ या की..." असे बंडोबा म्हणाला आणि जो तो आपापल्या कामाला गेला.

* *

दरम्यान बऱ्याच गोष्टी घडून गेल्या. पाऊसकाळ पूर्ण संपला. हिवाळा आला. सुगीसुद्धा आली. गुढघ्यातली रानं छातीशी आली. हिरव्यागार ताटांचा विस्तार झाला. गच्च भरलेल्या कणसांनी रानं डुलू लागली. त्यावर रानपाखरांचे थवे हिंडू लागले. रानं अशी पोटरीला आली आणि कशाने कुणास ठाऊक, ताई तेलणीच्या अंगावर सुद्धा श्रावणाची कांति आली. बंडोबाने तिच्या घरचा मुक्काम हलवला होता. तिला कोड्यात टाकून तो दुसरीकडे राहायला गेला होता. त्याचा साखरपुडा झाला होता. त्या खुषीत तो धोतर नेसून झोपत होता आणि जागेपणी घुरपीची स्वप्नं बघत होता. आणखीहि काही गोष्टी घडल्या असत्या पण तेवढ्यात चार महिने संपले आणि लग्नाचा दिवस उद्यावर येऊन ठेपला.

हां हां (असे सारखे कोण म्हणते कुणास ठाऊक, पण असे.) म्हणता लग्नाचा दिवस उगवला. एखाद दुसरी गाडी करून लांबचे पाहुणे येऊन ठेपले. तिथं गाड्या सुटल्या. गाडीवानानी बैलं सोडली आणि ती जागा मिळेल तिथे बांधली. एका गाडीवानाने चुकून बोहल्याच्या खांबालाच बैलं बांधली. सुदैवाने आंघोळी करणाऱ्या बंडोबाच्याच लक्षात ही गोष्ट आली आणि चुकून घुर्पीच्या आणि त्या बैलाच्यामध्ये जर अंतरपाट धरला तर पुन्हा आपल्याला आयुष्यभर रिकामा खंडू राहावे लागेल, शिवाय अनर्थ ओढवेल तो वेगळाच या भीतीने त्याने ती चूक लोकांच्या नजरेस आणून दिली. लोकानी गाडीवानास तसे सांगितले तेव्हा तो म्हणाला, "लगनाच्या टायमाला काडणारच हुतो..." बैलंहि अशी शहाणी की तोपर्यंत त्यानी प्रवासातला सगळा वचपा बोहोल्याच्या आसपास काढून बोहल्याचा गोठा केला. पलिकडे ट्रंका, पोती, वळकट्या आणि पोरं यांचा एकच गोंधळ उडाला होता. पोरं हिंडत होती. त्यांना आवरण्याच्या नांवाखाली पुरुषमाणसाना धक्के देऊन बायकाहि त्यांच्या मागे पळत होत्या. आणि जास्तच कालवा माजवीत होत्या. पुरुष मंडळी लफ्फेदार रुमाल, टोप्या घालून उगीचंच इकडे तिकडे आणि तिकडे इकडे हिंडत होती. सनई ताशावाले धरून आणल्यासारखे दोन पायावर बसून सकाळपासून खायला काही न दिल्यामुळे, जीव खाऊन वाजवीत होते. मधे एकदा त्यांच्या देखत फराळाची पाने उठली तेव्हा तोंडाला लाळ सुटल्यामुळे सनई बंद पडली तेवढीच. बाकी सारखा ताशा चाललाच होता.. कुणीतरी त्यांना थांबायला सांगावे असे सगळ्याना वाटत होते. पण मूर्ख मघाशी जेव्हा सनई बंद पडली तेव्हा सगळा गोंधळ एकदम बंद पडला होता. लोकांनी एवढी गर्दी आणि इतकी शांतता याने सगळ्यां-च्याच डोक्यात क्षणभर अशुभ विचार आले होते. त्यापेक्षा वाजंत्री वाजलीच पाहिजे असे वाटून सगळ्यांनी तिकडे दुर्लक्षच केले.

असे करता करता वेळ झाली, मुहूर्त झाला. भटजीनी सांगायचा अवकाश, लग्नाचा धडाका उडाला. मंगलाष्टके झाली. पुन्हा वाजं-त्रीचा दणका उठला. त्या आवाजात बंडोबा-घुर्पीनी न चुकता एकमेकांच्या गळ्यात हार घातले. लग्न लागली. अत्तर-गुलाबदाणी वगैरे काहीच फिरवावे लागले नाही. कारण बैलांनी ती कामगिरी आधीच पार पाडली होती. ला जाहोम, सप्तपदीच्या वेळी बंडोबाच्या मित्रानी त्याच्याभोवती कडं केलं. टिंगल करून करून त्याचं भुसकट पाडलं.

जगन्या म्हणाला, "बंडोबा, कापडं घालून झोपायची सवं ठिवा वाइच..."

"आता अंगावर कापडं ठेवन्यात काय प्राफिट हो ?" कुणीतरी म्हटलं.

"आता लंगोटाचं कसं करनार !"

"मंजे ?"

"अवो, गड्याला फकस्त लंगूट आसल्याबिगर झ्वाप येत न्हाई..."

"हा : हा :! आता लंगूट न्हाई न् झ्वाप बी न्हाई."

हा : हा : हा : !

खें खें खें !

फ्यें फ्यें फ्यें!

मंडपात नुसता भंडाऱ्याचं खोबरं वाटावं तसा दंगा झाला आणि सगळ्यांच्या देखत बंडोबाचे ब्रह्मचर्य फिटले.

* *

माणसे हळूहळू पांगली.

उन्हे कलली. दुपारचे चार वाजून गेले. फक्त जेवायच्या इराद्याने आलेली माणसे पोट फुगस्तंवर जेवली होती. जेवण सगळ्यांच्याच अंगावर आले होते. सगळेच आळसावले. तोंडावर पदके घेऊन बहुतेक मंडळी मांडवात आडवी झाली होती. कुणी नुसते पेंगत होते, कुणी ठार झोपले होते. पोरे भरल्यापोटीहि टण्टण उड्या मारता-

येतात हे दाखवीत होती. आपल्या बाजूला वायांचा कालवा चालला होता. बंडोबाहि भिंतीशी टेकून डुलक्या घेत होता. पण मंडपात बसलेला असा तेवढाच गडी होता.

तेवढ्यात बुटक्या अंगाचा, नकट्या नाकाचा आणि तुटक्या वाहणेचा एक गडी मंडपात शिरला. चोरावाणी इकडं तिकडं बघत तो आत आला. त्याला कुणाली तरी काय तरी खाजगी गोष्ट सांगायची असावी, असा चेहरा होता. तो थोडासा घावरला सुद्धा होता. बंडोबाशिवाय दुसरे कुणी त्याचे ऐकून घेण्याच्या अवस्थेत नव्हते. म्हणून की काय कोण जाणे, तो बंडोबाजवळ आला. त्याच्या कानापर्यंत खाली वाकला आणि हलक्या आवाजात काही तरी बोलला.

त्या माणसाचे बोलणे ऐकून बंडोबाची डुलकी तर उडालीच पण डुलक्या घेणारी मानसुद्धा उडतिया का काय असे बंडोबाला वाटले. डोळ्यापुढचा मंडप गरंरंकन् फिरला. आणि त्याचवेळी पाठीकडून नव्या धोतराचा काष्टासुद्धा पक्कन वाहेर सुटला. इतके झाले तसे एका हाताने काष्टा आणि दुसऱ्या हाताने नवा फेटा संभाळीत तो उठला.

"मला बोलीवलंय..."

"हां..."

"तुजं नांव काय ?"

"संद्या महार..."

"वराय, चल वघू..."

कुणाचे लक्ष नाही असे पाहून बंडोबा त्या माणसाबरोबर वाहेर पडला. वाटेत त्याने त्या महाराला सगळे सविस्तर विचारले. महाराने सांगितल्यावरून त्याला एवढेच समजले कीं, ताई तेलीण बाळंत झाली असून तिला मुलगी झाली आहे आणि बाळंतपणात फार रक्त गेल्याने ती आत्ता मरणाच्या वाटेवर आहे. तिन घाईनें आपल्याला बोलावलं आहे. अशावेळी आपल्याला कशाला बोलावलं आहे, याचा विचार करीत असतानाच तो तेलणीच्या घरात शिरला.

तो घरात शिरला तसे कुणीतरी दार लावून घेतले. खोलीत जास्त च अंधार झाला. त्या अंधारात तो पुढं झाला. ताई तेलीण खाटेवर झोपली होती. सोलून टाकलेल्या टरफलावाणी दिसत होती. पलिकडे पाळण्यात कुणी तरी केलेल्या पापाचे फळ झुलत होते. तेलीण शेव .चे चित्कार करीत होती. तोंडाने "आलं का ? आलं का ?" असे विचारीत होती. ही विचारणा बंडोबाबद्दलच असणार म्हणून अंधारात कुणीतरी तिला सांगितलं कीं, "आलं, आलं, ते आलं."

वेळ ओळखून बंडोबा पुढं झाला. तेलणीच्या अगदी जवळ गेला. तेलीण वात झाल्यासारखी करीत होती. तिने बंडोबाची मान धरून जवळ घेतली. त्याच्या तोंडावरनं हात फिरवले. आणि गालाचा मुका घेऊन कण्हत म्हणाली, "मी चालल्ये आता... ह्ये पोर तुमचं हाय..."

"आँ ?" बंडोबा कोलमडलाच.

"म्हाझ्या माघारी नीट सं....भाळा.

"अवो पन..."

"पोरगी तुमची हा....य..."

एवढे बोलून तेलीण गेलीमुद्धा. कुणीतरी ओढून तेल्यासारखी बंडोबाच्या देखत ह्या जगातून दुसऱ्या जगात गेली... कोपऱ्यात बसलेल्या एका म्हातारीने हंबरडा फोडला. आणि त्याचवेळी कुणी तरी पाळण्यातलं पोराचं मुटकुळं काढून बंडोबाच्या हातावर ठेवलं. तो पार गोंधळून गेला. काय करावं त्याला कळेनाच. कुणाचं पोर, कुणाच्या हातावर पडतं अन् कोण मरतं ! चिडून जाऊन तो त्या रडणाऱ्या म्हातारीवरच ओरडला, "अवो, तुमी कां रडताय...? पोर माज्या हातात पडलं, तुंमी वरडता व्हय ...?" आणि लग्नाच्या पहिल्याच दिवशी- (रात्रीसुद्धा नव्हे) झालेल्या या पोराचं काय करायचं या चा विचार करीत तो मेलेल्या तेलणीच्या इतक्या जवळ आयुष्यात पहिल्यांदाच वसून राहिला.

* *

तिकडे जानोस घरात मात्र रात्र होऊन गेली तरी बंडोबा परत न आल्यामुळे कल्लोळ उडाला होता. शोधाशोध सुरू झाली होती. रामदासागत लग्न लाऊन पळून गेला म्हणून काही जण त्याला शिव्या घालत होते. काहीजण नुसतेच घाबरले होते. घुर्पी आणि तिची मामी ऊर बडवून रडत होत्या. कुणी नुसतेच "धावला का ? धावला का ?" असे एकमेकात विचारून मंडपात पळत होते. . .

आणि ताई तेलणीची हकिकत कानावर आलेला आवा साळी मात्र, गोंडेदार वहाणा घालून गप्प येरझारा घालत होता. मनाशी म्हणत होता, 'च्यायला, संद्या म्हारानं चुकून मुतनाळ्यालाच निरोप दिला वाटतं...!' ●






—व्यंकटेश माडगूळकर

मागे न पहाता, पाठ वळवून मी भराभर चालू लागलो. सोमल्याने माझी बाजू सोडली नाही. कारण हातात हत्यार नसताना चालण्यात त्याला एकट्याला धोका वाटत होता...

संध्याकाळ टळून चालली होती; आणि जंगलाच्या ऐन पोटात असलेल्या लहानशा डवक्यांकडे अद्याप एकहि जनावर फिरकले नव्हते. झाडावर वसून वसून मी वैतागलो. त्यातच विलक्षण लघ्वी लागली होती. किती वेळ कळ सोसावी? शेजारीच कुठं तरी सोमल्या लमाणी वसला होता. शीळ घालून त्याला इशारत करावी आणि आता खाली उतरावे असे सारखे मनात येत होते. ह्याच पाण्यावर वसा, हमखास वार होईल, असे त्यानेच मला पुन्हा पुन्हा सांगितले होते, तर मी खात्री करून घेतली होती. डवक्याच्या कडेला चिखलात अनेक जनावरांची ताजी पावले उमटलेली पाहिली होती. रानडुकरे, सांवर, चितळे या पाण्यावर येतच असली पाहिजेत. कोंडणकेरीसारखे कारवारातले जंगल. ते रिझर्व केल्याशिवाय शिकाऱ्याला आत पाय टाकण्याची बंदी; तेव्हा ही जनावरे कोणी वुजवली असल्याचीहि शक्यता नव्हती. मग ही काय भुताटकी होती? साडे चार वाजल्यापासून मी झाडावर वानरासारखा वसून होतो. आत्ता सहा वाजून पंचेचाळीस मिनिटे झाली होती आणि एवढ्या काळात, दोन रानकोंबडे, एक मोर आणि सहा लावे एवढेच पाण्यावर येऊन गेलेले दिसावेत? असली पांखरे काय, आमच्या सिंहगडावरच्या डबक्यावरहि वसले तरी दिसतात!

वरे, हा लमाणीहि 'दादा, मी लांव वसतो. मला खोकला झालाय्. वार झाला की येतो' म्हणून जो गेलाय तो पाण्यात पडल्यासारखा तिकडेच. जवळ सोबती असला म्हणजे वेळ जातो.

मरो ही शिकार! किती कळ सोसां-

यची ? झाडावर बसूनच फुगलं पोट रिकामे केले तर ?

खाली वाळला पाचोळा फार होता. या शांततेत भलताच मोठा आवाज होणार. आणि त्याच वेळी जर जनावर येत असलं तर बूम पळणार. कॅंपवर आँज डाळभात खावा लागणार. काल रात्री कॅम्पभोवती फिरून बॅटरीच्या उजेडावर मारलेले दोन ससे होते, सोलून टांगलेले पण सशाच्या मांसाचा आता वीट आला होता. चव-पालट पाहिजे.

उतरावे का ?

मनगटावरच्या घड्याळातला सेकंद-काटा किती सावकाश फिरत होता !

उतरू ?

आता धीर निघणे केवळ अशक्य !

शेवटी निर्णय घेतला आणि बंदूक पाठीशी अडकावून मांड मोडणार एवढ्यात पाण्याकडे येणाऱ्या वाटेवर काही तांबूस-पिवळे हलले. श्वास रोघून मी पहात राहिलो आणि झुडपाआडून बिबळ्या वाघाचे भले मोठे डोचके बाहेर आले !

मला आश्चर्याचा धक्का बसला !

हे स्वप्नात सुद्धा नव्हते. अशा भलत्या वेळेला बिबळ्या आणि पाण्यावर ? विचार करायला वेळहि नव्हता. समोर, पंधरावीस यार्डावर लांबलचक बिबळ्या आडवा चालला होता. पाण्याकडे जात होता.

बंदुकीचा दस्ता मी खांद्याशी घट्ट जोडला, उजव्या दाढा एकमेकावर दाबल्या आणि उजवा चाप ओढला.

कडाड्कन आवाज झाला. इतका वेळ झाडावर बसलेले वगळे ओरडत उडाले. आणि वाटेवरच बिबळ्या झोपला. वाराचे प्रतिध्वनि विरले. बिबळ्याची हालचाल थंड झाली. दुसऱ्या चापावर बोट देऊन मी मिनीटभर, दोन मिनिटे थांबलो.

छे. काही हालचाल नव्हती.

उजव्या नळीत वॉल भरलेला होता आणि मी मान धरून आवाज टाकला होता.

हालचाल होईल कशी ?

हाडामांसाचे कोचके पुडावे तसा पडलेला तो मला स्पष्ट दिसत होता.

नक्की ?

मग सेफ्टी कॅच मागे ओढून मी बंदूक पाठीला लावली आणि चक्क पाठ तिकडे करून उतरलो.

खरे तर इथे जंगलात शिष्टाचार कशाला पाळायचा ? पण आपोआपच चार पावले दूर जाऊन आधी लघ्वीला बसलो, अगदी रावणाइतका. पाठ करूनच अजून बसलो आहे तेवढ्यातच खसपसाट ऐकू आला. समोरून सोमल्या येत होता. तो जवळ पोचण्याअगोदर त्याच्या अंगाचा वास माझ्यापाशी पोचला.

तो जवळ येऊन चिकटताच मी हलक्या आवाजात म्हणालो,

"सोमल्या, अरे पाण्यावर वाघ आला!"

तो तोंड वासून बघतच राहिला.

"मोठं जनावर आहे, दोघाना जाणार नाही. माणसं आणतोस का कोणी बोलावून?"

"कुठं आहे जनावर ?"

"ते काय, वाटेवर !"

जमिनीसपाट झालेले जनावर मला झाडावरून दिसले होते पण आता जमिनी-वरून कसे दिसणार ? झाडं झुडपे होती, गवत होते. म्हणून अगदी गहाळपणाने पांच दहा, पंधरावीस पावले टाकली आणि माझ्या अंगाला दरदरून घाम सुटला. काळीज धाड्धाड् उडू लागले. पायातलं बळ गेले.

ज्या जागी बिबळ्या पडला होता, त्याच जागी एक मध्यमवयाची बाई सावकाश उठून बसली.

आमच्याकडे तिची पाठ होती.

मोठ्याने तोंडावर हात घेऊन, विस्फा-रल्या डोळ्याने सोमल्याने लमाणीत शिवी हासडली.

"सायवा, बाईवर वार घातलास काय रे. . . मेलो."

पण तेवढ्यात ती बाई उठून उभी राहिली. जंगली जनावर बघते तशी बघू लागली.

मी बेशुद्ध होऊन कोसळलो कसा नाही, याचे आज मला आश्चर्य वाटते. सोमल्याचा हात खेचून मी काही क्षण थरथरत उभा राहिलो. 'घाबरू नकोस' असे दबक्या आवाजात म्हणून बंदूक रोखून एकएक पाऊल पुढे टाकू लागलो.

बाई जाया निश्चित झाली नव्हती. कारण ती कण्हत, विव्हळत नव्हती, बॉलचा मार घेऊन दोन पायावर उभं राहणे तिला शक्यच नव्हते.

आता ती लांबलचक वाट स्पष्ट दिसत होती आणि तिच्यावर, आगे मागे मी मार-लेल्या वाघाचे थूड मुळीच दिसत नव्हते.

सोमल्याने हिसका मारून हात सोडवून घेतला आणि विलक्षण घाबरलेला तो लमाणी पाठ फिरवून बाउत सुटला. न कळत मीहि त्याच्या पाठीमागे धावलो.

दमछाक झाली तेव्हा आम्ही दोघेहि झाडाच्या खोडाला टेकून उभे राहिलो.

बोलता येतच नव्हते.

तोंड उघडे टाकून सोमल्या कुत्र्यासारखा धापा टाकीत होता.

माझ्या डोक्यात नाना विचार येत होते. मी बिबळ्या पाहिला, मारला हे शंभर टक्के सत्य होते. मग तो कुठे गेला, ही बाई कुठून आली? हा काय विलक्षण प्रकार आहे? आकार आणि चालणे ह्यावरून माझ्या लक्षात आले होते की ही मादी आहे, नर नव्हे. पण वाघाच्या मादीची माणसाची मादी झाली कशी...?

तेवढ्यात दम घेऊन लमाणी बोलला,

"दादा, ही बिबळ्याची जात लई हरामी. ती रूप घेते. घटकेत हरण, घटकेत तरस–"

"मूर्ख आहेस."

"आई शप्पत !"

जिम् कॉरबेटच्या एका पुस्तकात, वाघाने माणसासारखा आवाज केल्याचे मी वाचले होते. पण, वाघ रूप बदलतो, ही कल्पना-सुद्धा कधी ऐकलेली नव्हती. सोमल्या-सारख्या जंगली माणसाच्या काय वाटेल त्या भाबड्या श्रद्धा अंधश्रद्धा असतील, पण मी त्यावर कसा विश्वास ठेवू ? आपण पळालो तरी का ? याची मला शरम वाटली.

तेवढ्यात ती बाई समोरून येताना दिसली.










अनुक्रमणिका











अनुक्रमणिका








झटकन् माझा दंड दाबून सोमल्या दबक्या आवाजात बोलला,

"दादा, हाण तिला. गोळी घाल. ती वाघीणच आहे, माणूस नाही."

त्याचा आवाज कांपरा होता, अंग कापत होते.

माणसाला, त्यातहि स्त्रीला गोळी घालण्याच्या नुसत्या कल्पनेनेच माझ्या अंगावर शहारे आले.

बाईने आम्हाला पाहिले. जंगली जनावरासारखी ती पुन्हा जागच्या जागी थांबली.

एकटक आमच्याकडे पाहू लागली.

मळकट तांबड्या रंगाचा, लमाणी बायकाचा पोषाख तिच्या अंगावर होता. गळ्यात हातात रुप्याचे दागिने होते. केस विखुरलेले होते.

आता झपाट्याने संध्याकाळ होत होती. कॅम्पवर पोचण्यासाठी आम्हाला दीड दोन मैल चालायचे होते. कॅम्प तरी कसला, फॉरेस्ट बंगल्याला लागूनच लमाण्याच्या झोपड्या होत्या. सोबतीला कोणी मित्र मंडळी नसल्यामुळे, बंगला रिझर्व न करता मी सोमल्याच्या झोपडीपासून काही अंतरावर असलेल्या वडाच्या झाडाखाली माझी राहुटी ठोकलेली होती. कॅंपकॉट, चेअर्स, स्टोव्ह असले जुजबी सामान सोबत आणलेले होते. माझी जुनीपानी जीप होती. दहा दिवसाचा तर सारा मुक्काम होता. रजा थोडी होती. हुबळीला जाऊन मला माझ्या नोकरीवर रुजू व्हायचे होते. नोकरचाकर बरोबर आणलेला नव्हता. कारण हे सारे लमाणी माझ्या कित्येक वर्षापासूनचे परिचित होते. चिरीमिरी दिली की ते काम करीत.

जंगलात भीतीने मुठीएवढे होऊन जाण्याचे प्रसंग माझ्यावर आजपर्यंत काही कमी आले नव्हते. पण आजचा प्रसंग विलक्षणच होता. प्राणावर बेतले म्हणजे वाटते त्या भयापेक्षाहि हे भय वेगळे, ह्याची जात वेगळी होती. मी खूप भ्यालो होतो हे कबूल केले पाहिजे. फुकट शौर्याचा आव आणून उपयोग नाही, तरीपण सोमल्याचे बोलणे बुद्धीला पटत नव्हते. आता काहीहि न करता आधी कॅम्प जवळ केला पाहिजे असे वाटले. आणि पाठ वळवून मागे न पहाता, मी भराभर चालू लागलो. सोमल्याने माझी बाजू सोडली नाही, कारण हातात हत्यार नसताना चालण्यात त्याला एकट्याला धोका वाटत होता. तोंडातल्या तोंडात तो सारखा काही पुटपुटत होता. मागे वळून पहात होता, पण आता काही दिसत नव्हते. अंधार पडलेला होता. जंगलातली वाट संपवून आम्ही रस्त्याला लागलो आणि कॅंपवर येऊन पोचलो.

सोमल्यानं कंदील लावला. कपडे बदलून मी कॅम्पचेअर बाहेर ओढून घेतली आणि सिगरेट पेटवून बसलो.

काळोखी रात्र होती, आकाश तारकानी गजबजलेले होते. थंड वारा वहात होता. सर्वत्र गंभीर शांतता होती.

डोक्यातील सगळा गोंधळ आवरून हा विषय संपवून टाकावा, असे मी म्हणत होतो. पण दुसरीकडे लगेच असाहि विचार मनात येत होता की, सकाळी लवकर उठून त्या पाण्याशेजारी जाऊन बघावे. रक्त दिसते का, वाघाचे केस दिसतात का, तो आला त्या वेळी गवतात, वाटेवर खुणा नक्कीच आलेल्या असणार त्याहि दिसतील. आणि खात्री होईल की, बिबळ्याच आला होता, बाई नव्हती. पण हा विचारच मूर्खपणाचा होता. बिबळ्या आलेला, पडलेला, लोळलेला मी प्रत्यक्ष डोळ्यानी पाहिला होता. माझा बार साफ चुकला असे जरी घटकाभर मानले, तरी बिबळ्या उडी घेऊन गेल्याचे दिसायला पाहिजे होते. मग ही बाई कोण? ती त्याच जागी केव्हा आली. उठून कां बसली? आपल्या मागोमाग कां आली?

हा सर्व प्रकार विस्मय वाटण्याजोगा आहेच; पण त्याचा तलास लावणे हे आपले काम नव्हे का?

सोमल्याच्या म्हणण्यावर कोणीहि शहाणा विचारी मनुष्य विश्वास ठेवणार नाही. पण मानवी बुद्धीच्या झेपेपलिकडे असलेल्या काही गोष्टी आहेतच की! असा विचार माझ्या मनात येत होता आणि समोर, वडाच्या बुंध्याशी हालचाल झाली. डोळे ताणून पाहिले तर नीट काही दिसेना. जनावर, बहुधा तरस असेल असे वाटले, हलक्या पायानी आत जाऊन मी बॅटरी आणली आणि उजेड टाकला.

मघाची बाई, बॅटरीचा झोत डोळ्यात घेऊन उभी होती. तिचे हिरवेगार डोळे चमकत होते.

मला कुठून अवसान आले कोण जाणे. तशीच बॅटरी ठेवून मी वडाच्या बुंध्याशी गेलो. आणि दरडावून विचारले,

"कोण आहे, काय काम आहे इकडे?"

बाईचा चेहरा निर्विकार होता. थंड डोळ्यानी ती माझ्याकडे पहात होती. एवढ्या काळोखात ती अचूक राहुटीपर्यंत येऊन पोचली होती.

माहीत होते तेवढे लमाणी शब्द वापरून पाहिले, कानडी बोलून पाहिले पण बाईच्या चेहऱ्यावर काही परिणाम झाला नाही. मुकी, बहिरी होती का? माझी भीति आता पुष्कळ कमी झाली होती. धीटपणाने ह्या प्रकरणाचा छडा लावायचा असे मी ठरवले.

कंदील लावून सोमल्या गावातील आपल्या झोपडीकडे गेला होता. त्याला मी ओरडून हाक मारली. तिकडून ओ येताच ओरडूनच सांगितले की, 'परत सकाळी लवकर ये. बाकी आता मला काही नको.' सोमल्याला दूर ठेवण्यात माझे दोन तीन हेतु होते. त्या बाईने बुजू नये, सोमल्याने काही गडबड करू नये आणि खरोखरीच काही धोका असला तर तो आपण एकट्याने

अंगावर घ्यावा. विश्वासू सोमल्याला भागिदार करणे योग्य नव्हे.

ही बाई भुकेली निश्चितच असणार. समोर खायचे ठेवले की जनावर सुद्धा धीट होते, ही तर माणूस आहे.

राहुटीत जाऊन मी एका थाळीत ब्रेडचे तुकडे, मटणाच्या फोडी घातल्या, वाटीत कालवण घातले आणि तिच्या पुढे केले.

लांबूनच तिने ते ताट केवळ हुंगले आणि पुन्हा माझ्याकडे बघत राहिली. काय करावे हे मला सुचेना. जेवण तिला नको होते हे खास. मग काय पाहिजे होते ?

तिचे येणे, इथे थांबणे म्हणजे फक्त 'ॲनिमल क्युर्‍यॉसिटी' आहे काय ?

आपण स्वस्थपणे खुर्चीत वसून पुढे काय होते ते पहावे. कदाचित आली तशी ही निघूनहि जाईल, असे म्हणून मी थाळी परत ठेऊन दिली. बॅटरी मालवली आणि राहुटी बाहेरच्या खुर्चीत वसून राहिलो. दृष्टी आणि कान सावध ठेवले.

बराच वेळ काही घडले नाही.

दिवसभराच्या श्रमाने माझ्या पापण्या जड झाल्या होत्या. अंग अवघडले होते. असा किती वेळ मी वसून रहाणार होतो?

गारठा सुटला होता. जंगल शांत होते.

मधेच एकदा भेकर कोकलल्याचा आवाज आला.

मला कधी डुलकी लागली हे कळले नाही. दचकून जागा झालो, डोळे फोडून पाहिले तर वडाच्या बुंध्याशी बाई होतीच आणि काही खाल्ल्याचा आवाज होत होता. काय ?

एकाएकी माझ्या ध्यानात आले कीं सोमल्याने ते दोन्ही ससे, वडाला टांगून ठेवले होते. टांगल्यामुळे कोल्ह्या-कुत्र्याची भीति नव्हती, रात्री घारी कावळे पडतील असाहि संभव नव्हता, आणि असे वाऱ्यावर टांगून ठेवले की मांस चांगले रहाते, बिघडत नाही.

ते ससे बाईने हस्तगत केले असले पाहिजेत.

पुन्हा माझ्या मनात भीति दाटून आली. म्हणजे, सोमल्या म्हणाला ते खरेच काय?

छे, अशक्य ! कच्चे मांस काय, कातकरी सुद्धा वेळप्रसंगी खातात. पुष्कळ रानटी जमाती खातात. सुधारलेले आस्ट्रेलियन लोक नाहीत का कच्चे ऑईस्टर्स बीअरबरोबर चवीने खात ! त्यात अमानुष काय आहे ? पण, ही बाई म्हणजे एक विलक्षण नमुना आहे. अभ्यासाचा विषय आहे. मी हे सारे नीट पाहीन आणि एक पुस्तक लिहीन. धोका असला तरी त्याला तोंड देईन. नाही तरी, असला विषय, असला अनुभव सहजासहजी येतो का ? मी वाटेल ती किंमत देईन, पण हे पाहीन. त्याचा छडा लावीन. संगतवार सगळ्या नोंदी ठेवीन.

ब्लॅंकेट गुंडाळून घेऊन मी पुन्हा उघड्यावर बसलो. आत्ता कुठे रात्रीचे अकरा वाजलेले होते. झोप येत नव्हती. मध्येच उठून मी आत ठेवलेली बंदूक आणि बॅटरी हाताशी आणून ठेवली. न जाणो, उघड्यावर बसलो होतो, आणि हे जंगल होते. कसलाहि प्रसंग येण्याची शक्यता होती. वाघाच्या














अनुक्रमणिका

पाळतीवर बसावे तसा सावध बसलो.

तासा दीडतासाने पुन्हा झोप लागली.

जागा झालो तेव्हा भली पहाट झालेली होती. रानपांखरे जागी होत होती. चंद्र उगवला होता. थंडी सुटली होती. वडाच्या झाडाबुडी पाहिले तर बाई तिथे नव्हती !

जंगलात निघून गेली की ? माग पाहिला तर नेमका पत्ता लागेल. जाते कुठे ? उजाडू दे. सूर्यप्रकाश येऊ दे. मी बरोबर तपास लावीन.

राहुटीची झडप वर करून आत गेलो आणि पाहिले तर, सांदीकोपऱ्याला कपड्यांच्या गळ्यात मांजर झोपावे तशी ही बाई अंगाचे मुटकुळे करून झोपली होती.

थंडीवाऱ्यात जाळीझुडपाचा आडोसा पहाण्याऐवजी तिने राहुटीचा आसरा घेतला होता. माझ्या पायाचा आवाज येताच डोळे उघडून, मान वर करून तिने पाहिले आणि ओळख पटताच पुन्हा डोळे मिटले. अंग दुमडून ती पुन्हा झोपून गेली.

सकाळी गावातून एक लमाणी आला आणि त्याने बातमी दिली की, रात्री सोमल्याला सणकून ताप भरला आहे, रात्रभर तो ओरडत चावळत उठत होता. आज तो माझ्यावरोबर शिकारीला येणार नाही. वाघीणीच्या भीतीनेच सोमल्याला ताप भरला असला पाहिजे, यावद्दल माझी खात्री झाली. त्याला बघून यावे म्हणून मी वस्तीवर गेलो.

तांवडे लाल डोळे झालेला सोमल्या अंथरुणावर पडला होता. मला पहाताच तो उठून बसला आणि कण्हत म्हणाला,

"दादा, तुम्ही खोटं म्हणाल पण भुताटकी झाली, ती वाई नव्हं. वाघीणच."

"नाही रे. खुळा काय तू ? एवढा अनुभवी घाडशी शिकारी तू. जंगलात जन्म गेला तुझा. असं कुठं असतं काय? मी आज जाऊन माग बघतो. तू बरा हो आधी."

असे काहीवाही सांगून मी बरोबर आणलेली कोडोपायरीनची गोळी त्याला दिली.

तो म्हणाला,

"खरी बाई असती तर मूल वळख पटल्याशिवाय राहिली असती का? आसपासच्या सगळ्या लमाण्याशी माझी वळख आहे. काही तरी भुताटकी झाली."

"बरं झाली तर झाली. मर्द माणसं अशी कधी भुताटकीला घाबरतात का?"

असं म्हणून मी त्याची पाठ थोपटली आणि एकटाच पुन्हा त्या पाण्यावर जाऊन आलो. वाटेवर मला बिबळ्याची पावले दिसली पण रक्त दिसले नाही. जिथे बाई उभी राहिली तिथपर्यंत बिबळ्याचीच पावले लागली होती. पुढे मागच नव्हता.

बराच विचार केल्यावर मी निर्णय घेतला.

(१) वाघ रूप बदलून स्त्री होईल, हे असंभाव्य आहे.

(२) मी बिबळ्या येताना पाहिला, तो माझा दृष्टी भ्रम होता, ती लमाणी बाईच पाण्यावर वाकून वाकून आली.

(३) मी मारलेला बॉल साफ चुकलेला होता.

(४) लांडग्याने वाढविलेल्या रामूप्रमाणे ही लमाणबाई जनावरात वाढलेली आहे.

(५) बिबळ्याची पावले ही नंतरची किंवा आधीची असली पाहिजेत.

मी राहुटीवर परत आलो. लमाणीबाई दिवसा उजेडी बाहेर पडणार नाही. ती राहुटीतच होती. ती कोणाहि लमाणाच्या दृष्टीला पडू नये असे मला वाटत होते, कारण मला भीति वाटली की, लमाण लोक हिची शिकार करतील !

जीप् बाहेर काढून जंगलाच्या वाटानी मी थोडा हिंडलो. दोन मोठे रानकोंवडे मिळाले. त्यापैकी एक तयार केला. मी जेवण घेण्यापूर्वी थाळीतून तिला पुन्हा अन्न देण्याचा प्रयत्न केला पण याहि खेपेला तिने पहिल्याप्रमाणेच केले. केवळ हुंगून ते जेवण तिथेच टाकले. दुसरा कोंवडा मी सोलून राहुटीत टांगून ठेवला. आणि पाण्याची बादली आणण्यासाठी चाळीसएक यार्डावर असलेल्या ओढ्यावर गेलो.

मी परत आलो तेव्हा कोंबडा जाग्यावर नव्हता.

संध्याकाळी दिवस मावळण्याच्या सुमाराला बाई थोडा वेळ राहुटीवाहेर पडली तेव्हा वडावरची पांखरे भिऊन उडाल्याचे मी ऐकले. विशेष म्हणजे कावळे फार कोकलले.

मी राहुटीत नसताना बादलीतील पाणी कमी झाल्याचेहि माझ्या ध्यानात आले. याचा अर्थ, झऱ्यातले पाणी तोंड लावून प्यावे तसे तिने केले असले पाहिजे.

रात्री मी कंदील बारीक ठेवून आत कॉटवरच झोपलो. भरलेली बंदूक हाताशी ठेवली. झोप मुळीच आली नाही. मनावर विलक्षण दडपण होते. आश्चर्य म्हणजे, रात्री बराच वेळ दूरवर नर बिबळ्याचे ओरडणे ऐकू येत होते. आवाजाची दिशा आणि जात ह्यावरून माझ्या हेहि ध्यानात आले की, तो राहुटी भोवती फिरतो आहे, आणि हे ओरडणे नित्याचे नाही. जोडीपैकी एक बिबळ्या मारला गेल्यावर, दुसरा जसा ओरडतो तसे हे ओरडणे होते.

रात्री तीन साडेतीनच्या सुमाराला मला झोप लागली.

पुढे दोन दिवस विशेष काही घडले नाही. पहिल्या दिवसासारखेच हेहि दिवस गेले. बाईला बोलणे काहीहि कळत नव्हते. घरकामासाठी तिचा मला काडीइतका उपयोग झाला नाही. झाडलोट, पाणी भरणे, कपडे धुणे, अन्न शिजवणे ही कामे मलाच करावी लागली. बाई दिवसा सहसा वाहेर पडत नसे. ह्या दोन्हीहि रात्री तो बिबळ्या ओरडत हिंडतच होता. सबंध राहुटीभोवती जिथून जिथून तो आत येण्याची शक्यता होती, तिथे मी बाभळीचे काटे आणून अंथरून ठेवले. माजरांप्रमाणे मऊ तळपाय असलेले बिबळे काट्यात शिरण्याचे धाडस करीत नाहीत.

त्या दोन दिवसात आणखीहि काही गोष्टी माझ्या ध्यानात आल्या होत्या. बाईचे कान, माणसापेक्षा जास्ती तीक्ष्ण होते. लांब दूरवर भेकर ओरडताच ती डोळे उघडून ऐकत राही. हिचे डोळे





अनुक्रमणिका

माणसापेक्षा वेगळें होते. कारण काळोखातहि तिला उत्तम पहाता येत होते. शिवाय, एका जागेहून दुसऱ्या जागी जाताना तिच्या पावलाचा मुळीच आवाज होत नसे. अर्थात्, मांजराच्या जातीतील जनावरांप्रमाणे, हे सर्व गुण, जंगलात जन्म काढलेल्या माणसापाशीहि असू शकतात.

ती राहुटीत आल्यापासून चवथ्या दिवशीच्या तिसऱ्या प्रहरी मी बाहेर पडलो आणि जंगलात हिंडून एक भेकर मारले. ते जीप्मध्ये टाकून परत आलो तेव्हा साडेसात वाजले होते. राहुटीत येऊन मी कंदील लावला पण नेहमीच्या जागी बाई दिसली नाही. राहुटीच्या आसपास हिंडून पाहिले तेव्हा काही तपास लागला नाही.

साडेआठ वाजले.

मग मात्र मला काळजी वाटू लागली. इतका वेळ ती कधी बाहेर जात नसे. काय झाले असावे, असा तर्क करता करता मला आठवले की, आज बादलीतील पाणी संपले होते. बाहेर जाण्यापूर्वी बादली भरून ठेवण्याचे मी विसरलो होतो. पाणी पिण्यासाठी ती ओढ्यावर तर गेली नसेल? पण, परत यायला इतका वेळ कां लागावा ?

ही शंका मनात येताच, मी कपाळावर हेडलाईट लावला, बंदूक घेतली आणि ओढ्याच्या दिशेने चालू लागलो. माझ्या आणि सोमल्याच्या वर्दळीने पायवाट पडलेली होती. आजुबाजूला प्रकाशझोत टाकीत मी त्या पायवाटेवरून जात राहिलो.

राहुटीपासून अंदाजे तीस यार्डावर तिची ओढणी पडलेली मला दिसली. पुढे, वाटेपासून उजव्या दिशेला (तिकडे दाट जंगल आणि लहान टेकड्या होत्या) तिच्या हातातील रुप्याचे दागिने जाग जागी पडलेले दिसले, आणि पुढे, फाडून चिंध्या केलेला तिचा घागरा, चोळी सांपडली.

काय प्रकार झाला असावा या संबंधी तर्क करण्याचे आता काही कारण नव्हते. या भागात नरभक्षक बिबळ्या असल्याची माहिती मला नव्हती, पण शेकडो चौरस मैल पसरलेल्या राखीव जंगलातून तो हिंडत हिंडत आजच इथे पोहचला असणे शक्य होते. ती दुर्दैवी स्त्री त्याच्या भक्ष्यस्थानी पडली होती.

जवळपास कुठे तिचे अवशेष सापडले असते. पण आता रात्री जास्ती शोध करण्यात अर्थ नव्हता. माझे मन फार खिन्न झाले.

अत्यंत सावधपणे मी परत राहुटीत आलो. आणि कॉटवर पडलो. अजून काही चमत्कार व्हावा आणि बाई परत यावी असं उगीचच वाटत राहिले. आपल्या हाती अचानकपणे आलेला एक मोठा ठेवा, तितक्याच अचानकपणे नाहीसा झाला असे वाटले. मला अजून किती तरी पहायचे होते अभ्यास करावयाचा होता, या विषयावर एक मौलिक ग्रंथ लिहावयाचा होता. कोणी एका साहेबाने एल्सा नांवाची सिंहीण घरी पाळली आणि त्या अनुभवावर जगप्रसिद्ध व्हावे असले पुस्तक लिहिले. त्यापेक्षा उत्तम संधि मला आली होती, आणि हुकली होती.

मला विलक्षण हळहळ वाटली.

★★

दुसऱ्या दिवशी सकाळी मी पुन्हा शोधासाठी बाहेर पडलो. हिंडहिंड हिंडलो पण त्या लमाणी स्त्रीचे अवशेष मला आढळले नाहीत. ते आढळणार नाहीत याची खात्री पटली. आणि सकाळी नऊ वाजण्याच्या सुमारास एक अर्थपूर्ण दृश्य दिसले.

समोरच्या टेकडीच्या उतारावर जे मोठमोठे धोंडे पडलेले होते त्यापैकी एका मोठ्या धोंड्यावर बिबळ्या वाघाची जोडी बसली होती. मजेत उन खात होती ! !



अनुक्रमणिका








देवगिरीच्या यादवांचे प्रधान व
विशिष्ट मंदीर–शिल्प यामुळे महाराष्ट्रास
ललामभूत ठरलेल्या या थोर
मुत्सद्याचे आद्यस्थान गोमंतक असावे असा
एक विचार-प्रवाह आहे.
तथापि हेमाडपंताना गोमंतकीय ठरविणे——
उपलब्ध पुराव्याचे विरुद्ध आहे.....
गोमंतकीय संस्कृतीचे एक रसिक व मर्मज्ञ संशोधक

श्री. का. दा. नायक

यानी केलेले हे उत्कृष्ट विवेचन


'उगे' (सांगे) येथील हेमाडदेवांची मूर्ति

# हेमाडपंत गोमंतकीय?

तेराव्या शतकात महाराष्ट्रामध्ये हेमाद्रि उर्फ हेमाडपंत हे एक थोर गृहस्थ होऊन गेले. देवगिरी येथील यादव राजघराण्यातील अखेरचे राजे महादेवराव व रामदेवराव यांचे मंत्रीपद हेमाडपंतांनी भूषविले होते. त्याना कर्णाधिपति ही पदवी मिळालेली होती. राजकारण–धुरंधर, उत्कृष्ट प्रशासक, युद्धकलानिपुण तसेच संस्कृत भाषेतील फार मोठे अधिकारी असा हेमाडपंतांचा लौकिक होता.

हेमाडपंत ब्राह्मण होते. परंतु त्यांची 'शाखा', तसेच त्यांचे जन्मग्राम याबद्दलची निश्चित व स्पष्ट माहिती अद्यापि पुढे आलेली नाही. त्यामुळे त्यासंबंधी अजूनहि केवळ अनुमानांवरच अवलंबून रहावे लागत आहे. हेमाद्रि हे गोमंतकीय होत, असे अनुमान काही वर्षांपूर्वी दोन गोमंतकीय लेखकांनी मांडले होते. पुढे तो विषय तसाच राहिला होता. पण गेल्या वर्षीच्या मार्च महिन्यात पद्मश्री (कवि) बोरकर यानी तेथे पहिल्या मराठी कवि–संमेलनाच्या अध्यक्षपदावरून केलेल्या भाषणात त्या विधानाचा जोरदार पुरस्कार केला. तसेच त्यानंतर त्यानी 'GOA TODAY' या इंग्रजी–मासिकात "Hemadri or Hemadpant, was he a Goan?" या मथळ्याखाली काही संदर्भासहित विस्तृत लेख लिहिला होता. पद्मश्री बोरकर सांगतात, "हेमाडपंतांच्या चरित्राचा अभ्यास केलेल्या इतिहासतज्ञांनी असे मान्य केले आहे की हेमाडपंत श्रीकृष्ण देवतेचे उपासक होते. तसेच त्यांचे गोत्रही वत्स होते. तर काही इतिहासकारांच्या मते ते कर्नाटकी होते. आणखी काही जणांचे मते 'हेमाडपंत महाराष्ट्रीय असून त्यांचे वास्तव्य कर्नाटकात होते." फक्त इतिहासाचार्य राजवाडे यानीच असा तर्क मांडला, की हेमाद्रि हे गौड-ब्राह्मण होत. पण हेमाद्रिपंतांच्या मूळ गांवाचे गूढ मात्र अद्यापि तसेच आहे. खालील पुराव्यावरून असे दिसते की ते सारस्वत अगर शेणवी ब्राह्मण असून मूळचे गोमंतकीय होत. (It leads to the inference that he was a Saraswat or Shenavi Brahman of Goa Origin.)

## बोरकर यांचे अनुमान

पद्मश्री बोरकर म्हणतात, "पंढरपूर येथील विठोबाच्या देवालयात एक शिलालेख आहे. त्या देवळाचे बांधकाम ११७३-मधे होऊन ते ११७६ मध्ये पूर्ण झाले. त्या देवळानिमित्त ज्या मंडळीनी देणग्या दिल्या त्यात काही गोमंतकीयांची नांवे आहेत. ती म्हणजे–कोंकण, नायक, दणाईत, तेलंग, पडियार, लाड व कर्णिक. त्यातील चार नांवांच्या आडनांवांचे शेवटी "कार" असे आहे. गोव्यामधे आडनांवाला 'कार' जोडण्याची पद्धत चालू आहे. तर महाराष्ट्रात 'कर' असे जोडले जाते. ज्या आडनांवांच्या शेवटी 'कार' असे लावलेले आहे, त्यात हेमाद्रिचा उल्लेख 'सोडवीकार हेमाद्रि पंडित' असा आहे. यावरून हेमाद्रिपंतांचा गांव सोडवी असावा असे दिसते. गोव्यात सोडवी, सोडवे वा सोडवय या नांवाचे खेडे हेमाडबारशे अगर 'उगे' गांवाजवळ





अनुक्रमणिका

असण्याचा संभव आहे. त्या 'उगे' गांवालाच पूर्वी 'सोडवी' असे नांव असल्याचे आढळून आल्यास मला (वोरकर) आश्चर्य वाटणार नाही."

पद्मश्री बोरकर नुसते अनुमान करून थांबलेले नाहीत. तर त्यानी त्यासाठी पुराव्यादाखल एका देवळाचाही उल्लेख केला आहे. ते म्हणतात, "उगे गांवात जरा मोडक्या स्थितीत 'हेमाडदेव' या नांवाचे एक देवालय आहे. त्या देवळ तील लिंगाकृतीची एक शिल्प पिंडीकेवर आहे. त्या शिलेवर हेमाडदेवीचे चित्र कोरलेले आहे. शिलेवर एकूण तीन चित्रे कोरलेली आहेत. उभ्या असलेल्या मधल्या व्यक्तीच्या माथ्यावर मुकुट असून खांद्यावर जानवे व उजव्या हातात राजदंड आहे. तिच्या डाव्या हातावर शाल आहे. डाव्या हाताला असलेल्या सेवकाने मधल्या व्यक्तीवर छत्र धरले आहे. उजव्या बाजूस असलेल्या व्यक्तीनेही जानवे धारण केले आहे. उजव्या बाजूला असलेले लहानसे चित्र हेमाडपंतांचे मित्र श्री. वोपदेव यांचे आहे. ते हेमाडपंतांचे सहकारीही होते." "अ इंडिया पोर्तुगीज–भाग दुसरा" य सियोर लोपेस मेंदेस यांनी लिहिलेल्या ग्रंथात ते चित्र आहे.

"उगे हा गांव हेमाड-वारशेहून फारसा लांब नाही. त्या भागाला हेमाड-वारशे हें हेमाद्रिचे नांव असून ते काही वर्षापासून चालू आहे. तसेच हिंदुस्तानात ते नांव 'एकमेव' असे आहे. हेमाडवारशे ही त्यांची (हेमाडपंत) खाजगी इस्टेट असावी. सरकारी नोकरीतून निवृत्त झाल्यावर त्यानी आपले उर्वरित आयुष्य तेथे घालविले असावे. आणि त्यांचा मृत्यूही त्यांच्या पूर्वजांच्या 'उगे' याच गांवी झाला असावा. व त्यांच्या सहकाऱ्यानी त्यांचे स्मारक म्हणून देवालय बांधले असावे."

पद्मश्री बोरकर यांचे ते अनुमान वास्तविकरीत्या तसे नवे नाही. कारण सन १९५९ साली गोव्यातील 'भारत-मित्र' या मासिकाचे संपादक श्री. ना. भा. नायक यांनी 'गोमंतकीय देवालयें' असे एक पुस्तक लिहून प्रसिद्ध केले होते. हेमाडदेव–उगे या देवळाची माहिती त्यानी अशी दिली आहे की, "सांगे महालातील हेमाड व हेमाडदेव म्हणजे हेमाडपंत, हे देवगिरीच्या यादवांचे मंत्री असावेत, असे वाटते. पुढे त्यांच्या (हेमाडपंत) जहागिरीत त्यांची मूर्ति घडवून आणणे हे अशक्य दिसत नाही."

त्याहीपूर्वी कै. श्रीमठस्य गणेश शर्मा यानी सारस्वतींच्या चरित्र–नामावलीत (प्रसिद्धी १९५०) हेमाडपंत यांना सारस्वत ठरविले आहे. (ग्रंथ–सारस्वत भूषण ) मात्र त्यासाठी त्यानी आधार असा काही दिलेला नाही. तर रा. रा. श्री. पाध्ये यांच्या हेमाद्रि अगर हेमाडपंत चरित्रावरून आपण ते घेतले आहे असे सदर ग्रंथकर्त्याने म्हटले आहे.

आता या साऱ्या तर्कांचा साकल्याने विचार करूया. प्रथम कै. श्रीमठस्य गणेश शर्मा यांच्या 'सारस्वत–भूषण' ग्रंथातील तो उल्लेख बघूया. कै. शर्मा यानी त्या ग्रंथात हेमाडपंतांचे चरित्राशिवाय विशेष असे काही लिहिलेले नाही. ते (शर्मा) कालवश झाले असल्याने, 'हेमाडपंत गोमंतकीय असावेत' हे मत शर्मा यानी कोणत्या आधारावर बनविले होते तेहि कळण्यास मार्ग नाही. शर्मा यानी तसे विधान करताना रा. रा. श्री. पाध्ये यांचे पुस्तकातील गोविंद कवी याच्या एका मेस्तकाचा उल्लेख केला आहे. (मेस्तक–मायना). त्यात शेणवाई मेस्तके म्हणजे शेणवी याची मेस्तके असे म्हटले आहे. त्यावरून श्री रा. रा. पाध्ये यानी तसा ग्रह बनविला असावा. कारण श्री. पाध्ये 'हेमाद्रि–चरित्र' या ग्रंथात लिहितात, "राजकीय व खाजगी पत्रव्यवहारात बरीच सुधारणा करून हेमाडपंतानी नवीन मेस्तके तयार केली." तर सांगायचे असे की गोविंद कवी याने लिहिलेल्या मेस्तकप्त असे म्हटले आहे की "पूर्वी तया देवगिरीसी। रामदेव राजापाशी असता, हेमाडपंतांशी। युक्ती असे आठविली। मोडी लिपी लंकेहुनी आणिली! त्यावरी स्वमनियुक्त लिहिली। आणि कामराजाशी आज्ञा दिधली शेणवाई पद्धत रचावया।।"

यात शेणवाई अर्थात् शेणवी हा शब्द असल्याने हेमाडपंडित हे शेणवी असावेत, असे कै. गणेश शर्मा यांना वाटले असावे. वास्तविक "कवितेत शेणवाई पद्धतीची मेस्तके रचावयास आज्ञा दिली," असा याचा अर्थ आहे. हेमाद्रिनी मेस्तके लिहिली. त्याला शेणवाई मेस्तके हे नांव पडते, असा त्याचा अर्थ होत नसावा, असे वाटते. उलट तशी ती पुस्तके पूर्वापार असावीत व त्याना 'शेणवाई मेस्तके' असे नांव असावे. कारण त्याहीपूर्वी शेणवी यानी गोवा, कदंब व शिलाहार यांच्या राज्यात मंत्री व इतर पदे भूषविलेली होती.




**कदंब राजवटीतील 'हेमाडपंथी' सुवर्ण नाणी**

त्यानंतर 'भारत–मित्र' मासिकाचे संपादक श्री. नायक यानी मांडलेल्या विचारांचे खंडन. "सांगे तालुक्यातील काही भागाला असलेले 'हेमाडवारशे' असे पडलेले नांव आणि उगे येथील हेमाडदेव या नांवाने ओळखले जाणारे देऊळ, या आधारे आपण ते मत बनविले. इतकेच काय पण हेमाडपंतांची कुलस्वामिनी म्हाळसा (वेरणे नंतर म्हाडदोळ–गोवा येथील दैवत) होती हेही आपण लेखनाच्या ओघात लिहिले" असे श्री. नायक यानी मला समक्ष भेटीत चर्चेचे वेळी सांगितले. तसेच ते अनुमान आता त्यानाहि सत्य वाटत नसल्याचे बोलून दाखविले.

## बोरकरांची विधाने व इतिहास

पद्मश्री बोरकर यांची विधाने पडताळण्यासाठी इतिहासाची पानेच उलटणे आवश्यक आहे. अगदी हेमाडवारशे याच नांवापासून आपण ऐतिहासिक मागोवा घेऊया.






अनुक्रमणिका

हेमाडबारशे हे नांव सांगे तालुक्यातील त्या भागाला केव्हा-पासून लागू झाले, याबद्दल निश्चित माहिती उपलब्ध नाही. तो महाल तसेच फोंडे, कॆंपे, व काणकोण हे सौंदेकर यांजकडे होते. १७–१–१७९१ रोजी झालेल्या तहाप्रमाणे ते त्यांजकडून पोर्तुगी-जांच्या ताब्यात आले. सन १७६६ च्या महाल–जमाबंदीचे काही मोडी कागद पोर्तुगीज दप्तरात आहेत. त्यावरून असे आढळते की हेमाड बारशे महालात पस्तीस मौजे अथवा गांवे यांचा अंत-र्भाव होता. त्याच्या नऊ तर्फा पाडल्या होत्या. (तर्फ–भाग), (१) सुर्लं, (२) साकोर्डे, (३) वांदोड बार्शे, (४) कुळें, (५) कोडली, (६) सालावली, (७) आठवार्शे (लाटवार्शे). व (८) तुडव–असे प्रमुख भाग होते. त्यापैकी साकोर्डे, सालावली, तुडव व कोडली या चार तर्फांतील चौदा गांवांतून श्री हेमाडदेव याचे प्रीत्यर्थ काही खर्ची पडल्याचा उल्लेख आढळतो.

हेमाड शब्दाची व्याख्या कै. वर्दे–वालावलकर यानी अशी केली आहे की, श्रीकृष्ण–जरासंधाचे युद्ध ज्या भागात झाले, त्याला हेमाड अगर हेमाड–बारशे म्हणतात. संस्कृत शब्द हेमाद्रि याचा अर्थ सुवर्णाचा पर्वत असा होतो. सुवर्णाचा पर्वत म्हणजे मेरु. 'त्या मेरु'वरून हेमाड शब्द बनला हे निःसंशय. हेमाद्रि हा शब्द संस्कृत असून तो हेम अगर हेमन्‌वरून आला. त्याचा संस्कृत कोषातील अर्थ 'सुवर्ण' असा आहे.



हेमाडदेव मंदीर 'उगे' (डाव्या बाजूचे छायाचित्र)

**कानडी भाषेतील एक व्युत्पत्ती** :—हेमाड हा शब्द द्राविडी वाटतो. हेग्गडी अगर हेम्माडी असे आडनांव धारण करणारी कुटुंबे कॅनरा जिल्ह्यात आहेत. त्याबाबत मंगळूर येथील एका स्नेह्याने असे कळविले की "कुंदापूर तालुक्यात हेमाडी नांवाचे खेडेगांव आहे. आपण हेमाडपंत या नांवावरून ती माहिती विचा-रली असावीत असा माझा तर्क आहे. साधारणतः 'अडि'या शब्दाचा अर्थ झाडांचा पुंजका असा आहे. हेमाडी अगर हेमाडपंत–हा 'परमार्डी' या शब्दाचा अपप्रयोग आहे. 'परमार्डी' याचा अर्थः– 'पेर' म्हणजे मोठा व 'अडि' म्हणजे हुकुमाचा ताबेदार–आज्ञापालन करणारा असा आहे- आणि 'परमार्डी' हा शब्द तामीळ आहे. (परमार्डी–पेरमार्डी) त्याचा अर्थ पेर म्हणजे मोठा व अडि म्हणजे उपाध्याय (Priest) असा आहे. तो शब्द प्रथम पल्लव राजांच्या कारकीर्दीत–उत्पन्न झाला."

## स्वतः हेमाडपंतांनी दिलेली माहिती

हेमाडपंत हे शुक्ल यजुर्वेदी शाखेचे वत्स गोत्री, पंच–प्रवरी ब्राह्मण होते. त्यांच्या वडिलांचे, आजोबांचे व पणजोबांचे नांव अनुक्रमे कामदेव, वासुदेव व वामन असे होते. ही माहिती त्यानी स्वतः लिहिलेल्या 'चतुर्वर्ग–चिंतामणी' ग्रंथात दिलेली आहे असे त्यांच्या चरित्रकाराने लिहून ठेवले आहे. हेमाडपंत हे संस्कृतज्ञ, राजकारणी, हत्तीदलाचे सेनापती, युद्धकुशल नेते व कर्णाधिप होते. त्यांनी लिहिलेले संस्कृत ग्रंथ त्याही काळात मान्यता पावले होते.

यादव राजे रामदेवराव व महादेवराव यांचे दरबारी हेमाड-पंतानी प्रधान म्हणून लौकिक कमावला. परंतु पुढे पुढे त्या काळात उदयाला आलेल्या महानुभाव पंथाची छाप देवगिरीच्या राजघरा-ण्यावरही पडली. त्या पंथाचे गुरु व हेमाडपंत यांच्यात विरोध निर्माण झाला. (हेमाडपंतांना क्लेशपूर्ण देहांत शासन भोगावे लागले, वगैरे मजकूर महानुभाव ग्रंथात असल्याचे कळते. कदाचित विरोधामुळे तसे लिहिले गेले असणे शक्य आहे.) पण एक खरे की कोणत्याहि मार्गाने हेमाडदेवांच्या उत्तरार्धाची (शेवटच्या काही वर्षांची) माहिती स्पष्ट होत नाही. हेमाडपंत यांच्या चरि-



सुर्ल-तांबडी महादेव मंदीर (हेमाडपंथी घडण)

त्राची उपलब्ध असलेली सर्वसाधारण माहिती ही अशी आहे.

## कालगणनेतील चूक

पद्मश्री बोरकर यानी आपल्या लेखात प्रारंभीच असे म्हटले आहे की हेमाडपंत बाराव्या शतकात होऊन गेले. तसेच पंढरपूर येथील त्या देवालयाचे बांधकाम ११७३ ते ११७६ मधे झाल्याचेही म्हटले आहे. त्यात पद्मश्री बोरकर यानी एका शतकाची चूक केलेली दिसते.

देवगिरीचे प्रधान हेमाडपंत (हेमाद्रि) यांचा काल १३ वे शतक होय. डॉ. पानसे यानी आपल्या ग्रंथात तो काल सन १२६० ते १३१० असा दिला आहे. पंढरपूरच्या शिलालेखाचाही काल तेरावे शतकच आहे. तो शिलालेख कोरण्याचे काम शके ११९५ मधे सुरू होऊन

११९८ मधे समाप्त झाले. त्यांहीवरून सन गणनेप्रमाणे सन १२७३ ते ७६ हीच वर्षे येतात. पद्मश्री बोरकर यांनी शक व सन यांचा मेळ घालताना ती चूक घडली असावी.

## शिलालेखातील तीन हेमाडपंत

पंढरपूर येथील देवळांतील शिलालेख श्री. रा. रा. पाध्ये यानी आपल्या ग्रंथात सविस्तरपणे दिला आहे. त्याप्रमाणे एकूण तीन हेमाडपंडित आढळतात. (१) सोडवीकार हेमाड पंडिती-वामनदत्त (२) कौटोन हेमांडी पंडित (३) कोहोर हेमाद्रि पंडित.

पहिल्या दोघांचे नांव 'कानडी' हेमाडी आहे. व तिसऱ्याचे नांव 'संस्कृत' हेमाडी असे दिले आहे. वामनदत्त म्हणजे वामनाचा मुलगा असे म्हटल्याने हा कोणी दुसरा की काय असा संशय काही जणानी प्रकट केला. परंतु शिलालेखात हेमाडी पंडिताचा शक ११९८ दिला असून, त्याखाली लगेच चक्रवर्ती रामचंद्र देवराय याचे नांव आहे. मात्र त्याचा शक ११९९ दिला आहे. त्यावरून असे वाटते की हेमाडिनंतर एका वर्षाने राजाने देणगी दिली असावी. परंतु दोन्ही नांवे बरोबर असल्याने यादवाचे मंत्री हेमाडपंत हेच शिलालेखातील हेमाडपंत असावेत.

## हेमाडपंत पदवी–आणि गोमंतकीय कदंब राजे

गोमंतकावर कदंब घराण्याचे राज्य तीन शतके अबाधित (सन ९८०-१३००) व पुढे अंशतः होते. त्यातील जयकेशी दुसरा याला (११०४ ते ११४८) दोन मुलगे होते. त्यांची नांवे अनुक्रमे शिवचित उर्फ पेरमाडी व विष्णुचित उर्फ विजयादित्य अशी होती. विजयादित्याला 'युवराज' हा किताब होता. त्यावरून असे अनुमान निघते की विजयादित्य हा पळसिगे टापूचा प्रांताधिकारी (व्हाइसरॉय) असावा व पेरमाडी हे त्याची मुख्य राजधानी गोवा येथे रहात होते त्या (शिवचित) पेरमाडींचा काळ सन ११४७ ते ८१ असा आहे.

शिवचित कंदबाचे एक सोन्याचे नाणे उपलब्ध आहे. त्याच्या एका बाजूला सिंह व शकाचे नाव असून, दुसऱ्या बाजूला पाच ओळीत पुढील मजकूर आहे.

१ श्री सप्त को
२ टिश लब्धवर सि
३ वाचित वीर हेमा
४ डि देवर मल
५ वर मारि

तो लेख सुस्पष्ट आहे. ते नाणे 'वृष' संवत्सरामधील आहे. त्याचा शक १८०३ आणि सन ११६१ येतो. त्या नाण्यातील चौथ्या ओळीतील 'डि' या अक्षराऐवजी 'द्रि' असे अक्षर आहे, असे मत सुप्रसिद्ध नाणे तज्ञ श्री. खरे यानी व्यक्त केले होते. परंतु त्या नाण्याचे बारकाईने अवलोकन केल्यावर असेच आढळून येते की, ते अक्षर 'द्रि' नसून 'डि'च आहे.

कदंब राजवटीतील नाण्यांबद्दल डॉ. दीक्षित यानी लिहिलेला लेख, तसेच म्हैसूर राज्य तील पुरातत्व विभागाकडे असलेली शिवचित पेर्माडिंची नाणी आणि त्यासंबंधीची म्हैसूर आर्किऑलॉजिकल सर्व्हेमधे दिलेली माहिती यावरून पुराव्यानिशी एकच गोष्ट सिद्ध होते. ती ही की, हेम्माडि, हेमाडीदेव ही पदवी धारण करणारा राजा होता, तो हेमाडपंतांचे एक शतक अगोदर होऊन गेला. पण हेमाडपंत गोमंतकीय होता याचा काहीही निश्चित वा अनिश्चित पुरावा त्या नाण्यांवरून मिळत नाही.

## हेमाडपंत व ब्राम्हणी पोटभेद

हेमाडपंत गोमंतकीय होते असे म्हणणारे विद्वान त्याना शेणवी ठरवू पहातात. परंतु एकतर हेमाडपंतांनी स्वतः लिहून ठेवलेल्या आणि प्रारंभी उल्लेख केलेल्या पुराव्यापुढे ते विधान टिकणे कठीण. ते होते शुक्ल यजुर्वेदि माध्यंदिन. याला आणखीही एक प्रबळ आधार 'सारस्वत-भूषण' या ग्रंथातील पान १७ व ६६ वर मिळतो. त्यात असे म्हटले आहे की 'एकेकाळी सारस्वत ब्राह्मण चारही वेदांचे व शाखा सूत्रांचे अध्ययन करीत. पण सांप्रत दक्षिणेस आलेले सारस्वत फक्त ऋग्वेद व त्याच्या शाखांचे अध्ययन करतात.

सारस्वतामध्ये अशी एक पद्धत आहे की मामाची मुलगी केली जाते. उपनयनाचे वेळी बटुचा मामा बटुला मुद्दाम येऊन सांगतो की 'मी तुला आपली मुलगी देईन!' परंतु जुन्या काळी उत्तरेत ती चाल प्रचलित नव्हती. तसेच बौद्धायनांखेरीज सर्वांनी तिचा निषेधच केला होता. तसेच अपरार्क आणि हेमाद्रि यांजसारख्या महाराष्ट्रीय धर्मशास्त्रकारानी तिचा निषेधच केला होता.

हेमाद्रिने धर्मशास्त्रांवर ग्रंथ लिहिले हे तर सर्वश्रुतच आहे. ब्राह्मण शाखांमधे आंतर-शाखा विवाहाचा त्याने सर्रास पुरस्कार केलेला आढळतो. उलट तत्कालीन सारस्वत समाजात पोटशाखात रोटी व्यवहार सुद्धा होत नसे, मग बेटी-व्यवहार तर दूरच. याही गोष्टीवरून हेच सिद्ध होते की ते गोमंतकीय नसावेत.

## हेमाडपंत वैदर्भीय होते का ?

सन १९१२ साली विदर्भ मराठी साहित्य संमेलनाचे वेळी म. म. डॉ. पां. वा. काणे यानी 'विविध ज्ञान विस्तार'मधे एक लेख लिहिला होता. त्यात त्यानी असा उल्लेख केला होता की 'चतुर्वर्ग चिंतामणी' या धर्मशास्त्रावरील प्रचंड प्रमाणभूत कर्ता हेमाद्रि हा वैदर्भी होता."

हेमाद्रिचे मित्र बोपदेव यानीही संस्कृत भाषेत अनेक ग्रंथ लिहिले होते. त्यातील एका ग्रंथात बोपदेव यानी 'वेदपद' हे आपले जन्मस्थान दिले होते. आणि बोपदेव हे वऱ्हाडातील सार्थ उर्फ साधे येथील रहिवासी होते, हे मान्य झाले आहे. आता निव्वळ 'हेमाद्रि' या नांवावरून ते महाराष्ट्रीय नसावेत असे पुष्कळाना वाटते. परंतु त्याकाळी वराड-खानदेशकडे ती नांवे प्रचलित होती. उदाहरणार्थ देवगिरीच्या यादवांचे मांडलिक व निकुंभ कुळातील राजे सोईदेव व हेमाडिदेव हे बंधु खानदेशकडील रहिवासी होते. वराडच्या पर्णखेरच्या राजाचे नांवहि हेमाद्रि होते.

## हेमाद्रि यांचे उपास्य दैवत

ज्या इतिहासकारानी हेमाद्रि उर्फ हेमाडपंत यांच्या चरित्राचा अभ्यास केला आहे, त्यांचे मते हेमाद्रिचे उपास्य दैवत कृष्ण होते, असे विधान पद्मश्री बोरकर यानी केले आहे. परंतु खुद्द हेमाद्रिचा






शिष्य व परमस्नेही वोपदेव 'मुक्ताफल' या त्याच्या ग्रंथात म्हणतो की त्यांचे उपास्य दैवत विष्णु होय.

विष्णु व श्रीकृष्ण ही दैवते वैष्णव असली तरी गोव्यात वैष्णव पंथ आला तो श्री मध्वाचार्यानंतर. गोमंतकातील अनेक देवळांना जरी 'शैव' नावे दिलेली असली तरीही ती नावे मूळची 'वैष्णव'च होती. हेमाडपंत हे शैव, शेणवी, सारस्वत व मूळचे गोव्याचेच असते तर त्यांनी शैव, शेणवी सारस्वत यांच्या उपास्य देवतेपैकी एकाची उपासना केली असती. परंतु तसे आढळत नाही.

**मग हेमाडपंथी देवळे कशी ?**

इतके सगळे आहे तर मग गोमंतकात हेमाडपंथी देवळे आलीच कशी ? त्याला उत्तरे अनेक आहेत. गोवा आर्कीव्हजचे संचालक डॉ.गुणे यांनी 'Ancient Shrines of Goa' हे पुस्तक लिहिलं आहे. त्यातील एक संदर्भ पुरेसा बोलका आहे. . . तांबडी सूर्ल देवालय हे एकच देवालय असे दाखविता येईल की ज्याची बांधणी हेमाडपंताचे काळी झाली. पंढरपूर येथील विठोबाच्या देवळातील शिल्पाची बरीचशी छाप या देवळावर पडली आहे. आणि पंढरपूरचे ते देऊळ हेमाडपंती बांधकामाचा एक आधारभूत (Standard) नमुना मानला जातो. [हेमाडपती रचना म्हणजे होशळ आणि यादव शिल्पांच्या संयोगाने निर्माण झालेली रचना.]

मेजर गिल यानेही वराडातील दौऱ्यात तेथे आढळलेल्या हेमाडपंथी देवळांविषयी बरीच माहिती दिली आहे.

राहता राहिले उगे येथील देऊळ. ते जीर्णशीर्ण अवस्थेत असल्याचा उल्लेख Popes Mendes यांनी केला आहे. तेथील शिळेवर कोरलेल्या मूर्तीतील हेमाडपंत व वोपदेव यांजविषयीचा मजकूर यापूर्वीच आलेला आहे. प्रस्तुत लेखकास प्रकृतीस्वास्थ्याचे अभावी त्या देवळाची पहाणी करणे मात्र शक्य झालेले नाही. तरीही येथवरच्या विवेचनावरून असे साधार म्हणता येते की ते देऊळ हेमाडपंतांचे स्मारक म्हणून तेथील ग्रामस्थानी हेमाडदेव चित्रित करून बांधले असावे. यात आणखीही एक बारकावा असा की जर ते देऊळ हेमाडपंताचे स्मारक म्हणून बांधले गेले असते, तर त्याची रचना तशी हवी होती.

सारांश हेमाडपंत, हेमाद्रि या, यादवांचे प्रधान असलेल्या, विद्वत्ता, शौर्य धैर्यादि गुणानी युक्त अशा राजकारणी पुरुषाचे आद्यस्थान गोमंतकच आहे असे ठामपणे म्हणता येत नाही. तसेच ते वैदर्भी होते असे म्हणण्याइतका सबळ पुरावाही उपलब्ध नाही. पण एक मात्र खरे. ते गोमंतकीय होते हे विधान उपलब्ध पुराव्याचे कसोटीवर उतरत नाही. या लेखासाठी घेतलेले संदर्भ :

(१) Goa Today — August 1966 अंक (२) गोमंतकीय देवालयें-ना. भा. नायक पा. ९५ (३) हेमाद्रि उर्फ हेमाडपडित ॲ. के. आ. पाध्ये पा. १४ (४) गोमंतक इतिहास दिग्दर्शन ना. भा. नायक पान ७५ (५) डायरेक्टर ऑफ आर्किव्हज् (गोवा) श्री. गुणे यांचे पत्र (६) गोंयकाराची गोव्यातील वसवणूक कै. शणै वा. र. वर्दे वालावलकर पा. ५ (७) मध्ययुगीन चरित्र कोष सिद्धेश्वर शास्त्री चित्राव (८) यादव कालीन महाराष्ट्र डॉ. मु. ग. पानसे पा. १०३ (९) Journal Namimamie S. India सन १९६५ पान १ (१०) मांडवी मासिक मार्च १९६५ गोव्याच्या कदंबांची नाणी. डॉ. म. गो. दीक्षित. (११) पाध्येकृत हेमाद्रि चरित्र व मुसलमानपूर्व महाराष्ट्र खंड –२– भावे. (१२) 'सारस्वत–भूषण' मठस्थ गणेश रा. शर्मा पान १७ व ६६. (१३) 'नवभारत' वाई जून १९५७ प्राचार्य भुसारी यांचा लेख. (१४) कोंकणाख्यान उत्तरार्ध अ. ३ ओ. ३२ (१५) विदर्भ व महाराष्ट्र यासंबंधी चार शब्द डॉ. पां. वा. काणे 'विविध ज्ञान विस्तार' वर्ष ६३ अंक ११.



—अरविंद ताटके



तारुण्यानं रसरसलेली अशी एक यौवनूसंपन्न छोकरी अंगुरबागेत वेलांवरून डाळींब खुडण्यात दंग होती. तिचं रूप काळजाचे लचके तोडील इतकं अप्रतिम होतं. तारुण्याच्या भरीला आरोग्याचं वरदानहि देवानं तिला दिलं होतं. आपले पोसलेले हातपाय तिनं मेंदीनं मढविले होते. तिच्या घट्ट सुरवारीतून तिचं सारं तारुण्य ओसंडत होतं.

तेवढ्यात टपकन् एक डाळींव तिच्या पुढ्यात येऊन पडलं. त्या-बरोबर असलेली चिठ्ठी पाहून ती बावरली, अंमळ गोंधळलीहि. पण चिठ्ठी वाचण्याचा मोह काही तिला आवरेना. तिनं कागद हातात तर धरला. पण लागलीच ती लाजेनं लालबुंद झाली. अनोळखी तरुणानं तिला प्रेमाची हाक घातली होती — 'तुझं नांव मालूम नाही. पण तुझ्या सौंदर्यानं माझ्या दिल्चे तुकडे झालेयत्. तुझी पेहेछान चाहतो' असा मजकूर होता चिठ्ठीत अन् खाली 'सलीम' अशी सही होती.

तिचं सारं अंग मोहरून निघालं. अंगावर रोमांच फुलले. त्यातून ती सावरते तोच शब्द तिचं मन कापीत गेले.

"आमची शिकार देणार ना ?" ज्वानीतला तरुण तिला विचारीत होता.

"घ्याना" तिनं पडलेलं डाळींब त्याच्या हातात दिलं. त्याचा मधुर स्पर्श तिला जाणवला.

"आणखी एक शिकार केलीय्" तरुण हंसत म्हणाला.

"मी नाही समजले" ती लाजत बोलली.

"या परीची शिकार केलीय्" तिच्याकडे बोट दाखवून त्यानं म्हटलं.

ती फक्त खुद्कन हसली.

पुन्हा तो धिटाईनं बोलला—

"आणखी एक वस्तु चाहतो मी"

"चाहेल ते मिळेल मालिक !" लाजून तिनं जवाब दिला.

"तूं मला ओळखलंस ?"

"हूं."

"चिठ्ठीतल्या सहीवरून बोलतेयस् हे !



अनुक्रमणिका

"भावी बादशहाला ओळखण्यास सहीची काय जरुरी !"

"तूं बोलतेस बाकी छान. तुझं नांव नाही कळलं ?

"विचारल्याशिवाय बोलण्याची आदत नाही आमची."

"आता विचारलं ना ?"

"अनारकली म्हणतात मला."

"वा: नांवाप्रमाणं आहेस अगदी."

"गरीबाची काय थट्टा चालविलीय खाविंद !"

---

***तू माझी रक्षा आहेस. तेव्हा तलाकचा प्रश्नच येत नाही. . . तुझी शादी म्हणशील त्याच्याशी खुषीनं करून देईन. . . पण तू त्याची दोस्ती सोड. . . आणि डाळिंबाच्या दाण्याच्या कांतीची तिची सुरत दाण्यासारखीच घरंगळली.***

---

"अल्लाच्या दरबारात सगळेच गरीब असतात अनारकली."

"पण ते अल्लाच्या. शहेनशहा अकबराच्या नव्हे."

"अब्बाजान गरीब श्रीमंत भेद मानीत नाहीत, अनारकली !"

"वाटलं ते बोलले. अनुभवलं ते शब्दरूप केलं. माफी खाविंद."

"ते जाऊदे. एक चाहतो अनारकली."

"बोला."

"तुझी मोहबत हवीय्"

"उशीर झाला खाविंद. हुंगलेलं फूल कशाला चाहता ?"

"नाही नाही अनार. तुझं रूप अगदी टवटवीत आहे. कुणी वास घेतला या गुलाबाचा ?"

"नांव काय करायचंय् ? आपली मोहबत मग टिकणार नाही."

"नाही अनारकली. नांव कळलं पाहिजे. तुला तलाक मिळवून देईन. पण तू मला हवीस.

"नांव सांगितल्यावर आपल्या मोहबतीला मी पारखी होईन म्हणून दिल् तुटतोय सरकार."

"तू चाहतेस मला ?"

"हुं !" अनारकलीनं लाजून हुंकार दिला.

"नांव सांग. कुणीहि असू दे. मी तुला अंतर देणार."

"ऐका तर मग. शहेनशहांच्या जनानखान्यात असते मी"

"काय बोलतेस हे, अनारकली!"

"खरं ते सांगते मालिक."

"अब्बाजान केवढे अन् तू केवढी !"

"पुरुषांना स्त्रीचं रूप तेवढं दिसतं. उमरीचा विवेक त्यांना नाही रहात."

"अब्बाजान वेगळे आहेत अनार. लहान वयाच्या शादीला विरोध आहे त्यांचा."

"पण तो शादीला. माझ्याशी त्यानी शादी थोडीच केलीय ?"

"काय बोलतेस तूं हे अनारकली !" अब्बाजानची बेईज्जत करतेस ?"

"इज्जत ! हुं ! माझी काय इज्जत ठेवली त्यांनी. रक्षा म्हणून त्यानी माझा देह विटाळला. त्यावेळी वयाचा विचार त्यांना नाही सुचला ?"

"अब्बाजान चुकले अनारकली !" सलीम बोलला.

"पण अजून मोहब्बत करता आपण माझ्यावर ?"

"हो. तुझ्याशिवाय मी जगणार नाही आता, अनारकली ! तू शादी करशील माझ्याशी ?"

"ते कसं शक्य आहे सरकार ? अब्बाजानला कळलं तर मला ते जिवंत नाही ठेवणार !"

"मी काढीन त्यांची समजूत. ते एवढे दुष्ट नाहीत."

"असं कुठं मी म्हणते ? शाहजादा आपल्या रक्षेवर बदनजर ठेवतो हे त्यांना कसं मंजूर व्हावं ?"

"किती कठोर बोलतेस तूं !"

"पण सच् बोलतेय्. माझाहि आपल्यावर जीव जडलाय्. पण त्यामुळं जीवाला मुकावं लागेल याचीहि जाणीव आहे मला मालिक!"

"बोलण्यात तू अब्बाजानलाहि मागं टाकशील अनार. अशी हुशार स्त्री माझी बेगम होती तर त्याना केवढा आनंद झाला असता. पण हे सगळं भलतंच झालंय् !"

"घाबरलात एवढ्यात !"

"नाही अनारकली. सत्य सांगितलं एवढंच. तुझ्याशिवाय मला नाही आता जीवन जगता येणार अनार !" सलीम भावनेच्या भरात बोलला.

अन् मग सलीमनं अनारकलीला बाहुपाशात ओढलं. तिच्या लालचुटुक ओठांवर तो चुंबनाचा वर्षाव करीत होता. त्याच्या मिठीत ती सुखावली होती. तिच्या उन्नत अन् पुष्ट वक्षस्थळांकडे त्याची नजर भिरभिरत होती. त्याची भूक वाढत असल्याची जाण तिला केव्हाच आली अन् मग ती बोलली— "थोडक्यात गोडी मालिक. कुणी पाहिलं तर तर गोष्ट अब्बाजानच्या कानावर जायला वेळ नाही लागणार. अन् मग त्यांच्या क्रोधाग्नीला मला बळी पडावं लागेल." सलीम भानावर आला अन् मग भरलेल्या आवाजात बोलला.

"पुन्हा कधी भेटशील अनार ?"

"योग असेल तेव्हा !"

"असं कां बोलतेस ?"

"सगळ्यांच्या नजरा चुकवून मला यावं लागेल. आपण काय कुठंहि जाण्यास मुखत्यार आहात."

"खरं आहे अनार. पण परिस्थिती पालटेल थोड्या दिवसांनी."

"मला नाही तसं वाटत. आपल्या संबंधाला अब्बाजान संमती कधीच नाही द्यायचे."

"काढू काही तरी तोड. पण पुन्हा कधी भेटशील ?"

"या उद्या अंगुरबागेत. करीन प्रयत्न येण्याचा."

सलीमची तबियत खूप झाली. त्यानं अनारकलीचा लुसलुशीत हात हातात घेऊन त्याचं चुंबन घेतलं. ती शरमून बोलली,

"पाहील की कुणी !"

"अल्लाशिवाय कोण पहायला आलंय इथं" सलीम बोलला.



अनुक्रमणिका







"पण पुरे आता. भिंतीला कान असतात. शहेनशहांचं हेरखातं फार सावध असतं खाविंद !"

अनारकली जनानखान्याकडे वळली अन् सलीम निघाला आपल्या महालाकडे. प्रेमी युगुलाची ही भेट मात्र टिपली गेली. हेरानं नव्हे. अकबराच्या दोस्तानं अन् सलीमच्या शत्रूनं. या हकिगतीची वर्दी अकबराला देण्यासाठी ती व्यक्ती दुसऱ्या वाटेनं झपझप अकबराच्या महालाकडे चालती झाली अन् त्याच वेळी रात्रीचं साम्राज्य पसरलं होतं. अकबर अंतःपुरात असल्यानं ती व्यक्ती निराश झाली. . .

दरबारात अकबर आसनस्थ असताना पुकार आला– "खाविंद, माफी असावी. एक बातमी पेश करायचीय" अबुल फजल बोलला.

"बोला" अकबर बोलला.

"अगदी खाजगी आहे खाविंद. मामला नाजूक आहे."

"मग या असे जवळ. बोला पुढं."

फजल अगदी जवळ गेला अन् हळू आवाजात बोलला, "सलीमनं.."

"पुढं बोला फजल. थांबलातसे ! काय केलं सलीमनं ?"

"सरकार माफी असावी."

"दिली."

"शहाजादा प्रेमात पडलाय्."

"कुणाच्या ?"

"अनारकलीच्या" फजल चाचरत बोलला.

"याला काही साक्ष ?" अकबरानं घुश्शात विचारलं.

"डोळ्यानी पाहिलं खाविंद."

"फजल वेळेवर ही बातमी पेश केलीत म्हणून आम्ही घुस्सा आवरतो. या प्रकरणाचा फैसला जरूर केला जाईल."

एवढं बोलून अकबर घुश्शातच उठला. दरबार बरखास्त का झाला ते कुणालाच कळलं नाही.

महालात आल्यावर अकबर गरजला,

"कोण आहे रे तिकडं ?"

"जी सरकार" म्हणत पहारेकरी कुनिसात करून उभा राहिला.

"सलीमला बोलावलंय म्हणून सांग."

अकबराची शतपावली चालू असताना सलीम उगवला. अकबर बोलला.

"बैस बेटा."

सलीम निमूटपणं त्याच्यापाशी बसला.

"बेटा मी ऐकलंय ते खरं का ?" अकबरानं शांतपणं विचारलं.

"काय ऐकलंत आपण अब्बाजान ?"

"सलीम" अकबर गरजला. पण लागलीच स्वतःला सावरत तो बोलला–

"आमचा जनानखाना तू खराब करतोयस् असं ऐकलं आम्ही."

"बाजारगप्पांवर आपणहि विश्वास ठेवता अब्बाजान ?"

"नाही सलीम. बातमी विश्वासू दोस्तानं सांगितलीय्."

"नांव कळेल त्याचं ?"

"अबुल फजल. ते झूट नाही सांगायचे."

"साफ खोटी" सलीम उसन्या अवसानानं बोलला.

"सलीम. फजलना तू काय पागल समजतोस ? त्यांनी डोळ्यांनी पाहिलं ते सांगितलं."

"ते झूट सांगतात" सलीम चाचरत बोलला.

"अनारकलीशी तुझी बातचीत झाली ही झूट बातमी" अकबर गरजला.

सलीम वरमला. त्यानं मान खाली घातली.

"आता गप्प कां सलीम? ऐकू दे तुझी कैफियत" अकबरानं म्हटलं.

"माझी मोहब्बत आहे तिच्यावर."

"माझ्या रखेवर मोहब्बत करण्यास तुला शरम नाही वाटत ?"

"मोहब्बतीला धरबंद नसतात अब्बाजान."

"बेवकूफ" अकबर ओरडलाच. जरा थांबला अन् तो पुन्हा बोलला–

"ती माझ्या जनानखान्यातली असूनहि तू तिला चहातोस ?"

"हो, अब्बाजान. आधी बसली मोहब्बत अन् मग समजलं ती तुमची आहे म्हणून. खरं म्हणजे ती तुम्हाला बेटी शोभेल. तिला जवळ करताना तुम्हाला विवेक सुचायला हवा होता."

सलीमनं अकबराच्या मर्मावर अचूक घाव घातला होता. त्यानं अकबर हादरलाहि. नंतर शांतपणं तो म्हणाला–

"सलीम, प्रेमाला जातपात धर्म नसतो हे मला नको तू सांगायला. अनारकलीच्या प्रेमात तू पडलास तर जगात तुझ्याबरोबर माझीहि छीः थू होईल. तो लोकापवाद चांदच्या डागासारखा मला चिकटेल. त्यालाच मी भितो बेटा. हिंदुस्थानच्या भावी बादशहाला खराब झालेल्या छोकरीनं भुरळ पाडली असा वदलौकिक तुझ्या वाट्यास येईल अन् हा प्रकार मी उघड्या डोळ्यानं चालू दिला

अहा, भारत विराजे, वर्ष हे 'पर्यटनी' गाजे... ४

म्हणून माझीहि अब्रू जाईल. प्रेमाहून मी खानदान जास्त मानतो. एरवी तू कुठल्याहि परीशी शादी कर. त्यात मला खुषीच आहे. पण अनारकलीचा नाद तुला धरता नाही येणार. बस्स. एवढंच तुला सांगायचं होतं." अकबराची शतपावली पुन्हा चालू झालेली पाहून सलीमनं तिथून मुकाट्यानं काढता पाय घेतला.

सूर्य कलण्याच्या बेतात असताना सलीम अंगूरबागेत आला अन् त्याच्या पाठोपाठ अनारकलीहि आली. ती आज फारच खूबसुरत भासत होती. डोळ्यात भरेल असा पोशाख तिनं पेहेनला होता अन् तिच्या निळसर डोळ्यात सुरमा शोभत होता. पाणीदार अन् मोत्याच्या माळेनं तिचा गळा शोभिवंत भासत होता.

सलीम तिचं रूप टिपत होता. त्याची नजर तिच्यावर स्थिरावली असताना तो बोलला–

"किती उशीर केलास अनारे ?"

"निघण्याचीच आज मुष्कील होती. पहारा कडक झालाय फार" तिचं बोलणं संपण्याच्या आत सलीमनं दोन टपोरी द्राक्षं तिच्या तोंडात घातली. तेव्हा ती लाजत बोलली–

"अंगुर किती मिठ्ठी आहेत नाही ?"

"तुझी मोहवत त्याहून जास्त मिठ्ठी वाटते मला. द्राक्षांची शराब फार सुरेख असते अनार. पण तुझ्या डोळ्यातल्या शराबनं माझी झोप पार उडालीय. तुझ्या ओठातली शक्कर तर अंगुरांनाहि लाजवील."

"पुरं झालं कौतुक" अनारकलीनं त्याच्या तोंडावर हात ठेवीत म्हटलं.

"कौतुक करावं असंच रूप आहे तुझं."

"पण हे रूपच माझी जिंदगी खतम् करणार आहे."

"ते कसं अनारकली ?"

"माझ्या रूपानंच माझ्या नशिबी जनानखाना आणला."

"थोडी कळ काढ अनार. त्यातून तू लौकर सुटशील."

"सोडा ती गोष्ट."

"असं कां म्हणतेस अनारकली ?"

"आपल्या या भेटी शहेनशहांच्या कानावर गेल्यावर पटेल आपल्याला माझं म्हणणं."

"अब्बाजानच्या कानावर गेलं सगळं."

"त्यांना कुणी सांगितलं ?" अनारकलीनं चपापून विचारलं.

"अबुल फजलनी."

"पण मी तर ऐकते की ते अगदी शरीफ आदमी आहेत म्हणून."

"खरं आहे ते ! पण माझं त्यांचं बरं नाही."

"ते जाऊदे. शहेनशहांची प्रतिक्रिया काय झाली ?" अनारकलीनं उत्सुकतेनं सलीमला विचारलं.

"मला त्यांनी बोलावलं अन् तुझा नाद सोडण्याचा धाक घातला."

"पण आपण काय ठरवलंत ?"

"आपण पळून जाऊया. तुझ्याशिवाय माझी जिंदगी बरबाद होईल अनारकली."

"हा मार्ग धाडसाचा आहे. त्यात गफलत झाली त्यात दोघानाहि सजा होईल."

"त्याशिवाय मला तरी दुसरा उपाय नाही सुचत."

तेवढ्यात सूर्य पार बुडाला अन् मग सलीम अनारकलीच्या मिठीत धुंदावला. तिच्या सौंदर्याचा उपभोग तो मनःपूतपणं घेत होता. अनारकलीचं शरीर मुसावत होतं. अन् मन विसावत होतं. सलीम तिचं सौंदर्य लुटीत तिच्या चेहेऱ्याकडे अनिमिष नेत्रांनी पहात होता.

"आणखी काय हवं आपल्याला ?" त्याच्या नजरेमुळं शरमेनं चूर होऊन तिनं विचारलं.

"काही नको. तुझी सूरत पाहून माझी सारी तहानभूक हरपलीय्."

"पण एक भूक वाढलीय की !" अनारकली मिष्किलपणं बोलली.

"खरं आहे. देहधर्म सुटत नाहीत अनारकली."

एवढं बोलून पुन्हा त्यानं तिला खसकन् बाहुपाशात घेतली अन् मग त्याच्या शृंगाराला धरबंद उरला नाही. त्याच्या हातांना अस्पर्श असा भाग काहीच उरला नाही. अनारकलीला त्याची जाण होती. पण ती चूपचाप होती. ती त्याला हवं दे देत होती. त्याच्या बळकट बाहूत अन् पोलादी मिठीत तिच्या तारुण्याची सारी वखवख शमत होती.

तेवढ्यात सलीमच्या मनात काय आलं कुणास ठाऊक. त्यानं तिला कारंजाच्या पाण्यानं पुरी भिजविली. तिचा झगा तिच्या शरीराला पुरा चिकटला. त्यातून तिचे भरदार उरोज त्याला











जुनी नाटके,
जुनी हॅंडबिले....४

## बोला, की पैसे परत देता?

जुन्या हॅंडबिलांत कथानकाचा सारांश छापण्याची पद्धत होती. त्याचबरोबर महत्त्वाच्या प्रसंगाचे वर्णन देताना कंपनीची खास वैशिष्ट्ये खुलवून सांगितलेली असत. प्रत्येक अंकातील प्रसंगांचा संगतवार तपशील देण्याचा प्रघात होता. नाटकाला येणारे रसिक प्रेक्षक त्या नाटकाची पुस्तके बरोबर घेऊन येण्याची एक फॅशन होती. नाटकांच्या पुस्तकांची विक्री थिएटरातही होई.

छापलेले ते सर्व खरे मानण्याचा तो काळ असल्याने प्रयोगातून एखादा प्रवेश वगळला किंवा छापील पुस्तकाप्रमाणे एखादे पद गाळले तर प्रेक्षक ताबडतोब दंगल माजविण्यासही कमी करत नसत. मॅनेजरच्या नाकासमोर हॅंडबिल किंवा पुस्तक धरून आपले पैसे परत मागत किंवा तो प्रसंग किंवा ते पद आम्हाला ऐकवलेच पाहिजे असा हट्ट धरून बसत.

याचा परिणाम पुढे असा झाला कीं, 'प्रयोगाच्या सोईसाठी मूळ नाटकात काही ठिकाणी फेरफार केला जाईल' अशी सूचना जाहिरातीत कायमची येऊन बसली.

राजापूरकर नाटक मंडळीच्या १९११ सालच्या जाहिरातीत म्हणजे हॅंडबिलात पुढील ओळ आढळते:–

'नाटकाच्या सोयीसाठी काही भाषणे व पदे कमी केली आहेत.'

–केटी

स्तनाग्रांसह स्पष्ट दिसत होते अन् तिच्या पुष्ठ नितंबाची गोलाई त्याच्या नजरेत भरत होती. अनारकली मात्र पुरी शरमिंदी झाली होती. कारण असा प्रणय तिला नवा होता अन् जवानाच्या शृंगाराची चव ती प्रथमच घेत होती.

"आता पुरे. मला गेलं पाहिजे." असं बोलून तिनं त्याच्या मिठीतून मुष्किलीनं सुटका करून घेतली अन् ती जाण्यास निघाली.

"परत कधी भेटायचं अनार ?" सलीम बोलला.

"आपण माझ्याशी शादी कराल ?"

"बेशक करीन."

"शहेनशहांच्या विरोधाला धूप न घालता ?"

"कसम घेतो हवी तर."

"नको. तेवढा भरवंसा धरते आपला. चार दिवसांनी पुन्हा भेटेन तेंव्हा शादीचा दिवस सांगा मला" असं बोलून ती जवळ जवळ पळतच गेली.

अनारकली महालात परतली तो तिथं अकबर एखाद्या कृतांत काळासारखा आधीच येऊन बसला होता. त्यानं जरबेनं तिला म्हटलं,

"एवढ्या रात्री कुठं होतीस अनारकली."

"जरा कामाला गेले होते" ती बोलून गेली.

"साफ झूट !" अकबर जवळ जवळ ओरडलाच.

"खरं बोलतेय शहेनशहा."

"अनारकली, तूं औरत आहेस म्हणून ! नाहीतर. . . . ."

"नाहीतर काय केलं असतंत ?"

"हत्तीच्या पायी दिलं असतं."

"मलाहि ती सजा आपण देऊ शकता शहेनशहा."

"ते मी पाहिन. तू सलीमकडं गेली होतीस की नाही ?" अकबर आवाज चढवून गुरगुरला. त्याचा क्रोध पाहून अनारकलीचं अवसान गळलं अन मग खालच्या मानेनं तिनं जबाब दिला—

"हो."

"व्यभिचाराच्या गुन्ह्याला माझ्या राज्यात काय सजा देतात आहे ठाऊक ?"

"हां ! हां ! असला घाणेरडा आरोप मी नाही ऐकायची."

"कां ? तो झूट आहे."

"बेशक झूट ! माझी शहाजाद्यावर मोहबत असली तरी आम्ही अजून पायरी नाही सोडली."

"पण आपला दर्जा विसरून त्याच्याशी तू कां संबंध ठेवलास अनारकली ?"

"मोहबत दर्जा पेहेचानत नाही. जनानखान्याचा ताफा बाळगणाऱ्याना मोहबत ही चीज काय असते ते कधी कळायचं नाही."

"तोंड आवर अनारकली. मी कोण वाटलो तुला ?"

"माझा मालिक !"

"अन् तरी तू सलीमशी दोस्ती करायला धजावलीस ?"

"खरं सांगू ?"

"सांग."

"माफी चाहते."

"दिली."

"मी आपली बेटी शोभेन. आपण मला बाळगलंत पण मला आपल्याबद्दल कधी ओढ नाही वाटली. प्रेमापेक्षा मला आपली जरबच वाटते. एक सवाल करते शहेनशहा, माझा देह विटाळून आपण काय मिळविलंत ? मुलामुलींच्या खुषीनं शादी व्हावी असा आपण बाहेर डांगोरा पिटता, हुकूम काढता अन् माझ्यासारख्या लहान छोकरीशी मात्र जनानखान्यात जबरी करता. हा काय न्याय झाला शहेनशहा ? आपणच करा याचा फैसला."

अनारकलीच्या या घणाघाती सवाल जवाबानं अकबर निरुत्तर झाला. तो पुष्कळच नरमला. अन् मग बोलला—

"अनारकली तू बरीच हुशार दिसतेस. अशी बेगम सलीमला लाभती तर मला आनंदच झाला असता. पण तुझ्या दुर्दैवानं ती गोष्ट होऊन गेली खरी. मी शहेनशहा असलो तरी लोकापवादापुढं

मुला नमलंच पाहिजे. शिवाय पुढं सलीम तख्तनशीन व्हायचाय. तुझ्या रक्षेशी प्रणय करणारा वादशहा असा त्याचा बदलौकिक नको व्हायला. तुझी त्याची शादी मला मान्य नाही. खुदालाहि ती मंजूर नाही व्हायची. तेव्हा तू त्याचा नाद सोड नाहीतर...."

"नाहीतर काय कराल शहेनशहा ?"

"तुला मौतची सजा मिळेल."

"मग ती सजा आपण जरूर अंमलात आणा ! मोहबतीखातर प्राण कुर्बान करण्यास मी तयार आहे सरकार."

"पोरी होशमध्ये ये. तुला जनानखान्यात ठेवण्यात मी चुकलोहि असेन. पण म्हणून तुझी सलीमशी शादी लावून देण्याची गलती मी फिरून नाही करणार."

"मग तलाक द्या मला."

"तू माझी रक्षा आहेस अनारकली. तेव्हा तलाकचा प्रश्नच नाही. तुझी शादी मी म्हणशील त्याच्याशी खुषीने करून देईन पण सलीमची दोस्ती तुला सोडलीच पाहिजे. त्याची वेगम तुला नाही होता येणार."

"आणी नाही सोडली तर ?"

"तर मग जिवंतपणी मला तुझी कबर बांधावी लागेल. तुला मी मुदत देतो थोडी. तुझा वेत वदलला तर ठीक. एरवी माझा रस्ता मला मोकळा आहे. जातो मी जाता." एवढं वोलून अकवर महालातून निघून गेला. अनारकली सचिंत चेहेऱ्यानं मटकन् खाली वसली.

दुसरे दिवशी दिवस संपण्याच्या वेतात अनारकलीनं साधाच पोशाख केला. मन जुळलं होतं. शरीराची ओळख पटली होती त्यामुळं उंची पोशाखाची गरज उरली नव्हती. तिनं थोडंसं खाल्लं अन् मग ती अनारवागेत आली. सलीम तिचीच वाट पहात होता. अधीरतेनं तो वोला–

"एवढ्या बंदोवस्तातून आलीस म्हणायची. तुझ्या हुशारीचं कौतुक वाटतं अनार."

"आपले अब्बाजान असंच म्हणतात."

"तुला कधी भेटले ते ?"

"मागल्या खेपेस घरी गेले तो, ते तिथं हजर होते."

"मग ! काय म्हणतात ते."

"आपला नाद सोडावा असं त्यानी निक्षून सांगितलं."

"तूं काय बोललीस अनार ?"

"मी चूप बसले !"

"मग त्यानी काय केलं ?"

"विचारासाठी मुदत दिलीय त्यांनी मला."

"मग काय ठरवलंस तूं ?"

"माझं दिल् आता आपल्या स्वाधीन आहे."

"तसं तूं त्यांना सांगणार ?"

"हो. अन् मग मला ते अल्लाकडं धाडतील."

"तसे ते बोलले ?"

"हां !" ऐवढं अनारकली बोलली अन् मग तिला रडू आवरेना.

"रो मत अनारकली" सलीम तिला समजुतीनं बोलला. त्याच्या मिठीत विसावताना ती बोलली–

"आपला ख्याल काय ठरला ?"

"तू अन् मी वेगळे का आहोत ? तुझ्याशी शादी करण्याचा निर्णय मी उद्या अब्बाजानना सांगणार आहे."

"मग माझी मात्र धडगत नाही. आपण तर भावी बादशहा. आपल्यावरील त्यांचा घुस्सा ओसरेल. मला नाही ते माफी द्यायचे. सजा देतील मोतची."

"एवढे का अब्बाजान दुष्ट आहेत ?" सलीम बोलला.

"प्रश्न दुष्टपणाचा नाही. प्रतिष्ठेचा, त्यांच्या अब्रूचा अन् लौकिकाचा आहे. आपल्या दोघांच्या मोहब्बतीवर निखारा ठेवून अन् माझ्या प्राणाचं मोल देऊनच ते आपली अब्रू शाबूत ठेवतील हे पक्कं लक्षात ठेवा. ते शहेनशहा आहेत. त्यांचा निर्णय नाही वदलणार !"

"मग आपण पळून जाऊया का अनार ?"

"नको. चारो तरफ बादशहांचे हेर पसरले आहेत. आत्ता इथंहि भिंतीला कान नसतीलच याची तरी खात्री काय ? उगीच का एवढा बंदोबस्त ठेवलाय त्यानी !"

"आपल्या मोहब्बतीवर त्यांचा एवढा घुस्सा कां अनारकली ? मला काही समजत नाही."

"न समजण्यासारखं आहे काय त्यात. त्यांच्या जनानखान्यातल्या छोकरीशी आपली शादी व्हावी हे त्याना कसं मंजूर व्हावं ?- आपण भावी बादशहा हे विसरून कसं चालेल ! इतर कुणाशीहि ते माझी





अनुक्रमणिका






शादी लावून देण्यास तयार आहेत."

"म्हणजे तूं मला लाथाडणार तर ?"

"असं कुठं म्हटलं मी ?"

"मुदतीनंतर तूं अब्बाजानना काय सांगणार ?"

"मौतच या मोहब्बतीपासिनं आमची सुटका करील असा खडखडीत जबाब मी देणार आहे त्यांना."

"अनार तुझी मोहबत सच्ची आहे." असं म्हणून सलीमनं तिचं चुंबन घेतलं.

"उशीर झाला फार सरकार."

"पुन्हा कधी येशील ?"

"तकदीरात असेल तर येईन. असा मोका पुन्हा येईल की नाही ते अल्लाला ठाऊक."

"असं नको बोलू अनार. अजूनहि काही अघटित घडेल अन अब्बाजानचं मतपरिवर्तन होईलहि."

"भलती आशा नका धरू सलीम."

अनारकलीनं त्याला प्रथमच नांवानं हाक मारली होती. त्यानं तो विरघळला. तेव्हा तो लागलीच त्याला बिलगली. दोन प्रणयी जीव प्रणयराधनेत मशगूल झाले. पहाट झाली अन् मग अनारकली सावध झाली. गडबडून ती बोलली—

"मला वाटतं अशा तऱ्हेची ही शेवटचीच भेट ठरेल सलीम."

एवढं ती बोलली. तिचे डोळे अश्रूंनी डबडबले होते. एकदा तिनं सलीमकडं भरलेल्या चेहऱ्याने पाहिलं अन् मग निर्धारानं ती आपल्या महालाकडे चालू लागली. सलीम तिच्या पाठमोऱ्या आकृतीकडं शून्य दृष्टीनं पहात बसला.

★ ★

अकबराच्या महालात सलीम उभा होता.

"बैस बेटा." अकबर ममतेनं बोलला.

"मला बोलायचंय थोडंसं."

"बोल."

"माझा विचार पक्का झालाय्."

"अनारकलीशी शादी करण्याचा ?"

"हो."

"मग मी काय करावं सलीम ?"

"आपण परवानगी द्यावी."

"नाही बाळ. मी या शादीला कधीहि संमती देणार नाही. माझाहि विचार ठरलाय. एका फकीराच्या कृपेने तू झालास म्हणून मी तुझं नांव सलीम ठेवलं. तुझ्या साऱ्या षौकांकडं मी दुर्लक्ष केलं. कारण तूं भावी बादशहा आहेस. त्याचं बक्षीस तू माझी अशी अब्रू घालवून देणार ? सलीम माझा हुकूम आहे की तूं उद्या स्वारीवर निघावंस. अनारकलीला पळवून नेण्याच्या भानगडीत तू पडू नकोस. त्यात यश नाही यायचं तुला. उद्या तूं फौजांसकट कूच केल्याची खबर माझ्या कानावर आली पाहिजे." एवढं बोलून अकबरानं शतपावलीला प्रारंभ केला.

सलीम काही उत्तर न देता निघाल्याचं पाहून पुन्हा अकबर बोलला,

"थांब बेटा. तुम्हा दोघांची शादी होती तरं माझ्याइतका आनंद कुणालाच नसता झाला. अनारकली तुला अनुरूप आहे. पण नियतीनं तिचं माझ्याशी जोडलेल नातं अगर संबंध म्हण तुमच्या शादीच्या आड येतंय. पोराच्या हट्टापायी अकबरानं आपल्या अब्रूला चूड लावली असा माझा बदलौकिक होऊ नये म्हणून तुमच्या शादीला माझा विरोध आहे. तुमच्या प्रेमात निमक घालण्यात मला खुषी थोडीच होतेय ! पण बादशहा म्हणून माझी काही कर्तव्य आहेत. ती पार पाडण्यासाठी तुमच्या मोहबतीचा इमला मला जमीनदोस्त करावा लागणार आहे." अकबराचा कंठ भरून आल्याचं पाहून सलीम हळूच तेथून सटकला.

अकबरानं पोशाख चढविला अन् मग तो अनारकलीच्या महालात आला. तो आल्याबरोबर तिला म्हणाला—

"मग ! काय ठरला तुझा विचार ?"

"मी मागंच जबाब दिलाय मालिक."

"त्यात बदल नाही."

"नाही."

"मग माझाहि फैसला ऐक. व्यक्तिशः तुमच्या शादीला माझा विरोध असण्याचं काय कारण ? पण तुझा माझा संबंध जगजाहीर असल्यानं तुमच्या शादीनं जग मला हसेल. बादशहा म्हणून माझी अब्रू मला अशी धुळीला मिळविण्याची इच्छा नाही. राज्यकर्ता या नात्यानं तुमच्या धर्मबाह्य शादीला मी मंजुरी कदापि देणार नाही. तुमच्या दोघांची मनं दुखावताना माझं दिल् फाटतंय, तुटतंय, पिळवटून निघतंय. पण बादशाहा म्हणून मला कठोर बनावंच लागतंय. ही घे मोहरांची पिशवी अन् देश सोडून जा. या पिशवीतलं धन तुला जिंदगीभर पुरेल. चाहेल त्याच्याशी शादी कर पण सलीमला विसर. एवढीच भीक हा अकबर बादशहा तुझ्याजवळ मागत आहे अनारकली."

"पैशानं प्रेम मिळत नसतं मालिक ! माझी मोहबत सलीमवरच आहे. इतर पुरुषांशी मला काही कर्तव्य नाही."

"मग मला तुला मौतची सजाच फर्मावावी लागेल."

"शहाजाद्यासाठी मी मौत जरूर पत्करेन सरकार."

"बरंय मग. आजपासून तुला मी अटकेत ठेवतो. अन आठव्या दिवशी तुला मौतची सजा मिळेल." एवढं बोलून अकबर तावातावानं निघून गेला.

★ ★

अनारकली कोठडीत गजाला धरून उभी होती अन् बाहेर सलीम तिचा निरोप घेण्यासाठी उभा होता.

"आपण आलात ! तेवढीच एक इच्छा होती. आता मी सुखानं अल्लाकडं जाईन."

"अनारकली हे काय झालं ग !" सलीम गदगदून बोलला.

"आपली शादी खुदाला मंजूर नाही सरकार."

"मला स्वारीवर जाण्याचा हुकूम मिळालाय् अन तू तर अखेरच्या




मुशाफरीला निघाली आहेस."

"तकदीरात तसंच लिहिलं आहे त्याला कोण काय करणार ?"

"अनार, मी हरलो. हतवल ठरलो. मी दुवळा ठरलो. मला तुझ्याशी शादी करता आली नाही. माफ कर मला."

"आपण काय करणार ? परिस्थितीच तशी अवघड आहे. माझ्याकडं जे होतं मी ते आपल्याला मन:पूतपणं दिलं. आपल्या प्रेमाची उवहि भरपूर अनुभवली. आता माझ्याजवळ आपल्याला देण्यासारखं दुसरं काही नाही म्हणून माझं दिल् तुटतंय सलीम. थांवा. हे घ्या अनारचे दाणे. आपल्याला मोहवतीची याद म्हणून ठेवा ते जवळ."

सलीमच्या डोळयांतून अश्रू ठिवकत होते. त्याला वोलवत नव्हतं. तेवढयात अनारकली वोलली—

"एक गोष्ट चाहते सलीम."

"चाहेल ते माग अनारकली."

"आपण परताल तेव्हा मी या दुनियेत नसेन. आपल्या मोहवतीची याद म्हणून माझ्या नांवाची संगमरवरी कवर वांधाल ? आपल्या मोहवतीची याद अलम दुनियेला रहावी म्हणून आपण ही कवर वांधावी. वस्स. एवढंच मला हवंय."

"तुझी इच्छा जरूर पुरी करीन अनार."

सलीमनं तिचा हात हातात घेऊन त्याचं चुंवन घेतलं अन् मग तो ताडकन् निघाला. अनारकली शुष्कपणे त्याच्याकडे पहात राहिली.

चिरा वांधला जात होता. अन् त्यातच अनारकलीला चिरविश्रांती मिळायची योजना ठरविण्यात आली होती.

सकाळीच अकवर कोठडीशी आला तेव्हा अनारकली क्षणभर गोंधळली. ती मुकीच राहिली. अकवर दु:खित मुद्रेनं वोलला—

"वेटी माफ कर मला. वेटी म्हटलं म्हणून दचकू नकोस. सलीमवर तुझी मोहवत जडल्याचं समजलं तेव्हाच तुला मुलीप्रमाणं मानू लागलो. पण दुनियेला ते पटलं नसतं. कर्तव्यापुढं माझा नाईलाज झाला अनारकली. खानदान सांभाळण्यासाठी अन् लोकपवादाची लाट थोपविण्यासाठी मला तुमच्या मोहवतीत निमक घालावं लागलं. पण त्यात माझी हार झाली वेटी. मोहवतीखातर तूं मौत पत्करलीस म्हणून तुझी जीत झाली. तुमची मोहवत दुनिया कधी विसरणार नाही. त्यावद्दल मला सारे दोष देतील. पण अल्ला मात्र दुवा देईल. पैशानं मोहवत मिळत नसते हे तूं मला दाखवून दिलंस. हिंदुस्थानचा वादशहा म्हणून नव्हे तर सलीमचा वाप म्हणून मी तुझ्याकडून माफी चाहतो वेटी. ती तूं केलीस की माझा दर्द थोडा हलका होईल. तूं रडू शकतेस. पण मला रडण्याचीहि आझादी नाही. कारण मी वादशहा आहे." एवढं वोलल्यावर अकवर थांवला. त्याचे डोळे पाणावले होते.

"माफी करणारी मी कोण अब्वाजान ? ती करणारा अल्ला. आपण आपलं कर्तव्य वजावलंत. मी आपल्याला फार तकलीफ दिली त्यावद्दल आपण मला माफ करा."

"वेटी तूं मला अब्वाजान म्हणून हाक मारलीस तेव्हाच मी सारं विसरलो. मोहवतीखातर मौत पत्करलीस म्हणून तुझी कहाणी तमाम दुनिया हमेशा उत्कंठतेनं अन् रसिकतेनं ऐकेल वेटी."

"मला तरी दुसरं काय हवंय आता."

पाणावलेल्या डोळयांनी अकवर सावकाशपणं दूर गेला. अनारकलीला त्याच्या अगतिकतेची जाण आली होती.

सलीम स्वारीवरून आला पण तेव्हा अनारकली चिरेवंदी झाली होती. . . .

काळाची पानं फडफडा उलटली अन् सलीम जहांगिर होऊन तख्तशीन झाला. त्यानं अनारकलीच्या चिऱ्यावर सुंदर संगमरवरी कवर वांधून आपला शब्द पाळला.

जहांगीर आपली वेगम नूरजहान हिजवरोवर फिरत असता नूरजहान वोलली—

"जहांपन्हां, ही कवर कुणाची ?"

"नूर, शादीच्या आधी या जहांगिरला एका परीनं जिंकलं होतं. तकदीरानं शादी होऊ दिली नाही. माझी हार झाली. ही कवर वांधून त्या मोहवतीत मला झालेली जखम मी आता भरून काढलीय."

"तिचं नांव जन्हांपन्हा ?"

"अनारकली म्हणत तिला. अनारच्या दाण्यांनी शरमून जावं अशी होती तिची सूरत. तूं विचारलंस म्हणून जखम पुन्हा वाहू लागली नूर. कवर वांधून तिची अखेरची शर्त मी पुरी करू शकलो याचं समाधान मी उपभोगतोय एवढंच !" एवढं वोलून त्यानं डोळे पुसले.

नूरजहानच्या सहवासात जहांगिरची जखम वरी झाली. पण त्याचे प्रीतीपात्र असलेली अनारकली त्रिखंडात अमर झाली. . . .

• • •

अहा,भा रत विराजे, वषं हे 'पयंटनीं' गाजे. . . . . . ५




शेवटी 'आमचे' खरे पर्यटन हे असेच !

अनुक्रमणिका

चारुदत्ताचा व्याप आता तर खूपच वाढला होता. त्याची देशांतरे अजून चालूच होती. कधी कधी तो एकएक महिना प्रवासास जात असे. पण वसुमतीस आता याची संवय होऊ लागली होती...




—सौ. विजया राजाध्यक्ष

चारुदत्त आणि वसुमती यांचा विवाह मुंबानगरीत मोठ्या थाटाने साजरा झाला. या विवाहास नगरीतील अनेक धनिक, वणिक आणि श्रेष्ठ पदाधिकारी आले होते. वसुमती ही अत्यंत सुस्वरूप असून तिच्या पित्याची एकुलती एक कन्या होती. विवाहप्रसंगी पित्याने जामातास बहुत संपत्ती दिली. कन्येस विवाहोत्तर काळातही सुख लाभावे यासाठी तिला ती वापरत असलेले 'फियाट' नांवाचे वाहन, नेपियन सी पथावरील एक भव्य निवासस्थान इत्यादि गोष्टी दिल्या. वसुमतीचा बालपणापासून प्रतिपाळ केलेली दासी लक्ष्मी हीही आता वसुमतीकडेच राहणार होती. चारुदत्त हा एका वस्त्रप्रावरणाचा व्यापारउदीम करणाऱ्या संस्थेतील उच्च अधिकारी होता. त्यास वारंवार फिरतीवर जावे लागे. परंतु विवाहानंतर एक मास तरी आपल्या भार्येसमवेत कालहरण करता यावे म्हणून त्याने एक मासाची रजा घेतली होती; त्याच्या श्रेष्ठीनेही, ती त्यास न कुरकुरता दिली होती.

चारुदत्ताने मधुचंद्रासाठी उटकमंड येथे जाण्याचे निश्चित केले होते. ही वार्ता वसुमतीस विदित होताच तिला बहुत हर्ष झाला. वसुमती ही अज्ञान असल्यामुळे तिचा पिता तिला कोठेही पाठवत नसे. त्यामुळे तिने दूरची नगरे पाहिली नव्हती. उटकमंड हे एक शीत हवेचे स्थळ असून ते फारच रम्य आहे असे तिला तिच्या एका सखीने सांगितले होते. म्हणूनच तेथे जाण्यास वसुमती फारच उत्सुक होती.

विवाहाच्या पहिल्या रात्री चारुदत्त आपल्या धर्मपत्नीस म्हणता झाला, "प्रिये, उदईक आपण उटकमंडच्या सफरीसाठी निघावयाचे आहे, ही वार्ता तुझ्या कानी आली आहे ना?"

वसुमती लज्जाकंपित स्वरात उत्तरली, "होय नाथ. आणि मी या सफरीची उत्सुकतेने प्रतीक्षा करत आहे. मागे एकदा मी माझ्या मातापित्यांसमवेत बेळगांवी गेले होते. पण दक्षिणेस त्यापुढे असलेले प्रांत मला अज्ञात आहेत. आपण आगगाडीनेच प्रवास करायचा ना? मी आत्तापर्यंत केलेला प्रवास स्वतःच्या वाहनातूनच केलेला आहे. आगगाडीने प्रवास करावयासही माझे अंतःकरण फारच उत्सुक आहे."

"तर मग तुझ्या इच्छेप्रमाणेच होईल."

"नाथ, आपण आत्तापर्यंत पुष्कळच देश पाहिले असतील ना?"

यावर तो तरुण अधिकारी हसून म्हणतो,

"वारंवार देशांतर करणे हा तर आमच्या पेशाचाच एक भाग आहे. मला दर महिन्यातून तीनचारदा तरी दूरदूरच्या देशी जावे लागते. आणि बहुतेक वेळा मी आकाशयानातूनच जातो. आमच्या संस्थेशी माझा तसा करारच आहे."

आपल्या पतीच्या तोंडचे हे उद्गार ऐकून वसुमतीचा चेहरा जरा म्लान दिसू लागला. तिच्या नीलमण्याप्रमाणे चमकणाऱ्या नेत्रांकडे पाहून आता ही थोड्याच वेळात अश्रुसिंचन करणार की काय असे वाटू लागते.

तेव्हा, 'आता एक मासभर तरी मी तुझ्या सन्निधच आहे ना? मग असा त्रास कां बरे करून घेतेस?"—अशा शब्दात चारुदत्ताने तिचे सांत्वन केले; आणि तिला प्रेमभराने आलिंगन दिले.

★ ★

उटकमंड मुक्कामी वसुमती फारच आनंदात होती. आपण आजवर जसा वर प्राप्त व्हावा अशी मनोभावे प्रार्थना केली होती तसाच वर आपल्याला मिळाला आहे याबद्दल तिची खात्री होऊन चुकली. चारुदत्त वसुमतीचे परोपरीने लाड करीत असे. त्याने तिला बहुमोल वस्त्रे घेऊन दिली होती. आपल्या मातेसाठी, भगिनीसाठी व सख्यांसाठीही काही न्यावे अशी इच्छा वसुमतीने प्रदर्शित केल्यावरून त्याने त्यांच्यासाठीही विपुल खरेदी केली. त्याचा तो षोकच होता. कोणत्याही दुकानात शिरल्यावर काय घेऊ व काय नको असे त्यास होऊन जाई.

मग त्याला थोपविण्यासाठी वसुमतीने लटक्या रागाने म्हणावे, "पुरे बरे. दुकान का लुटून न्यायचे आहे?"

यावर त्याने हसून उत्तर द्यावे, "इतक्या वर्षांचा षोक एकदम कसा जाणार? देशांतराला गेले की काही ना काही घेऊन यायचे हा माझा परिपाठच आहे. आता तर मी सगळे माझ्या संसारासाठी, माझ्या पत्नीसाठी आणि माझ्या परिवारासाठी 'आणणार'.

—हे ऐकून वसुमतीने लज्जेने चूर व्हावे








—असा परस्परांचा अनुनय करण्यात, हास्यविनोदात दिवस भराभर निघून गेले आणि एका सकाळी खिन्न मनाने वसुमती मुंबानगरीत पोचली. चारुदत्त दोनच दिवसांनी कलकत्त्याला जाण्यासाठी निघणार होता. या भावी विरहाच्या कल्पनेने तिचे अंतःकरणास वेदना होत होत्या. याच्या अनुपस्थितीत आपले कसे होणार? आपल्याला असे एकटे राहण्याची संवय नाही, या शहरात आपला कोणाशी परिचयही नाही. अशा परिस्थितीत कालहरण कसे करावयाचे?—इत्यादी विचार तिच्या मनात पुन्हापुन्हा येऊ लागले.

अखेर चारुदत्ताच्या प्रयाणाचा दिवस येऊन ठेपला. त्याला निरोप देण्याच्या वेळी वसुमतीला अश्रु आवरेनात. ती भावनावेगाने म्हणाली, "आता मी एकटी कशी राहू?"

यावर चारुदत्त म्हणाला, "असे करून कसे चालेल बरे? आता हा प्रसंग वारंवार येणार! एकटीने कालक्रमणा करण्याची संवय लावून घेतलीच पाहिजे.... आणि आता अश्रु आवर पाहू. मी आठच दिवसांनी परत येणार आहे ना?"

असे म्हणून चारुदत्ताने वसुमतीचे चुंबन घेतले व तो निघून गेला. वसुमती उदास होत्साती त्याच्या पाठमोऱ्या आकृतीकडे गवाक्षातून पाहात राहिली.

सायंसमय होता. सर्वत्र अंधारून आले होते. थोडी पर्जन्यवृष्टीही होत होती. वसुमतीच्या दुःखात सहभागी होण्यासाठी निसर्गही जणू काही अश्रुसिंचन करीत होता. वसुमती सौधावर एकटीच बसली होती.

भोजनाची वेळ टळून गेली तरीही आपली मालकीण भोजनगृहात आली नाही हे पाहून तिची दासी लक्ष्मी वर आली व तिला म्हणाली, "बाईसाहेब, भोजनाची सिद्धता आहे. येता ना?"

"गडे लक्ष्मी, मला आज अन्नग्रहणाची इच्छा होत नाही. वासनाच उडाल्यासारखे झाले आहे."

"बाईसाहेब, असे कां बरे बोलता? आपण काही खाल्ल्याशिवाय मीही अन्नाचे सेवन करणार नाही."

"लक्ष्मी, तुला ठाऊकच आहे की मला एकटे राहण्याची संवय नाही. आणि आता तर माझ्या नशिबी तेच ठेवले आहे. विवाहानंतर पुरे दोन महिने सुद्धा मला माझ्या पतीचा सहवास लाभला नाही, मी एकटी काय करू?" असे म्हणून वसुमती लक्ष्मीच्या खांद्यावर मान टाकून स्फुंदू लागली.

लक्ष्मीलाही हुंदका आवरेना. ती म्हणाली, "बाईसाहेब, तुम्ही अशा दुःखी राहिलात तर मोठ्या बाईसाहेबांना काय बरे वाटेल?—त्यांच्यासाठी तरी दुःख आवरा, उद्यापासून फिरायला जा. घराची काळजी करू नका. मी आहेच. इतर नोकर चाकरही आहेत. ईश्वरकृपेने तुम्हाला उदंड मिळाले आहे. असे असूनही तुम्ही दुःखी कां बरे राहता?"

"उद्यापासून फिरायला जा म्हणतेस. पण कोठे जाऊ?—तूच सांग बरे".

हे ऐकताच काहीतरी आठवल्यासारखे करून लक्ष्मी म्हणाली, "बाईसाहेब, तुमची सखी सुनंदा येथेच असते ना? तुम्हाला तिची जी पत्रे येत ती येथूनच, असे मला आठवते."

"खरेच." वसुमती आनंदून म्हणाली. "मग तिच्या भेटीस कां जात नाही?"





अनुक्रमणिका

"कल्पना छान आहे. आताच दूर-ध्वनीपुस्तिकेतून तिचा पत्ता काढते. साठे हे तिचे विवाहोत्तर उपनांव."

—दुसरे दिवशी वसुमती सुनंदाच्या भेटीस गेली. तिला पाहून सुनंदाला फार आनंद झाला. दोनतीन तास विविध विषयांवर संभाषण करण्यात आनंदाने गेले. पण सुनंदाकडे याहून अधिक कसे राहता आले असते?—अखेर वसुमतीला पती नसलेल्या त्या रिकाम्या घरात परत यावेच लागले. आणि ती फिरून उदास झाली.

—असे आठ दिवस निघून गेले. नववे दिवशी चारुदत्त परत आला. त्याने वसुमतीला एकांतात विचारले, "प्रिये, तू आनंदात होतीस ना?"

यावर काहीही उत्तर न देता वसुमती स्फुंदू लागली.

"हे काय? याचा अर्थ काय समजू?" त्याने आश्चर्यचकित होऊन विचारले.

"नाथ, पुन्हा असे जाऊ नका. मला येथे एकटे जीवन कंठणे अशक्य होते."

"त्याला काय करणार, वसुमती? माझा पेशाच असा आहे. आणि विवाहापूर्वीच तुझ्या मातापित्यांना मी याची कल्पना दिलेली होती."

"रागावू नका—पण या अनोळखी शहरात मी एकटी काय करू?—तुम्हीच सांगा."

"हळूहळू संवय कर, ओळखी करून घे. वेगवेगळ्या कार्यक्रमांना जात जा. आपल्याकडे इतरांना बोलवत जा."

"तुम्ही येथे नसताना?"

"त्यात काय झाले? फिरायचे ते पतिसमवेतच, हा पुराणांतरीचा नीतिनियम या आधुनिक काळात विसर. तुझ्यासारखा प्रसंग किती एक स्त्रियांवर येतो. त्या काय बरे करतात?"

—आपला पति संतप्त झाला आहे हे पाहून वसुमती पुढे काही बोलली नाही. त्याला हा विषय रुचत नाही हे तिला ठाऊक झाले. पण तरीहि त्याने सुचवल्याप्रमाणे वर्तणुक करण्यास तिचे मन धजेना.

ती सुशिक्षित होती. पण मिश्र समाजात वावरण्याची, परपुरुषांची बोलण्याची तिला संवय नव्हती. ती स्वभावत:च शालीन होती. तिला पतीचे सांगणे कसे रुचावे? पण खूप विचार करून, यातून काहीतरी तोड काढलीच पाहिजे असे तिने ठरवले.

* * *

दिवस वेगाने पुढे जात होते. वसुमती व चारुदत्त यांच्या विवाहास आता दोन वर्षे उलटली होती. दरम्यानच्या काळात त्यांना एका पुत्ररत्नाचीही प्राप्ती झालेली होती. चारुदत्ताची देशांतरे अजून चालूच होती. आता तर त्याच्या कार्याचा व्याप खूपच वाढला होता. कधीकधी तो एक-एक महिना प्रवासास जात असे. पण वसुमतीस आता याची संवय होऊ लागली होती. अजूनही चारुदत्ताच्या अनुपस्थितीत तिला खिन्न वाटे, पण पूर्वीप्रमाणे हे विरहाचे दिवस कधी बरे संपतील, असे होत नसे. हे साहजिकच होय. सुरवातीला न रुचणाऱ्या गोष्टीची हळूहळू संवय होणे हा निसर्गक्रमच आहे. याला एकटी वसुमती अपवाद कशी असेल? तिला एकटे राहण्याची संवय कशी लागली हे आता पाहू: काहीतरी तोड काढण्याचे तिने ठरवल्याचे पूर्वी सांगितलेच आहे. यासंबंधी ती विचार करीत बसली असता तिच्या पतीचा मित्र तेथे आला.

'या'—असे म्हणून त्याचे तिने स्वागत केले.

त्या उभयतांचे कुशल पुसल्यानंतर तो म्हणाला, "चारुदत्त शनिवारपर्यंत परत येणार आहे का?"

"नाही" वसुमती उत्तरली.

"हे मी एवढ्यासाठी विचारत आहे की शनिवारी मी माझ्या घरी एक मोठा भोजन समारंभ योजला आहे. त्याला तुम्ही उभयतानी यावे अशी माझी फार इच्छा आहे."

"पण ते येथे नाहीत."

"मग तुम्ही या. काय हरकत आहे?"

'पाहीन'. असे वसुमतीने त्यास आश्वा-

सून दिले. शनिवारची रात्र उजाडली. भोजन समारंभाला जावे की नाही यासंबंधी वसुमतीचा निश्चय होत नव्हता. पण अखेर तिने जावयाचे ठरविले. जाते-समयी तिने उत्तम वेषभूषा केली. नाना-विध अलंकार घातले. सर्वांगास मादक अत्तर लावले. डाळिंबी रंगाची ओष्ठ-शलाका फिरविल्यामुळे तिच्या ओष्ठद्वयांना मनोहर रंग आला होता. तिची कांतीही मोठी सुंदर दिसत होती.

अशा वसुमतीने भोजन समारंभ प्रसंगी सर्वांचे लक्ष आपल्याकडे वेधून घेतले यात नवल नाही. वरीष्ठ स्त्री-पुरुष तेथे जमा झाले होते. त्यांच्या सहवा-सात वसुमतीचे मन चांगलेच रमले. या मेळाव्यातील एकदोन स्त्रिया वसुमती-प्रमाणेच एकटया आलेल्या होत्या. चौकशी-अंती तिला समजले की त्यांच्या पती-नाही फिरतीची नोकरी असून, असे एकटे राहण्याचा प्रसंग त्यांचेवर वारंवार येतो.

"मग तुम्ही काय करता?" वसुमतीने उत्सुकतेने विचारले. त्यांच्याकडून या मुंबानगरीत कालहरण कसे करावे यासं-बंधी तिला समजले. वसुमती खूप झाली. यापैकी काही मार्गांबद्दल तिने पूर्वी ऐकले होतेच.

तिच्या पतीने प्रवासाहून परत आल्या-वर विचारले, "वसुमती, तू या चार दिव-सात काय केलेस?"

"मी आपल्या मित्राकडे भोजनास गेले होते." आणि चारुदत्ताच्या मुखावर नाराजी उमटत आहे हे पाहून ती पुढे म्हणाली, "फारच आग्रह झाला म्हणून गेले. पण नाथ, आपण नसल्यामुळे मला फारच चुकल्यासारखे वाटत होते. कोणाशी कसे वागावे हे समजले नाही. बराच वेळ मी गप्पच होते." हे ऐकून चारुदत्ताला संतोष झाला हे चतुर वसु-मतीने ओळखले आणि लक्षात ठेवले.

असे होता होता वसुमती व चारुदत्त यांच्या विवाहाली पांच वर्षे होऊन गेली. त्या दोघांस एक कन्यारत्नही झाले. ही दोन्ही अपत्ये अत्यंत सद्गुणी होती. त्यांचे प्रतिपालन करण्यासाठी दोन वेगवेगळया दाया ठेवल्या होत्या. इतर कामे करण्या-साठी घरात असंख्य चाकर होते. चारु-दत्ताच्या वैभवात प्रतिक्षणी भर पडत होती. आता त्याला मोठा हुद्दा मिळालेला होता. जबाबदारीही वाढली होती. त्यामुळे त्यास परदेशगमनही करावे लागे. कधी इंग्लंड, कधी इटली असे वेगवेगळे देश तो पादा-क्रांत करीत असे. महिन्यातून चार सहा दिवसच तो घरी असे. पण आता वसु-मतीला त्याचे दुःख वाटत नसे. इतकेच नव्हे तर पूर्वी त्याच्या विरहाने आपण व्याकूळ कशा होत असू, त्याची कशी प्रतीक्षा करीत असू इत्यादी गोष्टींचे स्मरण झाले की तिला हसू येत असे. आता चारुदत्त आज परतणार हे फार तर त्याच दिवशी तिच्या लक्षात येई. एकदा दिवाण-खान्यात काही मंडळींशी गप्पा मारत बसली असता तिला चारुदत्त आजच्या विमानाने परत येणार हे आठवल्यावरून तिने आपल्या वाहकास आकाशयानतळा-वर जाण्याची अनुज्ञा केली.

'आपण का जात नाही?' कोणीतरी पृच्छा केली.

"कधी कधी जातेही. पण विमान फार रात्री येणार असले तर नाही जात. आता हे नेहमीचेच झाले आहे." वसुमती उत्तरली.

चारुदत्ताने रात्री-अपरात्री विलायते-हून परतावे आणि तो आल्याचे ज्ञान वसुमतीस दुसरे दिवशी व्हावे असेही घडत असे.

चारुदत्त आला की तिचे दिवस वांद-लीचे जात. इकडे जाऊ तिकडे जाऊ, असे त्याचे एकसारखे चाललेले असे. घरातही तो असला की माणसांचा राबता असे. मद्यपान व भोजन यांचा समारंभ होई. चाकर असले तरी वसु-मतीला जातीने लक्ष द्यावे लागे त्यामुळे ती फारच कंटाळून जात असे. आता तिला एकटीला बाहेर जाण्याची चटक लागली



अनुक्रमणिका

होती. ती ठिकठिकाणी फिरत असे. वस्त्रालये, चित्रांची प्रदर्शने होत अशा जागा, सिनेमागृहे, नाटचगृहे—सर्व काही तिला ठाऊक झाले होते. आपल्या वाहनाने ती कोटामधून एक तरी चक्कर मारी. नाटक, संगीत—श्रवण असे नाना कार्यक्रम असत. हे सगळे चारुदत्त असल्यानंतर साहजिकच बंद पडे. त्यामुळे त्यांच्या उपस्थितीला वसुमतीने कंटाळावे यात नवल नाही.

तो गेला की मात्र वसुमतीने सुटकेचा निःश्वास टाकावा. स्नेहीमंडळींना बोलवावे. 'हे कालच गेले. मला फारच एकटे वाटते' असे काही काही म्हणावे. त्याने आणलेल्या बहुमोल वस्तू दाखवाव्या व मंडळींकडून कौतुक करून घ्यावं. आता वसुमतीचा तोच विरंगुळा होता. चारुदत्तास उत्तमोत्तम वस्तू आणण्याचा षौक होता हे वाचकांस पूर्वी सांगितलेच आहे. दर खेपेला नव्यानव्या वस्तू गोळा होत. आणि त्यानिशी आपले घर सजविण्यात वसुमती रमून जाई. वसुमतीचे घर फारच सुसज्ज होते. त्यासाठी तिच्या सख्या तिचा हेवा करीत. एकदा तर एका कोणत्या तरी आंग्ल मासिकात तिच्या घराचे एक छायाचित्रही आले होते. अशी वसुमतीची प्रतिष्ठा दिवसेंदिवस वाढत होती. वसुमती व तिचे घर हा जनसंमर्दात एक कौतुकाचा विषय होता. याची वसुमतीला जाणीव असून तिला त्याचा फारच अभिमान वाटत असे.

एकदा ती संगीतश्रवणाच्या कार्यक्रमास गेली असता तिच्याभोवती पुष्कळ स्त्रिया गोळा झाल्या.

"गडे, तुझ्या अंगावरील हे वस्त्र किती तलम आहे, याचा रंग किती सुंदर आहे." असे त्या वस्त्राचे कौतुक करू लागल्या.

"हे माझ्या पतींनी एडनहून आणले आहे." वसुमतीने अभिमानाने सांगितले. इतर स्त्रियांचे पति हे एडनला जाण्याची शक्यता नसल्यामुळे त्या साहजिकच खट्टू झाल्या.

एकदा असाच वसुमतीच्या सुडौल बांध्याचा विषय निघाला. त्याचे रहस्य जाणून घेण्यास स्त्रिया उत्सुक होत्या. "तुम्ही 'मेडनफॉर्म' नांवाच्या काचोळ्या वापरता काय" कोणीतरी धीर करून विचारले (स्त्रिया एकांतात असे चावट बोलतात हे आम्ही आमच्या चाणाक्ष वाचकांस सांगावयास नकोच.)

वसुमतीने तिच्या अज्ञानाची कीव करीत सांगितले, "या काचोळ्या विशेष प्रकारच्या आहेत. त्या अमेरिकेला मिळतात, आणि एका काचोळीची किंमत पांच डॉलर असते." यावर इतर स्त्रिया काय बोलणार? त्याही श्रीमान होत्या. पण एका क्षुद्र काचोळीसाठी पाच डॉलर खर्च करणे हे सर्वांनाच परवडते असे नाही. ती काचोळी आणण्यासाठी अमेरिकेत जावे लागते हे आणखी वेगळेच.



अहा, भारत विराजे, वर्ष हे 'पर्यटनी' गाजे... ६

वसुमतीच्या घरी उत्तम प्रकारचे विलायती खाद्यपदार्थ असत, उंची मद्ये असत. तिच्याकडे असलेली शीतपेटीही तिकडूनच आणलेली, विशेष प्रकारची अशी होती. तिच्याकडील काचसामानही प्रेक्षणीय होते. पण उत्तमोत्तम वस्तु संग्रही असूनही वसुमतीची हाव दिवसेंदिवस वाढतच होती. यासाठीच पतीची तिने उत्सुकतेने वाट पाहावी. त्याने आणलेल्या वस्तूंवर अधाशीपणाने झडप घालावी. त्यांचे परोपरीने कौतुक करावे, इतरांकडून करून घ्यावे. आणि चारुदत्त गेल्यावर आता पुढच्या खेपेच्या सफरीवरून तो कोणत्या नव्या वस्तु आणतो याचा विचार करत राहावा—त्यातच चूर व्हावे.

इकडे चारुदत्तानेही तेच करावे. नाना देशात फिरावे. . .आणि आपल्या भार्येस खूष करण्यास येताना कितीएक प्रकारची चीजवस्तू गोळा करावी.....

या आयुष्यक्रमाची दोघासही आता चांगलीच संवय झाली होती. एकदा तर विशेष काही काम नसल्यामुळे आपला पति तीन महिने कोठेही जाणार नाही हे वसुमतीस समजले. तेव्हा ती दूरध्वनी यंत्रावरून आपल्या सखीस म्हणाली, "आता माझे दिवस घांदलीत जाणार, गडे. एकटे बाहेर पडता येणारच नाही..."

आपला पती मात्र लौकरच फिरतीवर जाणार असल्याचे तिच्या सखीने दुसऱ्या टोकाकडून सांगितले असावे. कारण वसुमती लगेच उद्गारली, "चैन आहे तुझी!"

☆ ☆

वाचकहो, यात बिचाऱ्या वसुमतीस दोष देण्यात काय बरे अर्थ? प्रत्येकाने आपापल्या सुखाची विवंचना करावी हा मनुष्यस्वभावच होय. पूर्वी आपल्या पतीचा सहवास हे वसुमतीचे सुख होते. आता त्याच्या सफरी हे तिचे सुख झाले. पण या अथांग जगात असे चमत्कार घडणारच. ते घडविणाऱ्या जगन्नियंत्याच्या पायी विस्मित होऊसाने लीन होणे यापलीकडे आपणा पामरांच्या हाती काय आहे?

अनुक्रमणिका

सुशीला नाडकर्णी ऑफिस सुपरिंटेंडंट आहेत. साध्या टायपिस्टच्या जागेपासून त्यांनी आपली प्रगती चिकाटीच्या प्रयत्नांनी केली. त्या म्हणतात, "मी माझ्या कामात संपूर्ण लक्ष घालते. कारण मला घरची काळजी नाही. आमच्या तिन्ही मुलांचे संगोपन, शिक्षण वगैरे सर्व गोष्टींची तरतूद मी व माझ्या पतींनी केली आहे. तिसरे मूल झाल्यावर अधिक मुले



न होऊं देण्याचें आम्ही ठरविले. अन् आता आम्ही सुखी आहोत."

## सुशीला नाडकर्णी सुखी आहेत–

## तशाच तुम्हीही?






अनुक्रमणिका






—कान्त

**कलेला प्रेमाचा**
**छेद देणाऱ्या**
**कलावंताच्या**
**जीवनावरील**
**बेभान**
**बेधुंद**
**नाट्यकाव्य**





*राणी माणकावतीचा लेण्यातील भव्य रंगमहाल, आणि त्यातला शृंगारलेला, पावसाळी रात्रीत उजळलेला सुंदर सभामंडप !*
*त्या मंडपातून, एका बाजूस उभा असलेला भव्य दगडी जयस्तंभ आकाशाला टेकलेला दिसत आहे. त्यावर उत्तर-रात्रीचे मृगनक्षत्र विसव्यासाठी थांबले आहे, आणि महालात स्फटिकाच्या पात्रात काजव्याचे दिवे जळत आहेत. त्या दिव्याच्या मंद हिरव्या प्रकाशात दुमार आणि राणी माणकावती सारीपाट खेळत बसली आहेत.*

**दुमार**—आंता महाराणी, जपून दान टाका
या काजव्याच्या सरत्या दिव्याच्या हिरव्या प्रकाशात
बिचारे काजवे !
प्राणांचे दिवे जाळितो आम्ही
क्रीडाविलासाच्या प्रकाश सुखाच्या एका क्षणासाठी
**माणकावती**—अहो वृद्ध भिक्षु, पुरे, आधी खेळा
हातातला डाव,
दुमार, मला फार आवडतात
या काजव्यांचे धपापते दिवे
गूढ ओल्या निळ्या कर्दळीच्या पावसाळ्या रात्रीत
**दु.**—मृत्यूचेही क्षण उजळून टाकतात
काजवे आपल्या बेभान धुंदीत
सूर्यही जिथे हरवून बसतो आपला प्रकाश
अस्ताच्या वेळी.
**मा.**—काजव्याचे व्हावेत
असेच आपलेही मरणाचे क्षण
दुमार, तुला नाही असे वाटत?
परंतु, कसले मत्यूचे विचार भलत्याच वेळी
डोळ्यातली धुंदी, प्याल्यातली मस्ती उडवून टाकणारे
टाकले मी दान; आधी खेळा पाहू
**दु.**— पहा पहा राणी,
उजळते मरण क्रीडेच्या काठावर
झळकतात कसे काजव्यांचे पुंज
शुभ्र स्तनाकार स्फटिकाच्या पात्रात
अप्सरांच्या गोऱ्या गोऱ्या मुठीतील चंद्रमण्यांसारखे
**मा.**—चंद्रमण्यांसारखे!
छे, दुमार, जळत आहेत ते
ठिणग्यासारखे पेटत्या कमळांच्या
रक्तातल्या माझ्या !
**दु.**— विझवा त्या ठिणग्या रक्तातल्या रक्तात

अन् महाराणी, आधी दान द्या
काजव्याचे दीप विझण्यापूर्वी
वाचवा ही नरद, कटीवर बसवा
दान काय पडलं?
**मा.**–कुठलं दान दुमार?
एकाद्या हाताला दानच पडत नाही
पिकलेली नरद माझी जुगत नाही
पहा किती पडले? अवघे दोन
पंच प्राणांच्या कवड्या करून!
**दु.**– चिडू नका राणी,
बेभरोशाचा पट चौसरचा दैवाच्या घाम्यांचा
आता मला पहा, दोन दहा अन् पडला सहा
दुसऱ्या 'पौ'ने ही पहा, मेली तुमची नरद
**मा.**–मोठी भाग्यवान ती! मेलेली नरद
तेवढे भाग्य कपाळी या नाही
असे मरण्याचे तुमच्या हातून
पण सांभाळा, शेवटी हरतो आधी जिंकणारा!
**दु.**– जन्म-मरणाची कशाला ही भाषा
या सारीपाटात? बिचारी नरद
पहाते वाट तुमच्या हातींच्या उदार दानाची
टेकले पहा जयस्तंभावर मृगाचे नक्षत्र
धावून धावून
स्तिमित होऊन
व्याघ उभा आहे विसरून शरसंधान
घवघव्यालाही गुंगी आली आहे
मलाही जाण्याची घाई झाली आहे
**मा.**–दुमार, तुला सदाचीच घाई
कधी मांडण्याची, कधी मोडण्याची
तुला कधी घाई नसते रे कशाची?
**दु.**– अगदी खरं, पण——
म्हणूनच पूर्ण हा कैलास झाला ना?
म्हणूनच तुझा प्राण वांचला ना ?
**मा.**–वांचवले प्राण आता कां घेतोस?
कारे छळतोस दुमार असा?
मी देखील का पाषाणच आहे
एलापूरच्या या काळ्या डोंगराचा ?
नाही,——पण त्या पाषाणावरही
दुमार तुझं फार प्रेम आहे!
मिळाला असता त्याचा एखादा कण मला तर!
**दु.**– खरंच राणी, अधिक प्रेम करतो–प्राणापेक्षाही
आम्ही मूर्तिकार पाषाणावर——
पण तसा पाषाण नसतो तो——
त्याच्यात असते सौंदर्याची मूर्ति
ईश्वराची कीर्ति
अंतरीची पूर्ति
अनंताची शक्ति
केवळ कलेची–छेद देणारी स्थलकालाला
अवघ्या सांताला!
तिच्यावर जडतो आमचा जीव
**मा.**–जडावावर जीव तुझा जडत नाही
जडतो पाषाणावर
पायरवटाला खरंच कशाची रत्नाची पारख ?
अहिल्या दिसते निष्प्रेम वनी एखाद्या रामाला
एखाद्या शिलेत उपेक्षिलेल्या.
**दु.**– असतीस अहिल्या तर, दिसलीही असतीस
मला अंधारात दाट उपेक्षेच्या
चंद्रकिरणाच्या अरुवार छिन्नीने
मुक्तही तुला केले असते मी
शिलेच्या जड कवचामधून
परंतु जसा मी राम नाही
नाहीस अहिल्या त्रेतायुगाची तूही तशी
माणकावती, तू महाराणी
राजाधिराज परमभट्टारक दंतिदुर्गाची
पृथ्वीवल्लभाची
सेऊण देशाची तू राजलक्ष्मी!
**मा.**–वा! वा! खरंच, बरंच कळतं
दगडात रमणाऱ्या पाषाणवर्म्याला
पृथ्वीवल्लभ गेले स्वर्गलोकी
देशी विराजत आता श्रीवल्लभ कृष्णदेवराय
त्यांची मी वहिनी, राजश्री त्यांच्या प्रौढप्रतापाची
माणकावती मी–
आणि दुमार, नेमिले तुम्हास मीच, कैलासाच्या
माणकेश्वराच्या शिल्पमंदिराच्या निर्मितीसाठी
**दु.**– त्याची आठवण आता या दासाला
करून देण्याचे कारण नाही काही महाराणी,
संपूर्ण झाले ते शिल्पमंदीर
आणखी आपल्या श्रीचरणांशी रुजू केली आहे
विनंती माझी सेवामुक्तीची
पण ती प्रार्थना होत नाही मान्य अजून श्रीदेवींना
**मा.**–कशी मान्य होईल?
अपूर्ण आहे मंदिराचे शिल्प
**दु.**– आता शिल्पकाम माणकेश्वराचे उरलेले नाही
अनुज्ञा राणीची तरी मिळत नाही
निघून गेलो शेवटी वैतागून
सैनिकांच्या हाती पुन्हा धरून आणलंत
जुलमानं चौसर खेळायला बसवलंत,



अनुक्रमणिका

तुला वाचवलं
संपवलं तुझं प्रायोपवेशन ते मरणान्त
प्रतिज्ञा तुझी पूर्ण करून
एका रात्रीत कळस कोरून
माणकेश्वराच्या शिल्पमंदिराचा! —
मुस्क्या बांधून धरून आणलंस
त्यालाच एखाद्या चोर-वधिकासारखं
का हा अपमान? विटंबना का ही?
तुझ्या उदार प्राणदात्याची, एका महान कलावंताची ?
ब्रह्मदेवानं जिथं नमावं
काळानंही वाकावं जिथं शस्त्र टाकून
अशाश्वताला आम्ही शाश्वताचं वरदान देतो
सुगंध देतो अश्रूलाही, विझवून आग
कलाकैवल्याच्या प्रसादचंद्राच्या चांदण्यानं आम्ही!

मा.—अरे, म्हणून तर तुझ्यावरून
प्राण ओवाळून टाकले आहेत
उतरून टाकीन लिंबलोणही साऱ्या ब्रह्मांडाचा
जिवीच्या माझ्या जिवलगावरून
खरंच रागावलास? धरून आणलं म्हणून?
काय करू? करमत नाही
धरवत नाही प्राण मला तुझ्याशिवाय
दुमार, माझं मन कळत नाही अजून?
दिलेले तुझे हे प्राणाचे दान
तुझ्यावाचून कुणाला वाहू मी?
ये माझ्या राजसा, फार जागले आहे
फार थकले आहे, भटकून भटकून
त्वचेच्या रानांत कामनांच्या रात्री
जवळ घे मला
भेदून, भेदून देहाला शेवटी तुझ्या आलिंगनात
विसावू दे मला
खुडून घे माझे हे फुललेले फूल देहाच्या देठीचे !

दु.— नाही महाराणी, शक्य नाही ते
भलते बोलून भलतेच मागून
कलेसाठी माझे घेतलेले व्रत
असे भंगून टाकू नकोस.

मा.—नको रे होऊस निष्ठुर असा
दगड का बनलास, दगडात राहून
माझ्या देवा?

दु.— दगड असतो तर बरं झालं असतं
झालो असतो देव
किंवा गेलो असतो, फुटून चुरा होऊन
एकाच घावाने !

मा.—नको ग बाई, मी काही राया, तशी दगड नाही
पण खरं सांग,
अपारदर्शी कसा रे असा तू.
सह्याद्रीच्या निष्ठुर काळ्या पाषाणासारखा !
कोण आहे तुझ्या या काळ्या मनात—
काळ्या जळातल्या गाण्यासारखं?
आषाढ घनांच्या स्वप्नासारखं?

दु.— खरंच सांगतो शपथ घेऊन गंगाधराची
शिव धूर्जटीची—

मा.—नको, नको, त्याची शपथ नको घेऊ
महेश्वराच्या त्या धूर्जटीच्या जटेतच गंगा लपलेली आहे
तिरप्या नेत्रांची कमळे फुलवीत
मला त्याची शपथ मुळीच नको
घे, माझी—माझ्या—गळ्याची शप्पथ

दु.— खरंच, तुझ्या गळ्याची शपथ
तसे माझ्या मनात
कुणीही नाही—तिरप्या डोळ्यांच्या कमळासारखं
कमळातल्या काळ्या भ्रमरासारखं !

मा.—कुणी नाही? खोटं! माझी मूर्ति आहे
तुझ्या नकाराच्या पाकळ्यात लपलेली!

दु.— नाही, नाही राणी, त्रिवार नाही
कितीदा सांगू मी?
एवढा डोंगर कोरून अजून राहिले आहे
माझे हृदय शून्य, निराकृति, थंड पाषाणाचे
कुठे रेघ नाही, कुठे तडा नाही

मा.—अगदी खरं? मग सांगा पाहू लक्ष्मीची मूर्ति
सलज्ज, आतुर विरघळण्यासाठी विष्णूच्या बाहूंत
कुणासारखी कोरलीत?

दु.— लक्ष्मीदेवीसारखी,
कमळामधून अवतरणाऱ्या
सूर्याच्या नेत्रांत विलीन होणाऱ्या कमलेसारखी!

मा.—आणि ती पार्वती?
कमलवनाच्या पाणभुईवरून
हातानं धरून श्री शंकराला
ती आणीत आहे
चालताना स्वतःच हरवून जात आहे, उभी राहात आ
एक शिलाबद्ध कमल होऊन कमलवनात !
संभ्रमाचं फूल अशी ती पार्वती
शिल्पिलीत कशी? कोणावरून?
कुठं पाहिलीत अशी लज्जावती ?

दु.— पाहिली मी माझ्या कलासमाधीत !
कमळांच्या पद्मात उभी ती अपर्णा
"देवं भूत्वा देवं यजेत्"
योगच आहे तो कलाकाराचा !

प्रत्यक्ष दिसते ती कलावस्तु
आम्हाला आमच्या सांवलीसारखी—
*इंद्रवज्रेसारखी!
सूर्याच्या प्रभेने रंगलेल्या धुक्यात
इंद्रधनुष्याच्या त्या ध्यानभूमीत.

मा.—अहो, योगीराज त्या ध्यानभूमीत
बिंबली नाही कधी माझी छाया?

दु.— तुझी मूर्ति राणी, कधीच नाही आली
हिरण्यगर्भ त्या ध्यानभूमीत माझ्या कलेच्या

मा.—फार फार तुम्ही दुष्ट आहात दुमार,
तुमच्या कलेच्या त्या ध्यानभूमीत
तुमच्या हृदयात
मिळाला नाही मला कधी प्रवेश
सोडणार नाही तरीही स्वप्नात
कधीच तुम्हाला.
म्हणून खेळ मांडला आहे चौसरबाजीचा
चला, डाव टाका रात्र टळली तरी
पणास लावले आहे पहा, रात्रीने सारे तारांगण
एका पहाटेच्या धूसर क्षणासाठी.

दु.— खेळतो राणी,
मोहणाऱ्या, जाळणाऱ्या तुझ्या डोळ्यासारख्या—
विखारी नागिणी!—कवड्या हातात घेतो
पुन्हा एकदा—पण एका अटीवर

मा.—मान्य आहेत महाराणीला तुझ्या सर्व अटी
निर्दय जिवलगा, उच्चारण्यापूर्वी

दु.— अट एवढीच जाऊ द्यावेस मला तू इथून
मुक्त करावेस तुझ्या प्रेमाच्या बंधनांमधून
जिकलो मी तर—आणि हरलो तर—
दास होऊन वागेन तुझा, तुझ्या इच्छेने.
कौरवांनी पण लावला तेव्हा
पांडवांना आपले दास करण्यासाठी
मी मला पणास लावीत आहे आज
माझ्या मुक्तीसाठी
बंधमोचनासाठी माझ्या कलेच्या!

मा.—मान्य आहे मला, माझाच डाव आहे
आधी मी खेळते, हे पहा पडले
प्रेमाचे पंचवीस.

दु.— पृथ्वीपर्यटन करा खुशाल राणी,
मेली नाही माझी एकही नरद.
हे पहा दहा आणि एक सहा
हे वर चार, अन् हा इथे दहाचा 'पौ'
पोटघरात, मेली तुझी बघ
पिकलेली नरद, माझी नरद

* सूर्योदयाचे वेळी पूर्वेकडे पाठ करून उभे राहिले असता डोंगरमाथ्यावरील प्रकाशगर्भ धुक्यांत स्वतःची जो सावली उमटते तिला 'इंद्रवज्रा' म्हणतात.





अनुक्रमणिका

घरात जाऊन झोपली – जिंकलो मी.
जिंकलो मी राणी, जिंकलो मी !
हरलात तुम्ही.
मा.–दुष्ट, दुष्ट आहेस तू
खोटं खोटं खेळलास
मी तुला मुक्त कधीच करणार नाही
माझा आहेस तू !
दु.– नाही, महाराणी, वचन फिरवू नका
मी तुझा नाही.
या देहावर अधिकार आहे माझ्या कल्पनेचा.
मा.–कोण ही कल्पना?
अन् इतकी वर्षे का लपवून ठेवलेस
हे माझ्यापासून?
दु.– उघडाच होता
चंद्राच्या उरीचा रात्रीचा डंख !
मा.–निर्दय, वंचक, पुरा घात केलास
भंगून टाकलेस हे माझे स्वप्न जीवनभराचे
विश्वासानं तुझ्या हाती निरवलेले!
पुरा सूड घेईन या वंचनेचा
नाही, अजून हरले नाही मी
सर्वस्व माझे उधळून देईन
अर्घ्या डावासारखे–या उधळलेल्या !
दु.–उठून जाते, अशीच रात्र उधळून देते
तारांचा डाव, चिडून अंधारात
दिसत नाही तिला पहाट झालेली
कधीच––कधीच!

**

अहा, भारत विराजे, वर्ष हे 'पर्यटनी' गाजे.... ७



"रांडेच्यानों, पलीकडच्या फूटपाथवर बसा. इथे माझेच कांही चालत नाही...."

[प्रवेश दुसरा]

स्थळ–दुमार लेणे––

[महालातून एका बाजूने कैलासाचे भव्य मंदिर दिसत आ
दुसऱ्या बाजूस कातळातून पडणारा धवधबा. पलीकडे सकाळ
आकाश–]

दु.– निरोप द्या आता
एलापूरच्या काळ्या पाषाणांनो!
अद्‌भुताच्या गूढ कृष्णकौतुकांनो!
काळाला दिलेल्या अवकाशाच्या माझ्या आव्हानांनो!
मला निरोप द्या.
अपार प्रेम केलंत माझ्यावर तुम्ही
कठोर कातळांनो,
काळीज आहे, हृदय आहे तुम्हाला
स्त्रीच्या उन्नत कुचमंडलाहून मृदु, अरुवार
करस्पर्शाने स्फुरणारे, चुरणारे
विरघळणारे सृजनाच्या इच्छेने
सुंदर वेगळ्या जगाच्या वेडाने!
थरथरणारे
रूपाकृतींच्या नवनवीन स्वप्नाने
भरे अज्ञाताच्या अभंग मौनांनो!
तुम्ही माझ्याशी हसलात, बोललात
ऐकलंत माझ्याही मनीचं रहस्य
कान लावून माझ्या छिन्नीला
साकार केलीत ही अपरा सृष्टि
ब्रह्माला दिपवणारी
विष्णूला मोहणारी
विसरायला लावणारी शिवाला त्याचे संहार-तांडव !
तुमच्या या दगडी आवरणाखाली
फुलांची वनें हसताना दिसलीं
ऐकिलीं गाणीं गंगा-यमुनाच्या लाटांचीं फेनांचीं
पाहिलीं शिलात समुद्रमंथनें प्रक्षुब्ध युगांचीं
उषारहस्यें तीं रती-पार्वतीच्या अळुमाळ लज्जेचीं!
मनातले पीळ, जाळ हृदयींचे
अविराम संग्राम तमाचे तेजाचे
सगळे सगळे पाहिले इथे: कोरिले शिल्पिले
तयांचे भारत, त्यांचे रामायण
तुमच्या त्रिकालदर्शी शिलांतुन!
निर्मिले मी तुमच्या बळाने
माझ्या अस्तित्वाचे विश्वात्म सुंदर आनंदरूप
असीमपणात अवकाशाच्या!
माझ्या शिलाबद्ध प्राचीन मित्रांनो,
माझ्या रक्तात वाहात आहेत तुमचे स्थाणु
पाषाणाच्या तुमच्या त्वचेच्या खाली

माझेच रुधिर रंगते आहे, उसळते आहे
या छिन्नीने सूर्याचाही रथ अडविला होता
काळही क्षणैक खिळविला होता !–
तोच काळ मला आता ओढून नेत आहे
राहते कला, पण कलावंत वाहात जातो
काळाच्या प्रचंड असीम धारेत
मलाही असचं वाहात गेलं पाहिजे
अनवरत, एकाकी—
होय एकाकी—एकाकीपणाचा–रिता भयाण
वाट्याला येतो
शापच असतो
तो वरदायी कलावंताला !
माणकावती वेडी मला सांगते
स्त्री पुरुषाची पूर्ति असते
अपूर्ण जीवन दोन जिवांचें
पूर्ण होतें गाढ आलिंगनात
दोन देहांच्या–दोन प्रेमिकांच्या
वेडे राणी, कुणीही कुणाची
ती परिपूर्ति करू शकत नाही या जीवनात.
अंतर असतं, तसंच राहातं
परंतु राणी, दिसत नाही ते
धुंदीत डोळे मिटून घेतल्यामुळे !
माणकावती, आठव त्या रात्री
दोन देहांच्या चार बाहूंच्या
दोन उरांच्या गोऱ्या धडकीच्या
नक्षत्रें ज्यात मावळलीं होतीं
अनोळखी पहाट फटफटली होती; शेवटी कशी ?
एकवसना, एकाकी, अपूर्ण! भेटून, लंघून दोन देहांना !
म्हणूनच ना तू कवळू पाहतेस
नव्या आलिंगनात माझा नवा देह?
नाही महाराणी, असेच राहणार माझे जीवन
एकाकी अपूर्ण चंद्रकलेसारखे
क्षयवृद्धीच्या आंतर वेदनेत तळमळणारे
ते पूर्ण कधी करता येणार नाही
कुणा कुणालाही
तुलाही नाही, माणकावती!

मा.–(प्रवेशून)–माणकावती? काय म्हणालात?
कुणाला घातलीत व्याकुळ साद?

बु.– माझ्या नियतीला, जाऊ द्या ते–
पण महाराणी, आकस्मिक कृपा
कशी केलीत या शुभागमनाची ?

मा.–माहित नाही शुभ की अशुभ
मी आले आहे मुद्दाम पाहायला





## धर्मसंकट

बोर बाभळी एक गावच्या कलाल कौतुक करितो माड
बोरफळें चाखीत रसिकता मस्त झुले ते, बाभळ झाड,
मधाळ ओठी बोल मराठी जगूं कोकणी पिकला पाड
शब्द वाहती असे जसे की नसे जिभेला मुळींच हाड
बाकी उरलें कुंपण आता येत आडवे. उरे न चाड
धर्मसंकटीं पडला गोवा इकडे विहीर तिकडे आड

–कौंडथा

तुझ्या कल्पनेला.

बु.– मोठा अनुग्रह महाराज्ञीचा
पण ती सध्या–सध्या इथे नाही
बाहेर गेलीय ती उद्यानात – फुलें वेचायला .

मा.–थांबते मी इथे ती येईपर्यंत
माझे डोळे तहानले आहेत तिच्या दर्शनाला
थांबू ना दुमार?
मोठी पुष्पवेडी दिसते ही पोर !
अगदी तुझ्यासारखी

बु.– तसं नाही काही–थांबावं राणी–
सहज गेलीय ती डोंगरावर
शोधायला वेडी नादाचे रंग झऱ्याच्या शब्दांत
तिला ऐकू येते आभाळ–गाणे उषेच्या रंगात
रेखते त्यांचीं चित्रेंही काही.

मा.–छान! म्हणजे तुझी ती प्रिया
चित्रकार आहे!
चित्र-शिल्पाचा अपूर्व संगम !
आभाळवेडी दिसते तशीच
ऊंच निळाईत विलीन होणाऱ्या डोंगरासारखी –
फार आवडतात नाही का तुला अबोल डोंगर ?
मी वेडी बडबडी—

बु.– पार गोठून गेलंय माझं डोंगराचं प्रेम
चाळवणार नाही बोलणार नाही
आता कुठल्याही छिन्नी—हातोड्याने
–केव्हा परतेल ती कुणास ठाऊक?
महाराणीनं ग्रहण करावं आसन इथं
अनुज्ञा असावी, आलोच मी आतून
सुचना देऊन काही सेवकाला

मा.–सुचना कशाची?







बु.– माझ्या प्रयाणाची
निघणार आहे दोन घटकांनी पट्टादिकलली
मायभूमीला, जिनं दिलं वेड शिलाशिलांत स्वप्न पाहण्याचं
मा.–कुठलं प्रयाण? जाणार कसे
माणकेश्वराचं शिल्प पूर्ण झाल्याशिवाय?
बु.– विदितच आहे महाराणींना
पूर्ण झालंय कैलासमंदीर
मा.–देऊळ झालय. कुठं आहे देव ?
शिवलिंगाच्या स्थापनेशिवाय
जाता येणार नाही तुम्हाला इथून.
बु.– माझा करार फक्त मंदिराचा.
वचन दिलं नव्हतं देवाच्या मूर्तीचं
आणखी एक सांगू महाराणी? निर्मिता येत नाही
माणसाला देव–निर्मिला तरी !
निर्मिलं आहे मी भव्य मंदीर विशाल सुंदर
घृष्णेश्वराच्या देवालयाहून
पूर्ण झालं ते दिलेलं वचन.
मा.–मंदिर ते रितं राहणार असेल
या माझ्या रित्या हृदयासारखं
तर दुमार, तुला जाऊ दिलं जाणार नाही.
या क्षणापासून स्थानबद्ध आहेस
आज्ञा आहे ही महाराणीची राष्ट्रकूटांच्या !
बु.– असं आहे तर!–धन्य महाराणी,
कारण सकाळच्या या श्रीचरणांचं
तरीच पहाटे पुष्करणीचं पाणी
रुद्ध श्वासासारखे धपापत होते
हिरव्या पिवळ्या सावल्यांच्या तळात
झोपलेले नाग क्रंदत होते
क्षमा करा राणी. बोलत नाही मी
तुमच्या हिरव्या शृंगाराबद्दल
मी म्हणत होतो आपली हीच आज्ञा असल्यास
कैलासाच्या या शिखरावरून



करावी लागेल मला आत्महत्या.
मा.–आत्महत्या! शी: इतका का दुमार
तू म्याड आहेस? कापुरुष आहेस?
बु.– माझ्या मनात नाही मरणाची भीति
निर्मित असता
गद्‌गदा कैलास हालविणारा दशकंठ रावण
कोसळली शिला, चेंगरलो मी तिच्या भाराखाली
प्रकाशाच्या झाल्या
शिलेच्या बाहुल्या माझ्या डोळ्यांतल्या–
शिवले नाही तरीही मला मृत्यूचे भय
आनंद होता एक जीवनाचा, कलानिर्मितीचा
मृत्यूच्या क्षणीही सागराऐसा !
परंतु आज दंवाने न्हालेल्या फुलाफुलांत
चैतन्याच्या झुळझुळत्या क्षणांत
भयाण मृत्यू दिसतो, हंसतो फुटत्या रक्ताच्या गुळणींसारखा!
मा.–म्हणूनच म्हणते स्वीकार कर माझा
सारे जीवन सुंदर होईल
आकाशालाही अन् फूल येईल !
आहेच मी तशी सुंदर, रूपशी
दुसरी ऊर्वशी
आलेली वाहात मी अभिलाषांच्या कल्लोल–समुद्रीं
प्रीतीच्या शुभ्र मोत्यांच्या शिंपल्यात
सोडून मागे अवघा जन्म लज्जेसारखा
श्यामल काठाशी तुझ्या बाहूच्या
सृष्टीच्या अनादी कामनेसारखी!
फुलतो वसंत माझ्या अंगांगांत
करीन फुले त्वचेचीं, क्षणांचीं
मातीची ओढ आहे माझ्या मांड्यांत
घनाढ्य अनंत नभें भोगण्याची !
उत्कट रहस्यें नयनीं माझ्या
शिवगौरीच्या मीलननृत्यांची
सांगना, कधी मदनमहेशा, कोरणार आहेस
तीं सारीं लास्यें अजून अस्फुट
माझ्या आरस्पानी गोरागांतून ?
बु.– लास्यें नाहींत माणकावती, तीं
प्रलयंकारी तांड आहेत सृष्टीच्या अंताचीं
खचतील गिरी, कोसळतील तारे
चिंध्या होतील फाटून फाटून अफाट आभाळाच्या
साऱ्या भावमूर्ति खाली धडधडा भंगून पडतील
माणसे वराह होऊन फिरतील
द्दंगीत अंधार उध्वस्त लेण्यांत आपल्याच आत्म्याच्या !
पाहिले होते मी हे स्वप्न तेव्हाच—
क्षीण मिटणाऱ्या कृष्णकमळाच्या त्या तुझ्या डोळ्यांत

अनुक्रमणिका







मरणाच्या उदास पसरत्या सावल्यांत–
बिवली जेव्हा कलशाकार ती शिखराकृति
नुकतीच कोरलेली डोंगरामधे मी ! –
ज्याचा अजून येत होता मला ओला ओला गंध
आताच तोडलेल्या चंदनासारखा !

मा.–त्या पाषाणाला खरंच येतो पुरातन गंध
नृत्याने फुललेल्या, घामाने भिजलेल्या
शिव–पार्वतीच्या श्रांत गौरांगाचा
चितेच्या भस्माचा, निळ्या कमळांचा
फुंफाटणाऱ्या विषारी सर्पांचा





अनुक्रमणिका

अन् तोच गंध मला येत आहे
आता तुझ्या या तरुण देहाचा.
पिऊन घेऊदे एकदा हा गंध श्वासाश्वासांनी
भरून माझ्या प्राणाप्राणांतून

दु.– थांब महाराणी. स्पर्श नको मला
व्रतभंग होईल, हरवून जाईल, वितळून जाईल.
माझ्या बोटांतील कलेचें चैतन्य
फेकावा लागेल निष्प्राण हा देह
त्रिभुवनसुंदर या शिल्पावरून.
माझी कलाभूमि होईल माझी मृत्युभूमीही !
काही दया कर अल्लड भोळचा त्या कल्पनेवर
मरेल ती, राणी, वाचवा तिला.

मा.–इतकी आवडते तुला ती कल्पना ?
खरंच एवढी पवित्र वाटते तुला तिची प्रीत ?
मनात तुझ्या एवढी करुणा!
तिच्यासाठी भीक मागतोस दयेची–
आणि माझ्यापाशी! —
जाळीत होती जी तुझ्यासाठी सारे आयुष्य
एकाकी विषण्ण सोन्याच्या समईचें वर्षानुवर्षे !
आता मला तिचा वधच केला पाहिजे.
विसरलास वाटते, माझी कालची
सूडाची प्रतिज्ञा
कुठे आहे तुझी लाडकी कल्पना?
बागेत? डोंगरात? कुठे आहे ती?
चित्रकार आहे ती, तूंच म्हणालास ना?
कधीच काढता आले नाही जिला
नियतीचे चित्र
रेखून देते, रंगवून देते तिच्याच कोवळ्या तरुण रक्ताने
(धावत जाते. मग दुरून शब्द येऊ लागतो).
छान पहा ती, इकडे येत आहे
कैलासीच्या निळ्या कबूतराप्रमाणे
रहस्य विसरून अमरपणाचे !

दु.– थांब, थांब, थांब माणकावती
करतेस वध कुणा निष्पापाचा?
थांब तिथेच,

मा.–मला माहीत, कल्पनाच आहे ती
पायाला आळिता हातात फुलें,
डोळ्यांत रंग अनंत आशांचे
अगं खुळचा पोरी,
कल्पना नाही तुला समोरून येणाऱ्या मृत्यूची
चांडाळणी, तूच घात केलास माझ्या प्रेमाचा
आपल्या प्रीतीच्या पूर्तीसाठीच ना?
हा घे वार–नीट छातीत
वघू दे कुठें–दुमारचें प्रेम तुझ्या हृदयात?
फुलांतल्या अदृश्य वेडचा सुवासाचें!
प्रहार दुसरा हा घे कुशीतून
कुठें आहे पाहू ते तुझें हृदय?
फुलांच्या बाणांनी सहज विंधणारें !
काय हे? एक तपकिरी पिशवी!
अन् धार रक्ताची ?
दुमार, पहा तुझी ही कल्पना आणली आहे!
पहा तिचे हें ऊन ऊन हृदय
कसें धडधडतें
कळसावर घुमणाऱ्या पारव्यासारखें!
पहा तर खरी—
(ती स्वतःच रक्तात न्हाऊन बाहेर आलेली दिसते)

दु.– कुणाचं हे रक्त? कुणाला मारलंस?
हे काय तुझ्या हृदयाला जखम!
किती रक्त वाहातंय
अरे देवा – कैलासपती—
काय हे राणी—काय स्वतःचाच तू वध केलास?

मा.–नाही दुमार, वध केला आहे.
तुझ्या कल्पनेचा !

दु.– कुणाची कल्पना?
नाही, नव्हती–कुठं होती ती?

मा.–इथंच होती ती ! तुझ्या–नाही–माझ्याच हृदयांत—
ती दुष्ट कल्पना!

दु.– राणी, राणी, शुद्धीवर ये
तू वार केलास आपल्याच काळजावर

मा.–अरे वेडचा, मला कां एवढं कळत नाही तें?
हृदय माझंच, रक्तही माझंच हे वाहात आहे !
नाही रे, जीवन प्रेमानं भरून परिपूर्ण होऊन
उसळत आहे! –
तू म्हणालास ना? – खरंच होतं ते! —
पूर्णता येत नाही, पूर्ति होत नाही दोन जिवांची
शेवटी काही उरतंच अंतर: रिता अवकाश
गूढ, मुलायम कमळातल्या दोन पाकळ्यांतल्या इतका !
पण दुमार, देहच हा नष्ट केला तर?
जाऊ दे, नकोरे, नको कष्टी होऊस,
एकच इच्छा, कल्पना आणि तू आता सुखी व्हा.
खूप प्रेम करा, चांदण्यात नहा, फुलांत रहा,
नाचा वीणेचे झंकार बनून आपल्याच देहाचे !
आणखी–आणखी शिवलिंग स्थापा
माणकेश्वराच्या रित्या गाभाऱ्यात
जाते मी आता-रडवू नको रे—
दुमार, दुमार, सुखी–हो–राजा
स्फटिकाच्या पात्री! –काजव्याच्या रात्री! —

अनुक्रमणिका






उजळीन,–उजळीन मी–कल्पना—
(मरते).
– कल्पना, कल्पना! कुठली कल्पना?
कुणीच नव्हती! खरंच! बोल,
बोल माणकावती, काही तरी बोल,
खोटी होती ती––
माझी कल्पना, निवळ रचलेली
फसवण्यासाठी! –मला की तुला?–
नाही, नाही, मुक्त होण्यासाठीं तुझ्या पाशांतून
दर्शनासाठी, साक्षात्कारासाठी नवीन कलेच्या!
नवीन कला! नवीन दर्शन!
होय, राणी, उलटी खूण कलेच्या घरची!
आधी कळस नंतर पाया!—
कैलास, नव्हे, सारे त्रैलोक्य पिंपळपानावर!
दिव्य सौंदर्याचा, नव्या निर्मितीचा चिरंतनाचा
माझा अभिमान सूर्यासारखा!
कोसळला खाली!—एका फुलापुढें–
प्रकाशासाठी भिरभिरणाऱ्या
उरीच्या पाकळ्या उसवीत फिरणाऱ्या
सूर्यफुलापुढे! –
माझी कला, दिव्य अद्भुत ही प्रतिसृष्टि
मीच का निर्मिली?
नाही–नाही–विश्वास वसत नाही
छे छे, मी तो–तो शिल्पी नाही!
कोण तो–कलावंत?–का ही प्रगटली
तुझ्या देहातून? तुझा देह धरून?
शिवपार्वतीची हीं सहस्र नर्तनें!
रति मदनाची शृंगारमिथुने
लक्ष प्रतिबिंबें का तुझ्या प्रीतीचीं?
सृजनानंदाची, फुलांच्या जातीचीं
सूर्याच्या नात्याचीं!
उडाला का तुझ्या क्रुद्ध नेत्रातून
त्रिपुरांतकाचा गभस्तीचा बाण?
अन् तपस्विनी मानिनी उमा उभी राहिली
तुझ्या मिटलेल्या विरही डोळ्यांतून?
मग माझी प्रतिभा?–
अहंकाराचा, माझ्या अस्मितेचा प्रचंड हुंकार!
कुठे गेला तो? कुठे हरवला?
पण हे काय? ह्या साऱ्या मूर्तीच
हरवून बसताहेत आपल्या रेषाकृति!
एका अजस्र दगडाच्या खोंगीत
विरजून, गोठून जात आहे ऊन
ढगाढगांतून
मृत्यूच्या घुवयात सारे मंदीर तरंगते आहे
डळमळते आहे! गिळू येत आहे
शिवालयाचे रिते गर्भागार मला मरणासारखे
पसरून आपले विक्राळ तोंड!

धरित्री कापते आकाश धपापते
अंधार, अंधार, घुसमटणारा काळा अंधार
त्याच्या लाटावर, बुडत्या कळसावर
रुद्र नाचतो आहे खांद्यावर घेऊन,
कोणाचा देह ? पिकल्या शेवंतीचा!
फुटल्या डाळिंबाचा! माणकावतीचा?
नको माणकावती, नको असें हूंमू
फुलातल्या अज्ञात मरणासारखें
इंदुमतीच्या!
–आणि हे कोण? काय विचारीत आहे
फुटल्या मूर्तीसारखें
बुडत्या घागरीसारखें
"देहात, देहाहून देहाच्या या विभक्तीपलीकडें
प्रीतीच्या व्यथेला, विरहमीलनाला
साऱ्या अस्तित्वाच्या अनादी शब्दाला
आनंद रूपाच्या आकृतीबंधाला
काय अर्थ आहे? काय अर्थ आहे?
कळलं का तुला?
सांग, सांग मला–कळलं का तुला?"
मला माहित नाही. मला माहित नाही!
दगडाला विचार, या डोंगराला विचार.
डोंगरावरल्या सूर्याला विचार
पण सूर्यच उतला, डोंगर फुटला.
मीही कोसळलो–चाललों खाली
खोल पाताळात, भयाण अरुपात!
पाताळात खोल आकाश कसें आलें?–
माणकावतीच्या गोऱ्या गोऱ्या मांड्या
त्याही तिथेच!–त्यांना फुटलेले
अर्धे फूल!–अर्धा डोळा! रडणारा हसणारा
अजून त्यांत काजवे पेटत आहेत.
मीही एक त्यातलाच काजवा!
आनंदरुपाचा, अमृतात जळणारा!

●



—स्वागताची जंगी तयारी—



# शामगढ आणि ट्रँन्झिस्टर

प्रा. मंगेश विठ्ठल राजाध्यक्ष



माझे विद्वान मित्र डॉक्टर ...पण नाव नको; त्यांच्या भार्येला ते आवडायचे नाही कदाचित्. ते खरोखरीचे विद्वान् आहेत मात्र. आपली एक संभावित प्रथा म्हणून उगाच विशेषण नाही जोडले. असो. सांगत होतो ते असे. अलीकडेच ते मला म्हणाले, "माझ्या मते सर्व पुस्तकात अत्यंत मनोरंजक पुस्तक म्हणजे रेल्वेचे टाईम–टेबल." आणि ते त्यांच्या विद्वत्तेला आणि मोठ्या पदाला साजेलशा आवाजात म्हणाले; थिल्लरपणे आणि विनोदाच्या सुरात नव्हे. ते विद्वान् असूनही विनोदी असल्याबद्दलचा त्यांचा सार्थ लौकिक आहे हे सांगायला हवे. मला ते ऐकून फार फार बरे वाटले. लहानपणीच मला ते पटले होते – म्हणजे प्राथमिक पाठ्यपुस्तकांपलीकडे ईश्वर काही फारसे वाचले नव्हते तेव्हापासून. वय वाढत चालले तशी कधी सक्तीने, कधी लाजेकाजेस्तव, कधी देखाव्यासाठी, तर कधी आवडीनेही अधिकाधिक पुस्तके हातावेगळी होऊ लागली; तऱ्हेतऱ्हेची बरीवाईट पुस्तके. (पुस्तके बरी की वाईट याबाबत काळगतीने उलटापालट होत आली. माझ्या स्वतःच्या मतात आणि इतरांच्याही!) तरीसुद्धा, तुलनेला एवढे वाढते क्षेत्र मिळून सुद्धा, रेल्वे टाईमटेबलचे आकर्षण कधी उतरले नाही. विद्यार्थीदशेत, विशेषतः तिच्या शाळकरी अवस्थेत, असताना ते वाचीत बसल्याबद्दल वडीलधाऱ्यांची बोलणी खाल्ली; तेव्हा साहजिकच ते चोरून आणि अधिक चवीने वाचू लागलो. ती सवय वडिलधाऱ्यात जमा झाल्यावरहि जाईना. पिंडदोषच म्हणा. रेल्वेच्या प्रवासात मात्र ते उजळ माथ्याने वाचायचे; किंवा तशीच काही निष्पाप सबब असेल तर. एरव्ही एकांतात. मग त्याबद्दल इतके ठासून बोलणे कोठले? म्हणून उपरिनिर्दिष्ट सन्मित्राविषयीचा आदर दुणावलाच, पण स्वतःविषयीचाही थोडासा वाढला–किंवा आपल्या उणेपणाचे एक कलम कमी झाले असे समाधान वाटले म्हणा!

मग या नव्या आत्मविश्वासाच्या आवेगात म्हणावेसे वाटू लागले की ज्यांना त्या पुस्तकाची लज्जत कळली नाही त्या कंबख्तांना शंभर हाय हाय! ती त्यांना सांगून काय कळणार? अहो, ती नुसती गांवाची यादी नसते–टपालखात्याच्या किंवा इतर उजाड सरकारी याद्यांसारखी. ती गावे नसतातच; ती छोटीमोठी स्टेशने असतात. एखादे बिनफलाटाचे, मुकाट बसलेले, निर्जन, शापित वाटणारे; एखादे अवाढव्य, झगझगणारे, अपरात्रीही किंचाळणारे पण प्रत्येकाचे वेगळे व्यक्तित्व असते; एकेकाचा खास स्वर असतो; वास असतात. तेथे थांबणाऱ्या, अथवा धडाडत जाणाऱ्या, गाड्यांचे त्यांना वास लागतात. आता कोळसे जाळणारी, धगधगणारी, इंजिने कमी होत गेली की कित्येक वास हरपणार! काजळहि पुसले जाणार!

त्यातील बहुतेक स्टेशने डोळ्यांनी पाहिलेली नसली तरी मनात उभी असतात — कुवलाखानच्या महालासारखी, अर्धीमुर्धी. कधी नावाच्या, त्याच्या नादाच्या, सूचनेतून त्यांचे शिल्प स्फुरते; वाचलेला वा ऐकलेला एखादा असंबद्ध तपशील आठवणीच्या तळाशी रुतलेला असतो त्याभोवती कधी, वाळूच्या कणाभोवती मोती धरावा, तसे चित्र धरते. पुढे प्रत्यक्षात ती निराळी दिसली तरी फिकीर नसते. अनेकदा वाचलेल्या स्टेशनचे प्रथम दर्शन रोमांचकारी असते,

अनुक्रमणिका






शामगढ या स्टेशनवर मन जडले.
'फ्रंटिअर'सारखी मिजासखोर गाडी तेथे थांवते म्हणून असेल कदाचित् आणि ते साक्षात् पाहिले तेव्हा दृष्टिस्पर्शाने पहाताक्षणीच पुरे केले. तेच ते. छायाचित्रात नेहमी पाहिलेले स्थळ प्रत्यक्षात भेटल्यावर होते तसे झाले....

आणि कित्येक्दा अनेक दर्शने घडली तरी ते रोमांच उतरत नाहीत. जणू प्रत्येक वेळी कसलेतरी नवलाईचे लावण्य सुखवते. पहाणारा मात्र 'देखणा' हवा. माझे दुसरे एक मित्र आहेत. (तेही विद्वान: प्राध्यापक असून विद्वान!) अहमदाबादला नोकरी करीत, पण एरव्ही मुंवईकर. तेव्हा मुंवई–अहमदावाद अशा सारख्या उलटसुलट फेऱ्या होत. त्या वहुधा रात्रीच्या मेलगाडीने. पण गाडीत ते कधी सलग झोपले नाहीत. स्टेशन आले की नेम केल्यासारखा खाली उतरून ते तारवटलेल्या डोळ्यांत भरून घेत; मग पुढचे स्टेशन येईपर्यंत झोपेचा आणखी एक घुटका. दिवस हा कामाचा, तेव्हा रात्र प्रवासाला सोयीची असे तीर्थरूप सोंग फारजण आणतात; त्यांच्यात मूलपणा कधीच नसावा–लहानपणीही! पण, कोण जाणे, रात्री इतर काही गोष्टींप्रमाणे स्टेशनेही अधिक साजरी दिसत असतील!
...टाईमटेवलने चेतविलेली कल्पनाशक्ती सगळी यात्रा करून येते–कधी चिल्लर गाडीतून थवकत रेंगाळत, तर कधी एक्स्प्रेस गाडीतून झेप घेत... ज्या कल्पनेला अशी यात्रा जमत नाही किंवा मानवत नाही ती अभागी; तिला गती नाही!

...पण गाड्यांचे वेळापत्रक एवढाच आपल्या वाचनमननाचा विषय नसतो; त्या ग्रंथात आणखीही सौंदर्ये असतात. अमुक गाडीचे काही डवे तमुक गाडीला जोडतात हे वाचले की शंटिंगचे आवाज खणखणीत घुमू लागतात. ज्या गाडीने प्रवास करायला किमान अंतराची अट असते तिच्यावद्दलचा आदर वाढतो. असेच आणखी कितीतरी. पण सर्वात रोचक वाव आणखी निराळीच. काही स्टेशनांच्या नांवांपुढे, तेथे कसल्या भोजनाची सिद्धता असते–सामिप की निरामिप–की नुसतेच फराळाचे दुकान असते याच्या अक्षरखुणा असतात. जेवणाच्या खास डव्याचा अलंकार मिरविणाऱ्या खानदानी गाडीच्या वेळापत्रकात तर लहानमोठ्या विविध भोजनसंस्कारांसाठी त्या डव्यात शिरण्याच्या आणि तेथून वाहेर पडण्याच्या वेळा अगत्याने दाखविलेल्या असतात. कधी ती गाडी एखाद्या क्षुल्लक स्टेशनावर थांवते ती सामान्य उतारूंसाठी नव्हे, तर केवळ भोजनभाऊंना पंगत साधण्यासाठी! धन्य! आणि एकदोन पानांवर तर चक्क खाद्यपेयांचे दर असतात. ज्या वयात फारसा प्रवास घडत नसे, आणि घडलाच तरी तसले चोचले परवडण्यासारखे नव्हते, त्या वयात तसल्या पानांमुळे पंचनरस स्रवू लागत; क्षुधा प्रज्वलित होई. संस्कृत नाटकातील विदूषकाची पक्वान्नांची नांवे घोळविल्यामुळे होई तशी. पण आपल्याला अजूनही–इतका प्रवास घडला, असल्या माफक चोचल्यांपुरता पैसा असला, आणि वयोमानाला शोभून दिसणारे अग्निमांद्य लाभले तरी —— त्या पानांचा वास आवडतो; मनात दरवळतो. वस्तुत: पदार्थ तेच, वाहेर किंवा घरी खातो तेच, पण या पानांत त्यांची रुची वाढते खरी!

हे अर्थात् 'छापील' नेमस्त जेवणखाण–त्यात थोड्या प्रतिष्ठेचा भाग असतो. त्याने वाहेरच्या वघ्यांच्या मुद्रेवर हेव्याची पोटदुखी उमटते ती आपल्याला मानवते; तेवढाच स्वाद वाढतो. पण त्यात ठरीवपणा फार. न्याहारीला तेच टोस्ट आणि तेच अंड्याचे पदार्थ. सगळी अंडी वेटी एकाच गोत्रातील असल्यासारखी वाटतात. दोन्ही जेवणांचेही थोडेफार तेच. त्यातील साहेवी थाटाचे–म्हणजे काट्याचमच्यांशी झटापट करायचे आणि महागडे–जेवण साहेवाच्या काळी असे तसेच असते, तसेच सपक. ते आता आपला साहेवीपणा सांभाळण्यासाठी, अथवा त्याचे दाम दुसऱ्याच्या खिशातून जायचे आहेत या तृप्तीसाठी, मनोभावे जेवायचे असते. थाळीचा देशी थाट आता लोकप्रिय होत आहे; निदान खिशाला त्याचा तेवढा पश्चाताप होत नाही. तो सपक नसला तरी एकंदरीने एकसुरी असतो. भारतीय एकात्मतेसाठी ही पाक-योजना असावी! दक्षिण देशाची द्राविड अस्मिता मात्र याही प्रकरणात तिखट आहे; तेथील मोठमोठ्या स्टेशनांतीलही भोजनगृहात केळीच्या पानावरील सारभातम् ओरपताना त्याचा ठसका समजतो. आपल्या मराठी मुलुखात असला अराष्ट्रीय कोतेपणा नाही!

पण ही प्रहरांनी वांधलेली पोटपूजा, आवश्यक यज्ञकर्म म्हणून उरकायची. शिवाय, वेळीअवेळी, उमाळे येत असतातच. सराइतांचे त्यावावतही वेळापत्रक असते. कोणत्या स्टेशनावर काय खास चीज मिळते याची व रीक नोंद तेथे आढळेल. मुंवई-पुणे मार्गावर कर्जत-लोणावळ्याला निष्ठेने वटाटेवडे खाणारी माणसे हा ढोवळ प्रकार; भोवतालचे करतात म्हणून आपण करायचे असा घाऊक निष्ठेचा विधि–आणि सामान्यज्ञानाचा त्यात स्वतंत्र प्रज्ञेचा विकास नव्हे; तो थोड्या जाणकारांपुरता असतो–आमच्या अनंतरावांसारख्या. माहितीच्या रेल्वे आणि वसमार्गावरील लहानसहान स्टेशनांचीही खाद्यवैशिष्ट्ये त्यांना मुखोद्गत आहेत. अशा थोर निष्ठावंतांच्या टाइमटेवलात त्या त्या स्टेशनांच्या नांवापुढे ती वैशिष्ट्ये न छापता नमूद असतात...









अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

# तुमचं भविष्य......



मेष

ोधटलेली शिंगे तशी उपद्रवी
ठरणार नाहीत, मुसंडी मारण्यासाठी
तो धावेल; थोडीशी हुलकावणी दिलीत की
त्याचीच शिंगे मातीत खुपसली जातील



वृषभ

हुरकाळ्या मारण्यात कितीही पराई
असला तरी वृषभराजाला आंबोणाची
सदैव पडणार असे दिसते



मिथुन

शुद्धी घोडी-लाल लगाम या न्यायाने
या दुक्कलीचे चाळे भरपूर करमणूक
करतील. देशभर भटकून आराम करतील



कर्क

हा खेकडा चावे घेण्यात फार प
पण दांत कासवाच्या पाठीत रुत
नसल्याने, गोगलगाई मात्र मरती



सिंह

शिकार मारण्यापेक्षा गुहेतच सदैव
दडून बसलेले हे वनराज त्यांच्या
भेटीला येणाऱ्याचाच घास घेतील!




कन्या

सीमा भागातील मराठी जनतेचे
महाजनाऱ्याला करून ही माउली धन्यधन्य









अन्नासाठी दाहि दिशा.
इस्त्रायल आक्रमक आहे!
प्रवेश द्या!
'वॉशिंग्टन'
भुकेल्या भारताला गहूं द्या ऽऽ!!
बोला, एक वार... दोन वार..... की देउं..... चीनला!
मॉस्को
गव्हाच्या मोबद-ल्यात काश्मीरी सफरचंदे !!!
इस्त्रायल
फिफ्टी....फिफ्टी!! तुमची वाळू आमची खतें नी सुवेझचे.... पाणी.... धान्य पिकवूं.. अर्धे अर्धे वाटून घेऊं...
खतें
जन संघ

अनुक्रमणिका


ाने भीक कशी मागावी!
पेकिंग
बोला, की जाऊं मॉस्कोला?
नक्षलबारीच्या मोबदल्यात चीनी तांदूळ देता ना?
इस्लामाबादकडे
भारतपाक-भाईभाई काश्मीरमध्ये सार्वमत घ्या आणि गहू नसलाच तर सफरचंदे तरी द्या...
आता भिकेसाठी कोणता देश शिल्लक राहिला?
आमचाच हात जगन्नाथ!

अनुक्रमणिका

# ....याच्या हाती !!!

## तूळ



...नेर्यात व्यवहार करणाऱ्यांना हे वर्ष फारच भरभराटीचें आहे. मात्र मालाची ...कूक अस्सलापेक्षां श्रेष्ठ नकली तरच...

## वृश्चिक



नांगी मोडल्याने ती परजण्यातच हे वर्ष निघून जाईल. पण अनाहूत सल्ला देणाऱ्या... मात्र मोडक्या नांगीचाही चावा चांगलाच ...

## धनू



परराष्ट्र खात्याची यंदा चंगळच चंगळ बिनबुडाच्या शिखर परिषदांचे डोलारे उभारले जातील आणि ते कोसळतील मात्र आपल्या अंगावरच.

## मकर



मायावीपणे ऊन खाण्याच्या ... हा संपूर्ण जलाशयांत वावरत आहे. दांत मोडले तरी शेपूट धड असल्याने तिच्या फटकाऱ्यापासून सां...

## कुंभ




कृष्णाकाठच्या मराठी माणसांनी देखील घरी नळ बसवावेत आणि शेतात विहिरी खणाव्यात अगोदर सांगितले नव्हते हे ऐकले जाणार नाही

## मीन



अशांत अंतःकरणाचा सागर हे याचे राशीदैवत. अयु... एकमेकांना टांगा मारण्यातच मश्गूल असलेल्या ... मंडळीपासून सावध रहावे न जाणो ... फटका बसला...

...माणसाच्या नांवाप्रमाणे स्टेशनच्या नांवालाही रेखीव व्यक्तित्व हवे; कुर्डुवाडी, म्हसवड, शेणोली ही काय नांवे झाली? म्हणजे आपल्या काही ललित-लुलित नाटककादंबऱ्यांत आणि चित्रपटांत माणसांना आणि गांवांना देतात तशी फुचकड्याची (म्हणजेच 'काव्यमय') नांवे नकोत मला. चमेलीपूर आणि ...असली फुल-छाप नांवे बालिका-बुद्धीला शोभून दिसतात. त्यापेक्षा कुर्डुवाडी परवडले! खरे म्हणजे माणसाप्रमाणेच नांव कां आवडते, भुरळ घालते, हे सांगता येत नाही. कर्जतनंतर घाटाच्या तोंडाशीच एक बिनफलाटाचे, बिनउतारूंचे, लुटुपुटुचे स्टेशन आहे; त्याचे नांव पळसदरी (की पळसधारी?) आपल्याला पसंत. तशीच बेळगांवच्या वाटेवरील रायबाग आणि घटप्रभा... आणि कितीतरी आठवतात. एकेका नांवाला आपली स्वतःची झळाळी आहे; बाजारी जिल्हई नाही.



अशाच एका नावाने फार वर्षांपूर्वी माझ्या मनात घर केले. जेव्हा प्रवास कल्पनेतच अधिक घडत असे; प्रत्यक्षात कधी सठीसामासी... त्या निर्हेतुक 'कलात्मक' म्हणतात त्या आनंदासाठी केलेल्या टाइम-टेबलच्या वाचनात बी. बी. सी. आय्. च्या (म्हणजे आताच्या 'वेस्टर्न'च्या) दिल्ली मार्गावरील शामगढ या स्टेशनवर मन जडले. 'फ्रंटिअर'सारखी मिजासखोर गाडी तेथे थांबते म्हणून असेल कदाचित्; ते जाड टाइपात टाकतात. मात्र पोचण्या-सुटण्याच्या दुहेरी वेळा दाखविणारे, आणि त्याला शोभेसा ऐसपैस जेठा मारून बसणाऱ्या तालेवार स्टेशनांपैकी ते नव्हे. पुन्हा त्या मार्गावर गाड्याही मोजक्याच. म्हणजे फाजील गजबज नसणार. निवांत, टुमदार. दर नवे पारायण चित्रात तपशील भरू लागले. वीसपंचवीस वर्षे चित्र असे भरत होते, पण पुरे होत नव्हते...

...आणि ते साक्षात् पाहिले तेव्हा दृष्टिस्पर्शाने पाहाताक्षणीच पुरे केले. तेच ते. छायाचित्रात नेहमी पाहिलेले स्थळ प्रत्यक्षात भेटल्यावर होते तसे झाले: छायेच्या यांत्रिक बंदिपीत न सामावणारे एखादे अकल्पित रूपरहस्य चमकून उठते. दृश्य तेच पण अगदी तेच नव्हे!

त्याला जवळजवळ एक तप झाले. या बारा वर्षात किती वेळा शामगढ पाहिले हे नक्की सांगता येणार नाही, इतका तो प्रवास अंगवळणी पडला आहे; पण नजरेतून त्याचे कौतुक अजून उतरले नाही. रंग ताजेतवाने आहेत. 'फ्रंटिअर'ने जाताना ऋतुमानाप्रमाणे शामगढ सकाळी नऊ साडेनऊच्या सुमारास कोवळे किंवा चढते उन्ह खात बसलेले, आणि येताना सायंकाळी साडेपाच-सहाच्या सुमारास मावळती ऊब किंवा सावल्यांची शिरशिरी अंगावर घेत बसलेले दिसते. एकच सरळसोट उघडा फलाट, मध्यभागी चिमुकली धाब्याची इमारत, उरलेल्या भागाच्या बाजूला हारीने खडे राहिलेले






सडसडीत उंच वृक्ष; फलाटाच्या दोन्ही टोकांना इंजिनात कोळसा ओतण्यासाठी बांधलेले उंच....त्याला काय म्हणतात कोण जाणे! या बारा वर्षांत त्यात काही बदल झालेला नाही. इतरत्र स्टेशनांचे आधुनिकीकरण झपाटचाने होत आहे. उघडयावागडयां फलाटांवर छपरे चढली–उताहंचे ऊनपावसापासून संरक्षण करण्याच्या स्तुत्य हेतूने. पण त्या एकसाची छपरांनी स्टेशनेही एकसारखी दिसू लागली, कोंदट वाटू लागली. पण यातून शामगढ अजून सुटले आहे. तो लांबलचक फलाट अजून तसाच मोकळामोकळा आहे; म्हणून त्या वृक्षांचे वांवेसूद वैभव अजून तसेच उठून दिसते.

न चुकता दर खेपेस मी शामगढला उतरून शतपावली करतो. एक लहानसा वुक-स्टॉल आहे त्याच्याकडे उगाच नजर टाकतो, कारण तेथील वृत्तपत्रे तेवढी ताजी नसतात–आणि पुस्तके आपल्याला न आवडणारी किंवा न परवडणारी असतात. त्या पहिल्या भेटीत मात्र मी तेथे एक मामुली पुस्तक घेतले होते. ते खिळखिळे झाल्यामुळे अलीकडेच टाकून दिले. त्याच्या मलपृष्ठावर मी माझी सही, खाली शामगढ आणि तारीख –मोठचा लफफेदारपणे नोंदले होते हे सगळे. आणखी त्या स्टेशनात पाहावे-घ्यावे असे नेहमीचे काही नाही. पानदखील चांगलेसे मिळत नाही. हो, दोनतीनदा उन्हाळघातल्या संध्याकाळी तेथे पाणचट लस्सी घेतल्याचे आठवते; अन्यत्र तिच्याकडे कदाचित् ढुंकूनही पाहिले नसते इतके तिचे दर्शनही पाणचट (म्हणजे प्रामाणिक) होते.

इंजिनचे कोळसा-पाणी चालू असता त्या दहापंधरा मिनिटात मी गाडीकडेच अधिक पाहातो–म्हणजे गाडीकडेच, आतल्या माणसांकडे वगैरे नव्हे. (तसली आंबटचिंबट रसिकता वेळीच सरली!) अशी सलग गाडी, आणि तीसुद्धा देखणी गाडी, सहसा पाहायला मिळत नाही... मग आपण क्षणभर स्टेशनवर गाडी पाहायला आलेल्या शाळकरी मुलाच्या स्तिमित आणि आशाळू नजरेने तिच्याकडे पाहातो, आणि गाडी सुटता सुटता शाळकरी आणि धपापणाऱ्या चलाखपणाने आत चढतो...

..अशावेळी उगाच पायात बंगाली धोतराचा बोंगा घोटाळल्यासारखे वाटते. न्यू थिएटर्संच्या दिवसांपासून बंगाली चित्रपट आगगाडीवर भाळले आहेत. असाच उघडा भावडा उजाड फलाट, संथ भपकारे टाकीत सुटणारी गाडी आणि चालत्या गाडीतून कसल्यातरी दुःखाचे ओझे घेऊन उतरणारा किंवा चढणारा नायक. हा खास बंगाली बाण आजतागायत, सत्यजित रेपर्यंत, चालत आला आहे. गाडीच्या चाकांच्या लयीत नायकाच्या अनवट दुःखाचे स्पंदन चालू राहाते. मग आपलेही कसलेतरी अर्धसुप्त, अनामिक दुःख ती लय धरू पाहाते. बंगालला काव्याचे आणि संगीताचे देणे आहे म्हणतात. कोण जाणे, पण आग-



अनुक्रमणिका

गाडीचे संगीत आणि काव्य बंगाली चित्रपटांइतके कोणी टिपले नसेल. आगगाडीतील प्रणयाचे सवंग काव्य अनेकांनी चिवडले–कथाकारांनीहि, आणि त्याला साथ करणारे संगीत.

त्या आठवणीने अजून आठी चढते–सात वर्षे लोटली तरी. आम्ही 'डी-लक्स' गाडीने दिल्लीला जात होतो. माझ्यावरोबर दोन थोर कवी होते. आत गारवा होता, निळसर तावदानातून बाहेरची एप्रिलची आग प्रसन्न वाटत होती आणि आमच्या गप्पांना रंग भरला होता. तोच कसल्या उठवळ संगीताने त्याचा बेरंग केला. दोष संगीताचा नव्हता, खरे म्हणजे ते संगीत नव्हतेच मुळी. मांडीवरील डवडयाच्या खुंटीशी चाळा करीत गीतांची कर्कश खिचडी कालविणारा तो तरुण उठवळ होता; त्याला कौतुकाचे उत्तेजन पुरविणारे दोन साथीदार होते. विशीपंचविशीतल्या त्या धनिक वणिक बाळांची छवी तुम्हाला अंदाजाने उभी करता येईल. चपचपीत केसांच्या झुलपापासून ते चकचकीत वुटांच्या निमुळतेपणापर्यंत सगळे काही सहीसही पडद्यावरच्या चालू दैवतापासून उचलले असावे: तशी कृतार्थता चेहऱ्यावर होती. ट्रॅन्झिस्टर ही तेव्हा नवलाईची, म्हणून महागाईची, वस्तू होती. तिच्या मालकीचा तोरा आणि संतोष त्या चेहऱ्यावर ओघळत होते. मधूनच संगीताच्या एखाद्या फराटयाने कसल्या फिल्मी मुहब्बतीची याद आल्यामुळे त्या तुष्टपणात भकास छटा चमकून जाई.

आमचा वैताग व्यर्थ होता. इतर सहप्रवाशांपैकी कितीजणांची सहानुभूति आम्हाला मिळाली असती हे सांगणे कठीण. काहीजणांची नक्कीच मिळाली नसती हे स्पष्ट होते: एका डोळ्यात कौतुक आणि किंचित् आदर, दुसऱ्या डोळयात हेवा आणि किंचित् मत्सर, अशा मुद्रेने ते त्या संगीतनिर्मात्या तरुणाकडे पाहात होते.

पण आमच्या दुर्दैवाने मधूनमधून त्या तरुणाला आपल्या त्या अलंकारासह गाडीतून फेरी मारण्याची लहर येई; आणि तो आपल्या श्रीमंतीचे ते आणि अन्य प्रत्यंगे दाखवीत डब्याडब्यातून ठुमकत जाई, मागून ते सखेसोवती असतच. रात्र पडेपर्यंत हे चालले; आमचा वैताग थकला पण त्या गत्रूचे प्रदर्शन थकले नव्हते.

दुसऱ्या दिवशी त्या थंडया गाडीच्या बाहेर पडलो तो दिल्लीच्या जाळात; पण जिवाला बरे वाटले. संगीताचा धाक संपला होता.

चार दिवसांनी मी एकटाच 'फ्रंटिअर'ने परतीच्या प्रवासाला निघालो. दिवस चढू लागला तसा राजस्थानच्या उकाडयाने आणि धुळीने आणि काळया धुराने बेजार झालो. कोटा मागे पडल्यावर दिवस कलू लागला, विंध्याच्या पहाडातील वसंत-पालवीने आणि मधूनच पेटून उठलेल्या गडदलाल पळसाने दृष्टीला जरा गारवा दिला. आणि पाहाता पाहाता शामगढ आले. तो फलाट आणि ती झाडे भेटली तेव्हा मनालाही गारवा आला. दिवसभरच्या एकटेपणाचा ताण एकदम सैल झाला. त्या खुषीत, सावकाश कपडे झटकून आणि तोंडावर हात फिरवून, मी डब्यावाहेर पडणार तोच समोर एक घोळका फलाटावरून जाताना दिसला. शामगढला आणि असा घोळका? निरखून पाहिले तो त्याच्या आघाडीला तोच ट्रॅन्झिस्टरधारी युवक आणि त्याचे सखे होते; आणि त्यांच्यामागून आश्चर्याचे चीत्कार करीत विस्फारल्या डोळयांचे काही इसम चालले होते. शामगढचीच माणसे असावीत ती; सहज किंवा काही जुजवी कामासाठी स्टेशनवर आलेली. छातीशी ते छोटे गाणारे यंत्र घेऊन चालणारा तो शानदार जवान पाहून ते हुरळले असणार. शामगढला हे व्हावे ना?–तो गोंगाट आणि ती गर्दी. मी फलाटावर उतरलोच नाही. दुसऱ्या वाजूच्या खिडकीपाशी सृष्टिशोभा शोधीत बसून राहिलो.

या मधल्या वर्षांत ट्रॅन्झिस्टरची नवलाई ओसरून गेली, म्हणून किंमतही हटली. माझा त्याविषयीचा ग्रह मात्र मावळेना. या मुंबईत कोठेही फिरायला म्हणून जा, ट्रॅन्झिस्टर चुकत नाही; खेळ पाहायला जा, उपाहारगृहात जा, खरे म्हणजे कोठेही जा तो भोंगा चालू असतो, आणि ते भोंगे मिनिटामिनिटाला वदलत असतात. त्या खोक्यातून सवंध गाणे कोणी ऐकत असेल असे वाटत नाही. दिल्लीतल्या कॉलेजांत तर म्हणे अनेक विद्यार्थी ट्रॅन्झिस्टर घेऊन वर्गात येतात; आणि आलटून पालटून ते सुरू ठेवतात. गुरुजींनी आवाज चढवला तर आणखी शिष्य आपले यंत्र सुरू करतात. आमच्या मुंबईचा विद्यार्थी गुरूशी मुकावला करायचा झाला तर मला वाटते स्वत:च्या निसर्गदत्त ध्वनियंत्रावरच अधिक विसंबतो.

ट्रॅन्झिस्टर जवळ असणे यात आता फॅशनचा भाग राहिला नाही की पैशाची प्रौढी उरली नाही. कोणीही घ्यावा. पानवाल्याजवळ तो असतो यात काही मोठेसे नाही; पानवाला म्हणजे तो जरा षौक करणारच. पण झाडूवाल्याकडे किंवा तसा दिसणाऱ्या माणसाकडे–तो पाहिला म्हणजे वाटते त्याची वरी खोड मोडली. सात वर्षांपूर्वी गाडीत आणि स्टेशनात (तोही शामगढच्या) ट्रॅन्झिस्टर मिरविणारा तो पुरुष अजूनही तसेच करीत असेल? त्यावरून आठवले. हे जग अनित्य आहे असे एका विद्यार्थ्याला म्हणावयाचे होते, तो लिहून गेला; This is a transistory world.

मी उद्या दिल्लीला चाललो आहे; येताना ट्रॅन्झिस्टर आणणार आहे; मुलांना तो हवा आहे म्हणून! तेथे स्वस्त पडतो म्हणून तो घेऊन ठेवण्याविषयी तेथील एका स्नेह्याला केव्हाच लिहून ठेवले आहे. मागच्या खेपेस आणायचा राहून गेला.

एवढेच की येताना शामगढच्या फलाटावर तो घेऊन फिरणार नाही. मला फिरवणार नाही. पण ते टळणार, कारण मला शामगढ लागणार नाही, मी विमानाने येणार. पुढे कधी दिल्लीला आगगाडीने प्रवास करताना ट्रॅन्झिस्टर वरोबर घेतला तरी शामगढला तो बॅगेत ठेवण्याचा बंदोवस्त करीन हे निश्चित!



अनुक्रमणिका






> "....उठा सरकार. आता झोपून चालणार नाही. जनता आता भडकली आहे. ती तुमच्या पाठीशी आहे. ती आता तुमचा तनखा दिल्लीहून आणल्याशिवाय रहाणार नाही."



# त न खा



वा. रा. सोनार

चिमूटपूर तसे एक लहानसे संस्थान होते. अखंड भारताच्या नकाशावर पूर्वी असंख्य पिवळे पिवळे डाग होते; पण चिमूटपूरला असे पिवळेपण नकाशावर लाभले नव्हते. नाही म्हणायला तालुक्याच्या नकाशात चिमूटपूर संस्थान दाखविण्यात येई. त्यामुळे देश स्वतंत्र झाला. संस्थाने विलीन झाली. खूप रामायण घडले. पण चिमूटपूर तसेच राहून गेले. चिमूटपूर खालसा करायचे राहून गेले, असा तालुक्याच्या मामलेदाराने वरती रिपोर्ट केला. तो यथावकाश चढत चढत दिल्लीच्या पार्लमेंटपर्यंत गेला. पटेलांच्या कानापर्यंत ही वार्ता गेली. आपल्या पोलादी हातातून हे वेटे चिमुरडे संस्थान कसे निसटले याचा त्यांना भयंकर संताप आला, त्यांनी आपली बुबुळे गरगरा फिरवली. पार्लमेंट हादरले. आपल्या पोलादी पंजाची मूठ टेबलावर दाणदिशी आदळली. तिकडे दिल्लीत टेबलावर मूठ आदळली आणि इकडे चिमूटपूर निमूटपणे मामलेदाराच्या ताब्यात आले. शेवटचे संस्थान विलीन झाले.

चिमूटपूरचा राज फताडसिंग एका दिवसात भारत सरकारचा सामान्य नागरिक झाला. राजाचा नक्षा उतरला. फताडसिंग महाराजांची 'फ' उभ्या चिमूटपूरने पाहिली. किमान पाचशे घरांचा उंबरा असलेल्या या गावाने ही कहाणी पाहिली.

फताडसिंगांना हा अपमान जिव्हारी लागला होता. मनातून ते भयंकर चरफडत होते. पण त्यांच्यापेक्षा शंभरपट मोठ्या महाराजांनी जर नुसता मूग गिळला तर फताडसिंगाना राग गिळण्याशिवाय दुसरे काय वरे गत्यंतर होते ? भारत सरकार उलथून पडायचा डावहि त्यानी रचला होता पण योग्य मदतीअभावी त्यानी तो मागे घेतला. भारताचे स्वातंत्र्य धोक्यात आणायचा कट त्यानी मोठ्या नाखुषीने आपल्या मनातून काढून टाकला. 'भारत-चिमूटपूर भाई भाई' म्हणत म्हणत त्यानी करारावर सह्या केल्या आणि अत्यंत सलोख्याने व प्रेमाने आपले संस्थान खाली करून दिले.

चिमूटपूरच्या महाराजांचे खरे नाव फत्तेसिंह असे होते. परंतु अलीकडे शंभर वर्षात त्याना 'फत्ते' करण्यासारखे काहीच उरले नव्हते. चिमूटपूरची जनता म्हणजे रयत मुळातच भोळी-भाबडी, अडाणी आणि गुलामगिरीत अत्यंत सुखात होती. ती आपल्या राजावर अतिशय प्रेम करी. त्या प्रेमापोटीच ही भोळी-भाबडी, सुखात न्हाऊन निघालेली रयत राजास 'फताडसिंग' म्हणू लागली. वास्तविक सुरुवातीला या नावामुळे राजाना भयंकर राग येई. त्यांचे नाक फेंदारून लाल चुटूक होई. मूठ आवळून म्यानावर घासली दाई; पण प्रधान



अनुक्रमणिका

सताडसिंगांनी त्यांचा हा राग काढून टाकण्यात यश मिळविले. तालुक्याच्या गावातील एका प्राध्यापकास पाचारण करण्यात आले. फताडसिंग हे फत्तेसिंहाचे अपभ्रष्ट रूप हे त्याने अनेक दाखले देऊन पटविले. फत्तेसिंहाचे फतर्हसिंह व ओघातच फताहसिंह आणि 'ह' या अक्षराचा एकाच वेळी 'ड' व 'ग' असे रूप होऊन 'फताडसिंग' झाल्याचे जेव्हा पुराव्यानिशी महाराजांना कळले तेव्हा कुठे त्यांचा राग गेला. मूळ फत्तेसिह् नावाशी अजून बराच सबंध असल्याची सताडसिंगांनी पुस्ती जोडली त्यामुळे तर महाराजांचा आनंद गगनात मावेना !

तीच गोष्ट प्रधान सताडसिंगांची. वास्तविक प्रधानांचे मूळ नाव 'सत्यसिंह' असे होते. पण एकाद्या संस्थानच्या प्रधानाचे नाव 'सत्यसिंह' असणे हा फार मोठा विनोद असल्याचे त्यांच्याच ध्यानी आले आणि राजाच्या व राज्याच्या सोयीसाठी त्यानी स्वार्थत्यागपूर्वक आपले नाव 'सताडसिंग' असे ठेवले. रयतेला फताड-सिंग-सताडसिंगांचे चिमूटपूर म्हणणे फार सोयीचे झाले.

स्वातंत्र्यपूर्व काळात (म्हणजे भारताच्या) चिमूटपूर फार सुखात होते. तेथे वर्तमानपत्र अजिबात येत नव्हते. टपाल आठवड्यातून दोनदाच येई. रयत भोळी, भावडी आणि अज्ञानात असल्याने अत्यंत सुखात होती.

खावे, प्यावे, शिकारीस जावे आणि रात्री राजवाड्यासमोर कधीकधी सगळ्यानी एकत्र नाचावे. (पुढे या प्रकारास भारतीय जनता 'लोकनृत्य' म्हणू लागली !) राजे फताडसिंग राज्यात फाजील लक्ष घालीत नसत. सकाळच्या वेळी एकदाच आपली न्याहारी घेताना मांडीवरच्या केसाळ कुत्र्यांना गोंजारीत राजे फताडसिंग सताडसिंगावर खेकसत.

"राज्य काय म्हणतंय् सताडसिंग ?"

यावर फेटयाला लटकावलेला तुरा अजिबात न हलू देता आणि महाराजांच्या वशीतील उकडलेल्या अंड्यात दृष्टि खुपसून सताडसिंग उत्तर देत, "राज्य आहे तसेच आहे महाराज. काळजीचे कारण नाही !" आपल्या पाच राज्यांच्या सान्निध्यात राहून कधी कधी राजाना शिकारीला जावेसे वाटू लागे. सताडसिंग शिकारीची चोख व्यवस्था करीत. अर्धे संस्थान या कामी जुंपले जाई. एका उंच मचाणावर महाराजांची बैठक तयार करण्यात येई. त्यावर आधी सताडसिंगास प्रत्यक्ष बसवून खात्री करून घेण्यात येई. मचाणात दोन रेशमी दुल्या घेऊन महाराज भरलेली बंदूक उशाशी घेऊन डाराडूर झोपी जात. मध्यरात्रीला फार मोठा कालवा होई. त्या हाकांनी राजांची झोपमोड होई. त्याना पुरी जाग येण्याआधीच मरून पडलेले सावज त्यांच्या मचाणाखाली आढळे. महाराजांच्या परवानगीने सताडसिंग 'महाराजांनी शिकार केल्याचे' घोषित करी आणि मग राजे फताडसिंगांना शाही इतमामात चिमूटपूरकडे आणले जाई. त्यांची आणि त्यानी केलेल्या शिकारीची प्रचंड मिरवणूक चिमूटपूरमधून काढण्यात येई. पाच राज्यांनी ओवाळल्यावर महाराज राजवाड्यात प्रवेश करीत.

असे हे सुखी चिमूटपूर संस्थान खालसा झाले. खरे तर खालसा होणार म्हणजे काय होणार हे चिमूटपूरलाहि ठाऊक नव्हते. पण चिमूटपूर स्वतंत्र होणार असे बरेच दिवस आधी ऐकण्यात येऊ लागले. भारतात स्वातंत्र्यासाठी फार मोठमोठ्या चळवळी कधीपासून चालू असल्याचे चिमूटपूर ऐकून होते. शेवटी एकदाचे स्वातंत्र्य मिळाले असल्याची वार्ताहि चिमूटपूरने ऐकली. पण आता तर उभ्या भारतखंडाची दृष्टि चिमूटपूरकडे वळली होती.

फताडसिंगांना राजवाडा सोडून देण्याचा आदेश झाला. त्याऐवजी त्याना एक प्रचंड बंगला बांधून देण्याचे सरकारने ठरविले. फताडसिंगांना फार समाधान वाटले. नाहीतरी राजवाडा आता खूप जुना झाला होता. काही ठिकाणी पडायला आला होता. अशा खिळखिळ्या वास्तूचे काय करणार, असा राजांनी सवाल केल्यावर त्याना खलिता धाडण्यात आला आणि 'अशा ऐतिहासिक वास्तु जतन करण्याचा सरकारचा विचार आहे. परदेशाहून येणाऱ्या पाहुण्यांसाठी पहायला म्हणून तो खुला ठेवण्यात येईल,' असे सांगण्यात आले. राजवाड्यात पहाण्यासारखे काय आहे म्हणून चिमूटपूरच्या जनतेनेच आधी गर्दी केली. चिमूटपूरला एक फार मोठी सभा घेण्यात आली; आणि भारताला स्वातंत्र्य मिळवून देणाऱ्यांपैकी काहींची तेथे भाषणे झाली. 'येथील जनता आजपासून मुक्त झाली' असे चिमूटपूरच्या जनतेस सांगण्यात आले त्यावर फताडसिंग-सताडसिंगांसह सर्व जनतेने प्रचंड टाळ्यांचा कडकडाट केला. चिमूटपूरची संस्कृति ही आहे तशीच ठेवण्यात येईल असेहि ठणकावून सांगण्यात आले. चिमूटपूरच्या संस्कृतीची वैशिष्ट्ये आम्ही जपू असे एका पांढरा स्वच्छ पोषाख केलेल्या माणसाने हवेत हातवारे करून सांगितल्यावर किंचित् काळ चिमूटपूरची जनता गांगरली. आपल्यात जपण्यासारखे काय आहे, हे त्याना कळेना. पण फार खोलात शिरायची मुळी तेथील भोळ्याभावड्या, अडाणी आणि सुखी जनतेला सवय नव्हती. नाही म्हणायला राजवाड्यातून देशोदेशीहून आणलेले सुंदर स्त्रियांचे नग्न पुतळे हलविण्यात आले. त्यावर एका चिमूटपूरकराने, 'मग राजवाड्यात पाहाण्यासारखं काय उरलं आहे ?' असं भीत भीत विचारल्यावर "आम्हास चिमूटपूरची सांस्कृतिक पातळी उंच करावयाची आहे,"





अनुक्रमणिका

असे संस्थान खालसा करायला आलेल्या एका अधिकाऱ्याने सिगा-रेटचा धूर सोडत सोडत सांगितले. आणि पाठोपाठ ध्यानस्थ गौतम-बुद्ध, लांब स्मित करीत असलेले महात्मा गांधी इत्यादींचे अर्ध-पुतळे बसविण्यात आले. महाराज फताडसिंगांनी आपले पुतळे नव्या वास्तूत आणून टाकले !

सर्वात महत्वाची गोष्ट म्हणजे राजे फताडसिंगांना आपल्या निर्वाहासाठी भारत सरकारकडून काही सहस्रांचा तनखा मंजूर करण्यात आला. यावर 'इतकाच ?' असे म्हणून फताडसिंगांनी थोडे आश्चर्य व्यक्त केले; त्याबरोबर तनखा आणखी काही सहस्र रुपयांनी वाढविण्यात आला. राजांना आता खरेच आश्चर्य वाटले, पण ते त्यांनी प्रकट केले नाही.

संस्थान खालसा झाले त्यादिवशी राजे फताडसिंग यानी प्रधान-जीना समोर येण्याविषयी फर्माविले. आपल्या भावी नोकरीच्या चिंतेत असलेले प्रधान सताडसिंग दुर्मुखल्यासारखे समोर आले. महाराजांना कुर्निसात केला.

"प्रधानजी —"

"जी महाराज–"

"आमचे संस्थान उद्यापासून खालसा होणार ? वहोत दुःख होते आहे आमच्या दिलाला !"

"महाराज, ते सांभाळावे."

"आता कसे सांभाळावे ? उद्या ते खाली होणार !"

"आम्ही आपल्या दिलाबद्दल बोललो सरकार. सरकार, या कंबख्त इंडिया सरकारने जुलुम जबरदस्तीने आम्हास परेशान केले आहे. अफसोस !"

"ओऽह् ! जाऊ द्या प्रधानजी. जाऊ द्या. आपल्या वैभवाच्या ठिकऱ्या पहाण्याचे दुर्भाग्य आमच्या नशिबी होते, कोण काय करणार? .... आता आम्ही तनखा घेऊन काय करणार ?"

"महाराज, असं मोठयानं बोलू नका सरकार. या कंबख्त सर-कारची लंगोटी सोडू नका. परेशान होऊ नका."

"तुम्ही म्हणता तर ठीक आहे. हाय! उद्यापासून आमच्या सुखी राज्यात लोकशाही येणार ना ? अरेरे !—"

"होय महाराज, वहोत खतरनाक गोष्ट होते आहे."

"प्रधानजी, खामोष. उद्यापासून आपल्या चिमूटपूरात लोक-शाही येत आहे आणि तुम्ही अजून राजेशाही भाषा वापरता ? .... आम्ही तुमची गर्दन छाटून टाकू !"

यावर तुरा असलेल्या फेटयाखालची घामाघूम मान, गळा प्रधानजींनी हळुवार पुसून टाकला. आणि कंपायमान आवाजात म्हणाले,

"महाराज, उद्यापासून ही भाषा बंद. हा वेश बंद. आम्ही दरवेशा-सारखे हिंडत राहाणार. आमचा कोण वाली !" आणि प्रधान सताडसिंगांना हुंदके अविरेनात. त्यानी मानेखालच्या फेटयाला नाक पुसले. तुरा सावरला आणि खोल आवाजात पुटपुटले, "महाराज, तुम्हालाहि गर्दन छाटता येणार नाही उद्यापासून—"

"काय ?—" सताडसिंगांच्या या धारिष्टयाने फताडसिंग संतापले. बेभान झाले. त्यानी टाळी वाजवून जोरात म्हटले, "कोण आहे तिकडे —!"

"महाराज, सध्या कुणीच नाही. सगळे कामे शोधायला राज्यातून बाहेर गेले आहेत.–" सताडसिंग

'तिकडे' कुणीच नाही असे निश्चित समजल्यावर महाराजांचा रागाचा पारा पार खाली आला. इतका की ते चक्क सद्‌गदित झाले. आपली मान सताडसिंगांच्या मानेवर टेकीत ते म्हणाले, "प्रधानजी, हे आज शेवटचे नाते. उद्यापासून तुम्ही आमचे साधे नोकर. तुम्हास आम्ही 'पुकारणार' नाही. साधे 'बोलावू.' 'फर्मावणार' नाही साधे 'हितगूज' करू. प्रत्येक क्षणी 'गर्दन छाटता' येणार नाही. उलट 'आपणास हे जमेल काय ?' असा अहिंसक प्रश्न आम्ही विचारू. . . . अरेरे, प्रधानजी काय झाले हे !"

"महाराज, आणि आपणास 'प्रधानजी' म्हणता यावयाचे नाही. भारत-सरकारने यासाठी शब्द तयार केले असून तेच तुम्हास प्रचा-रावे लागतील."

"ठीक तर. आम्ही आपणास मुनीम म्हणू. ठीक ?"

"छे छे : मुनीम नको सरकार. त्यासाठी 'सचिव' हा शब्द चांगला आहे. राज्यात सगळीकडे हाच वापरतात."

"सचिव ?"

"होय –"

---



अनुक्रमणिका

"सचिव तर सचिव ! केवळ या सरकारने आमच्या तनख्याची सोय केली म्हणूनच प्रधानजी— चुकले सचिवजी, आम्ही गय करतो. नाहीतर —" आणि रागाने फुरफुरत फताडसिंगानी आपल्या कमरेला लटकावलेली तरवार उपसून काढण्याचा खटाटोप सुरू केला. ती बाहेर येत नाही हे पाहून सताडसिंगांनी धावत जाऊन महाराजांना आवरले. कोचावर बसविले. पाण्याचा कलश पुढे करून समजावत म्हणाले, "महाराज, खालसा झालेल्या राजाला एवढा क्षोभ ठीक नव्हे. शिवाय—"

"शिवाय काय ?—— बोला सचिवजी !"

"नुसतं सचिव—"

"ठीक आहे. शिवाय काय म्हणालात ?—"

"शिवाय आपणास ही तलवार अशी कमरेस लटकावून फिरता येणार नाही उद्यापासून."

"कां ?—" महाराज पुन्हा क्रोधाविष्ट झाले. थरथर कापू लागले. आणि मोठ्या प्रयासाने त्यांनी तलवार म्यानातून दोन इंच बाहेर काढली. आणि कडाडले, "म्हणजे, म्हणता काय ?"

"म्हणजे महाराज, आपणास मामलेदार कचेरीतून याचा परवाना काढावा लागेल ! असे हे हत्यार जवळ बाळगता येणार नाही. सरकारचे कायदे महा गाढव आहेत."

"ओऽह् ! अफसोस !!" आणि फताडसिंग राजांच्या अंगाचा तिळपापड झाला. त्यांनी कमरेची तलवार तावडतोब कमरेपासून वेगळी केली आणि दूर भिरकावली. भग्न हृदयाने, समोरच लावलेल्या एका मोगल चित्रातील राजासारखे भिंतीला कोपर टेकून उभे राहाण्याची कोशिश केली. प्रधानजी त्यांना बराच वेळ वारा घालीत बसले. कोपर दुखून आल्यावर सरकार-स्वारीचा क्षोभ निवळला !

—आणि त्या दिवसानंतर चिमूटपूरचे चित्रच बदलले. सरकार फताडसिंग राजवाडा सोडून नव्या बंगल्यात राहायला गेले. राजवाडा खाली करून तो सर्वांना खुला केला. 'रयत' आता 'जनता' झाली, आणि 'जनता' झाल्यामुळे आपोआपच धीटपणा अंगी आला. राजवाडा पहाताना खुशाल सिंहासनावर बसायचा धीटपणाहि कुणी कुणी दाखवू लागले. चिमूटपूरच्या जनतेला हा उद्योग बरेच दिवस पुरला.

राजे फताडसिंग आता तलम झिरझिरीत शर्ट घालून जुन्या मासिकांचे गठ्ठे चाळीत वेळ घालवू लागले. त्यांना वेळेचे काय करायचा हा प्रश्न सतावू लागला. शिकारीला जाता येईना. मनसोक्त मद्यपान करता येईना की राण्यांच्या संख्येतहि भर घालता येईना. राजे या जुलमाला भयंकर विटले. पण संतापून काय होणार ? कमरेला लटकावलेल्या तलवारीशिवाय संताप व्यर्थ होता ? तरीहि कधी कधी राजांचा वेळ चांगला जाई.

फताडसिंगावर गावाचे फार प्रेम होते. खालसा झाले म्हणून काय झाले, कधीतरी ते या गावाचे राजे होते ना ! त्यामुळे प्रजाजन काही प्रथा जपत होते; राजांच्या वाढदिवशी सगळे चिमूटपूर बंगल्यावर लोटत असे.प्रत्येकास पेढा देण्यात येई.सुवासिनींची खणा-नारळाची ओटी भरण्यात येई. त्यामुळे स्त्रियांची एकच झिम्मड उडे. राजे फताडसिंगाना दिवसभर ओवाळण्यात येई. ओवाळून घेताना राजे थकून जात शेवटी ! दसरा असो, शिमगा असो फताडसिंगाना योग्य तो मान-मरातब देण्यात येई. आपल्या तनख्यातला काही भाग ते या प्रसंगी, मोठ्या कष्टाने का होईना, खर्च करीत. मात्र इतकेच. यापलीकडे त्यांचा चिमूटपूरशी संबंध नव्हता. फार तर लोक-नृत्यात स्वतः जातीने भाग घेऊन जनतेची करमणूक करीत आणि शिवाय संस्कृतीचे जतनहि !

चिमूटपूरहि झपाट्याने बदलू लागले. गावात निवडणुका आल्या. मते द्यायची म्हणजे काय हे प्रत्येकाला सांगण्यात आले. साक्षरतेचे वर्ग सुरू झाले. दारूबंदी कायद्याने असताना दारू पिणे वाईट कसे हे जोरात सांगितले जाई. बायका पाटचा पेन्सिली घेऊन 'समाज-कल्याणा'त जमू लागल्या. चिमूटपूरची स्त्री जागी झाली. गावात आता दिवसाला दोन-तीन वेगवेगळ्या जीप-गाड्या येरझारा घालू लागल्या. पांढऱ्या पोषाखाची, अंगापिंडाने भरलेली, तुकतुकीत दिसणारी माणसे त्यातून उतरू लागली. कधी बुद्धासारखे तर कधी गांधीच्या पुतळ्यातल्या स्मितासारखे स्मित करीत चिमूटपूरला सुधारू लागली. वेगवेगळी विकासाची कामे काढण्यात आली. कधीकधी राजे फताडसिंगांच्या वाड्यावर ही तालुक्यातून आलेली मंडळी रात्र-रात्र बसत. मोठमोठ्याने हसून बंगैला डोक्यावर घेत. कोंबडीचे जेवण शिजू लागले. महाराज सर्वांचे जातीने अगत्य

# वेदना?

## २ ॲनासिन घ्या–
## आराम जलद!



शारीरिक वेदना कधीं एकट्याच उद्भवत नाहींत. बहुधा त्यांच्यावरोबरच, ताण, उदासीनता आणि थकवा यांचाहि त्रास होत असतोच – या सर्वांमुळें वेदना आणखी वाढतात आणि आपण अधिकच अस्वस्थ होतां. अशा स्थितींत तावडतोब ॲनासिन घ्या आणि पहा ४ प्रकारें त्याचा कसा जलद परिणाम होतो तें!

१. ॲनासिन वेदनांत आराम देतें—अगदीं जलद!
२. ॲनासिन थकवा दूर करतें—अगदीं जलद!
३. ॲनासिन उदासीनता नाहींशी करतें—अगदीं जलद!
४. ॲनासिन मज्जातंतूचा ताण कमी करतें—अगदीं जलद!

याचें कारण ॲनासिन हें डॉक्टरांच्या बिनधोक प्रिस्क्रिप्शनप्रमाणेंच औषधांचें मिश्रण आहे. वेदनांवर आराम देणाऱ्या अन्य कोणत्याहि औषधांपेक्षां भारतांतील अधिक लोक ॲनासिनच वापरतात, यांत कांहींच आश्चर्य नाहीं.

पुन्हां कधीं शारीरिक वेदना होऊं लागतांच ॲनासिन घ्या. ॲनासिन डोकेदुखी, सर्दी, फ्लू आणि दांतदुखी यांतहि आराम देतें. यासाठीं ॲनासिन नेहमींच संग्रहीं ठेवून द्या.

**नेहमी ॲनासिनचीच मागणी करा.**

# ॲनासिन

**अधिक गुणकारी आहे
कारण तें ४ प्रकारें
कार्य करतें**




Regd. user: Geoffrey Manners & Co. Ltd.








अनुक्रमणिका

राखीत. सर्वांना खूष ठेवीत. त्यांच्यासह कधी कधी तालुक्याला जात. कधी मुंबईपर्यंत जाऊन येत आणि बऱ्याच दिवसांनी परतत. त्यांच्या पाचहि खालसा राण्या त्यांची आतुरतेने वाट पहात ओळीने उभ्या राहात. सचिव सताडसिंग आपल्या हातांचा आधार देत राजाला राण्यांच्या स्वाधीन करीत.

इकडे गावची भरभराट पारतंत्र्यात नव्हती इतकी वेगाने वाढू लागली. गावात वीज आली. पाणी आले. ग्रामपंचायतीचे हपीस आले. त्यामुळे सरपंच आले: त्याना निवडून देणारे सभासद अर्थात् ओघाने आले. गांधींच्या काळात खुद्द नव्हती इतकी अमाप खादी चिमूटपूरात शिरली. एकाच छापाची कुडते शिवणारा शिंपी चिमूटपूरला स्थायिक झाला. त्याचे बस्तान चांगलेच बसले ! त्याला वेळ मिळेनासा झाला.

राजे फताडसिंगांचा तनखा सुरळीत चालू होता, पण नोकर-चाकर वैतागले होते. त्याना पगार वेळेवर मिळेनासा झाला. अंगावरचे कपडे जीर्ण झाले. फेटयाला तर फाटाच मिळाला. शेवटी कंटाळून काहीनी शाळा-पंचायतींतून नोकर-गडयांची कामे धरली. सचिव सताडसिंगाचाहि पगार तुंबू लागला. तेहि महिन्याच्या एक तारखेस सरकारांच्या वाडयावर येऊ लागले. त्यांच्या तब्येतीची मासिक चौकशी करून मिळेल तो हिस्सा घेऊन निघून जात. आता त्यांच्या डोक्यावर तुर्रेबाज फेटयाऐवजी पांढरी स्वच्छ टोपी दिसू लागली. त्यांचा चेहरा जास्तच तेजस्वी दिसू लागला त्यामुळे. जे सताडसिंग संस्थानात राजे फताडसिंगापुढे चळचळा कापत, तेच आता मुत्सद्दीपणाने स्वत:ला व राजाना न समजणारी भाषणे धडधडा म्हणू लागले. हळुहळू सचिव चिमूटपूरातील एक प्रतिष्ठित व्यक्ति म्हणून गणण्यात येऊ लागली. आणि बघता बघता सचिव चिमूटपूरचे अनभिषिक्त सम्राट झाले !

असे वर्षानुवर्षे चालले होते. त्यात फारसा बदल घडत नव्हता. घडणारहि नव्हता. पण एक दिवस विपरीत घडले. म्हातारपणाकडे झुकू लागलेले सचिव सताडसिंग भल्या पहाटे चिंताक्रांत अवस्थेत फताडसिंग राजाकडे आले. त्यानी काखोटीत आजचे वर्तमान-पत्र घेतले होते. वाडयात शिरून त्यानी तो पुनश्च बंद केला. चार-पाच शयनगृहांवरून जातांना सचिव मुत्सद्दीपणाने खोकत गेले. आणि शेवटी एका शयनगृहावर त्यानी थाप मारली. सरकार फताडसिंगानी झोपेतूनच "कोण आहे रे–" म्हणून ललकारी दिली. पण सचिव सताडसिंगांचा मऊ आवाज ऐकल्यावर बऱ्याच वेळाने दार उघडण्यात आले. राणी अलगद दूर होऊन पडदानशीन झाली.

अशा अवेळी सकाळी नवाच्या सुमारास झोपमोड झाली म्हणून फताडसिंग भयंकर चिडले. टाळ्या वाजवून घोगऱ्या आवाजात हाक दिली, "कोण आहे रे तिकडे–गिरफ़दार करा—"

"महाराज, जागे व्हा महाराज ! आपले संस्थान खालसा होऊन वीस वर्षे लोटलीत सरकार, तिकडे आता कुणी नाही. सगळे गेले साखर कारखान्यात. उठा आता––"

"कोण सचिव ?"

"होय सरकार."

"यावेळी इकडे येणं केलंत ?"

"प्रसंगच तसा बाका पडल्यावर काय करणार–"

"काय झालं सचिव?" महाराजांनी एक हात छातीवर ठेवला.

"जीवन-मरणाचा सवाल आहे सरकार."

"कुणाच्या जीवन-मरणाचा ?... अरे मग सरपंचाकडे जा–"

"कुणाचा काय सरकार, तुमचा आमचा—"

"काय बकताहात ? शुद्धीत आहात की उपसू तलवार–"

"परवान्याची मुदत संपली आहे सरकार. शिवाय आता तिला नक्कीच गंज चढला असेल."

"खामोष !"

"ही खानदानी भाषा शोभत नाही आता––"

"—कामाचं बोला, सचिव !"

"तुमचा तनखा सरकार, तनखा—"

चिमूटपूरच्या कुणी 'तनखा' नावाच्या मुसलमान व्यक्तीने त्रास द्यावा हे महाराजांना अजिबात पटले नाही. शिवाय संस्थान विलीन झाल्यानंतर निधर्मी राज्यात असे व्हावे, याचे सरकार-स्वारीस सखेद आश्चर्य वाटले.

"मी म्हणतो आधी मामलेदार कचेरीत निषेध नोंदवा. कुठे असतो हा ? धंदा काय त्याचा ?"

महाराजांचा घोटाळा लक्षात घेऊन सचिवांनी कपाळावर हात बडविला. आणि पूर्ण जागे करण्याच्या इराद्याने ओरडले.

"सरकार, आपला तनखा. पगार ! पेन्शन !!"

आणि महाराजांना आपली चूक कळून आल्यावर खूपच गंमत वाटली. सचिवांच्या पाठीवर एक हलकीशी थाप मारून ते म्हणाले,

"आँ ?. . . आमचा तनखा ?. . . या महिन्याचा तनखा इतक्या लवकर ? अरे कमाल आहे या सरकारची !"—

सचिव सताडसिंगानी काखोटीचे वर्तमानपत्र उलगडून ते महाराजांपुढे फडफडावले. "महाराज, डोळे चोळा. नीट ऐका. हे वाचा—आपला तनखा बंद होणार. आहात कुठे ?"

आणि हे ऐकताच सरकार-स्वारींनी टुणकन् उडी मारली. पलंगावरून जमिनीवर ते थरथरत उभे राहीले. सचिवांच्या हातातला पेपर हिसकला. पुन्हा त्यांच्याच अंगावर ते भेंडोळे फेकून देत खेकसले,

"सचिव, आम्ही कधी काही वाचतो का ? आमची बेअदबी करता? वाचा मोठ्यानं—"

सचिवांनी संस्थानिकांचा तनखा बंद होणार असल्याची बातमी मोठ्याने वाचून काढली. एका हाताने पलंगाला धरीत महाराज दुःखावेगाने पुटपुटले, "शक्य नाही."

"महाराज, शक्य नाही कसे ? सरकारचा आदेश झाला की आपले काय चालणार ?"

"बापरे !"

आणि राजे फताडसिंगापुढे उभा राजवाडा, चिमूटपूर गरगरा फिरू लागले. आता त्यानी तालुक्याला वरचेवर कसे जायचे ? त्याना जागचे हलता येणार नव्हते. मुंबईच्या वाऱ्या करता येणार नव्हत्या. पाच राण्यांचा खर्च कसा भागवायचा हा प्रश्न भेडसावू लागला. बरे, त्याना माहेरी पाठवायचं म्हटलं तरी पंचाईत. त्या सगळ्याच राजघराण्यातल्या कन्यका ! त्या प्रत्येकीच्या माहेरींचाहि तनखा बंद. हे फार भयंकर होते. यातून मार्ग काढायला हवा होता. मार्ग काढण्यासाठी पूर्वी प्रधान असे. आता सचिव होते पण ते अर्धवेळच येत. सचिवांकडे केविलवाण्या दृष्टीने पहात महाराज म्हणाले,

"सचिव—"

"बोला सरकार."

"आम्ही तुमचा तुंबलेला पगार या तनख्यात देऊन टाकू. यातून मार्ग काढा. आम्हास सुचेनासे झाले. आहे."

"सरकार, घाबरू नका. या तुमच्या इमानी नोकराच्या रक्तात तुमच्याच अन्नातले मीठ आहे. त्याला जागूनच—"

"ते जाऊ द्या प्रधानजी, यातून मार्ग काय?"

"प्रधानजी नाही आता. सचिव !"

"सचिव, सचिव, सोडवा आम्हाला यातून—"

"सरकार, माझ्या डोळ्यासमोर एकच युक्ति आहे—"

"बोला. बोला. सांगा एकवार मुनीमजी."

"अहो, मुनीमजी नाही हो, सचिव."

"सचिव, असा कां घेताहांत बरं जीव !. सांगा ना."

"महाराज, ज्या शस्त्राने आपला गळा कापला, त्यानेच हा वाद उलटवू या."

"अफसोस्. आमचा परवाना—"

"सरकार, आपण पूर्वीचे संस्थानिकच राहीलात शेटजी ! मी लोकशाहीबद्दल म्हणतोय "

"लोकशाही ?"

"हो. लोकांचे राज्य आहे ना हे ?"

"अलबत्."

"मग, लोकांनी ठरविले की आपला तनखा मिळायलाच हवा, तर कोणते सरकार आहे लोकांची इच्छा पायी तुडवून लोकशाहीचा मानभंग करील—"

"सचिव, सचिव. . . कमाल केलीत ! उगीच नाही आम्ही तुम्हास प्रधान केले होते !"

"सरकार, पण आता तर मी अर्धवेळ स्टॅंप-वेंडर आहे ना. उपयोग काय अकलेचा, या स्वतंत्र भारतात सरकार?"

"सचिव, आम्ही आपल्या अकलेची खिदमत करू."

"भाषा. भाषा महाराज. लोकशाही भाषा वापरावी."

"चुकलं सचिव. आम्ही आपल्या अकलेला योग्य संधि व विकासास वाव मिळवून देऊ.— बरोबर ?"

"हां, हे कसं लोकशाहीतल्यासारखं झालं ! बरं, ते असो. मी सांगणार होतो ते हे की आपण उभ्या चिमूटपूरला जागे करायचे!"

"म्हणजे ? अजून चिमूटपूर झोपलेले आहे ? बदतमीज."










अनुक्रमणिका

सरकार, जाऊ द्या. तसे जागे आहे. त्यास जागृति आणायची आहे. आपल्या माजी राजाचा तनखा बंद पडतो या प्रश्नावर चिमूटपूरातल्या तमाम जनतेने मामलेदार कचेरीत घेराव करायचे."

"काय बोलताहात हो ! काय करायचे म्हणालात ?"

"घेराव ! घेराव !!.... काय करणार, तुमचा तनख्याशिवाय संबंध आहे कुठे लोकशाहीशी. अहो, हल्ली जनता घेराव करतात, एकाद्या प्रश्नावर. आहे ठाऊक ?"

"म्हणजे लोक जेवण करतात, फार काय, काम करतात, कटींग करतात हे ठाऊक आहे. पण घेराव नाही."

"घेराव, म्हणजे सगळ्या बाजूनी घेरून टाकायचं !"

"मग असं सांगा ना. गोकुळात कृष्णाला गोपी जसं घेरून टाकायच्या तसंच ना ?"

"तुम्ही जन्मजात संस्थानिक ! दुसरी कोणती उपमा सुचायची म्हणा आपल्याला. तुम्ही म्हणता त्यात थोडा फरक आहे."

"काय तो ?"

"कृष्णाला गोपी घेरतात तसं नाही; त्याऐवजी तुमचा तनखा उशीरा आला की तुम्हाला तुमच्या राण्या ज्याप्रमाणे—"

"बापरे ! नको ती आठवण. अरे त्या सळो की पळो करून सोडतात. सगळ्या दिशांनी भंडावून सोडतात. अरे, पळायला दिशा उरत नाही."

"बरोबर आहे ! राण्याच इतक्या."

"काय म्हणालात ?"

"बस. तुम्हाला घेराव नक्की समजलाय्. यालाच घेराव म्हणतात. सळो की पळो करून सोडायचं, पण पळू मात्र द्यायचं नाही."

"मग तुम्ही आमच्या तनख्यासाठी—"

"हो हो ! तुमच्या तनख्यासाठी घेराव टाकणार–"

"ठीक तर. आम्ही तुमच्या पाठीशी आहोत."

"वारे सरकार. प्रश्न तुमचा आणि तुम्हीच आमच्या पाठीशी ? अहो, लोकशाही आहे ही ! . . . आम्हीच तुमच्या पाठीशी. . ."

"कुणी का कुणाच्या पाठीशी असेना. आपला तनखा तेव्हा–"

"महाराज, पण यासाठी आपणास आपल्या तनख्यातून थोडा खर्च करावा लागेल."

"म्हणजे ?"

"आम्ही आपणास ग्रामपंचायतीच्या निवडणुकीचं तिकीट देतो. आपण ते घ्यावं —"

"तिकीटाचा दर काय तुमच्या ?"

"सरकार, अहो याला दर नसतो. थोडा खर्च येतो."

"सचिव, आम्हाला बनविता ? अहो, उभं आयुष्य आणि अर्धं संस्थान आमचं तिकीट घेण्यात घालविलं आम्ही..... आता आयुष्यात एकहि तिकीट नको."

"सरकार, तनखा हवा ना—"

"सचिव, कां आम्हास असे खिंडीत पकडता ?"

"सरकार, आपण ग्रामपंचायतीत उभे राहा. आम्ही तुमच्या पाठीशी आहोत. मूठ थोडी सैल ठेवा. जिभेत साखर पेरा. निवडून आलात की—"

"तुम्ही म्हणता ते इतकं का कठीण आहे सचिव ?"

"कठीण ? अहो, राजा होणं सोपं. त्यासाठी एकदाच आयुष्यात आपल्या राजा असलेल्या बापाच्या पोटी जन्म घ्यायचा की झाले ! पण ग्रामपंचायतीत सरपंच होणे हे महाभयंकर दिव्य आहे !–"

"आपण म्हणता तर आमचंहि एक तिकीट फाडून टाका. –आणि आमची जागा सांभाळून ठेवा !"

"महाराज, मी ग्रामपंचायतीच्या तिकीटाचं म्हणतो आहे. नाटकाच्या नाही."

"असू द्या. असू द्या. तुम्ही फक्त तिकीट फाडा, आम्ही जागेचं पाहू."

"मी लागतो कामाला. तुम्ही सरपंच निवडून आलात् की हां हां म्हणता आपल्या चिमूटपूरचे, आपल्या तालुक्याचे, राष्ट्राचे... चित्र बदलून जाईल !"

"तनखा सुरू होईल ना पण ?"

"अर्थात् !"

–महिनाभर मग निवडणुकांची धुमश्चक्री चालली. चिमूटपूरच्या साडेतीन बोळींतून सचिव सताडसिंगांनी सभांचा धडाका लावला. राजाचा तनखा चालू राहायलाच हवा, हा चिमूटपूरच्या जनतेचा मानबिंदू असल्याचे त्यानी चिमूटपूरच्या जनतेला जोरजोरात घसा फोडून सांगितले. 'राजाचा तनखा आम्ही परत आणणारच' या पालुपदातल्या 'च' वर सचिवांनी प्रत्येक सभेत जोर दिला. हा तनख्याचा मंगल-कलश दिल्लीहून चिमूटपूरात आणायचा आहे, असे भावनिक आवाहन वृद्ध सचिव सताडसिंगांनी जनतेला केले; साहजिकच चिमूटपूरच्या भोळ्या–भावड्या जनतेला ते पटले.

चिमूटपूरच्या निवडणुकीत राजा फताडसिंगांना प्रचंड मते मिळाली आणि त्यांना सरपंच करण्यात आले. आपली हत्तीवरून मिरवणूक काढण्यात यावी, अशी सरकार फताडसिंगांनी इच्छा प्रदर्शित केली. पण खालसा झाल्यावर संस्थानात हत्ती उरले नाहीत, शिवाय लोकशाहीत निवडून येणाऱ्यांची मिरवणूक ठिकठिकाणी बैलगाड्यातून काढण्यात येत असल्याचे सचिवांनी सांगितले. तेव्हा शिवाय लोकशाहीत निवडून येणाऱ्यांची मिरवणूक ठिकठिकाणी बैल-गाड्यांतून काढण्यात येत असल्याचे सचिवांनी सांगितले. तेव्हा एकाच गाडीस एकावन्न बैल जोडून फताडसिंगांची प्रचंड मिरवणूक काढण्यात आली. चिमूटपूर लता-पल्लवांनी शृंगारण्यात आले. गुलाल उधळण्यात आला. घोषणा दुमदुमल्या आणि खूप उत्तर-रात्री मिरवणूक सरकारांच्या निवासस्थानी येऊन तिचे सभेत रूपांतर करण्यात आले. सरकार फताडसिंगांचा जाहीर सत्कार करण्यात आला. खूप भाषणे झाली. शेवटी सगळ्या सभेने घोषणा दिल्या–

'सरकार फताडसिंगांचा विजय असो.'

'राजे फताडसिंग झिंदाबाद.'

'सरकार फताडसिंगांचा तनखा चालूच ठेवा.'

'लोकशाहीचा विजय असो.'







अनुक्रमणिका

त्या रात्री खूप उशीरा चिमूटपूर झोपी गेले.

रात्र वरीच कलली. सगळ्या वाड्याची दारे नीट लागली की नाहीत हे पहायला सरकार जातीने उठले. पेट्रोमॅक्स हाती घेतला. चिमूटपूरलाहि कृतज्ञतेने एकवार डोळे भरून पहायचे त्यांच्या मनात आले. प्रजेबद्दल राजाला–खालसा म्हणून काय झाले–प्रेम हे वाटायलाच हवे. आणि आता तर सरपंचपदाची माळ गळ्यात येऊन पडल्यावर जबाबदारी वाढली. सगळ्या बारीक सारीक गोष्टीत जातीने लक्ष घालण्याच्या निश्चयाची अंमलबजावणी त्वरित सुरू केली. म्हणूनच ते गावाकडे चौफेर दृष्टि टाकून पहात राहिले. आणि काय आश्चर्य !

सारे चिमूटपूर शांत झोपी गेले असतानाहि चार-पाच मनुष्याकृती झपाट्याने वाड्याकडे येतांना महाराजांना दिसल्या. ही कोण माणसे ? अशी भलत्या वेळी ? निवडणुकात पराभव झालेली तर ही कुणी सूड घ्यायला आली नाहीत ? राजा जरा चरकलेच.

सरकार फताडसिंगांनी फारसा धोका नाही हे पाहून मुख्य प्रवेश-द्वार उघडले. एक नखशिखांत पांढरा पोषाख केलेला शिसवी रंगाचा माणूस पुढे झुकला. त्याने राजास प्रणाम केला. महाराजांचे अभिनंदन केले. राजांनी दबकत त्याचा स्वीकार केला.

"कोण ? कोण रे तू ?"

"महाराज, आपले अभिनंदन करायला आलोय."

"कां ? सभेला नव्हता वाटतं तुम्ही ?"

"महाराज ! क्षमा असावी. पण आम्ही सभेला कधीच येत नसतो. सगळ्या सभा रात्री होतात. आणी ही आमच्या धंद्याची वेळ असते सरकार !"

"धंदा ? कसला धंदा ?"

"सरकार, संस्थाने बुडाली आणि आम्हाला हा धंदा सुरू करावा लागला. सरकार, राजवाडा दाखविण्याचे कामी माझी नेमणूक झाली होती. पण त्यात भागत नव्हते ! रात्रंदिवस प्रत्यक्ष राजवाड्यात राहूनहि उपाशी मरू लागलो. एक दिवस वैतागून नोकरी सोडून झोपडीकडे वळलो."

"म्हणजे ? कुणी पुढारी की काय तुम्ही ? समाज-सेवा सुरू केली की काय ?"

"नाही सरकार. समाजसेवेपेक्षा राजवाडा दाखविण्याची नोकरी काय वाईट होती ? आमचा रावता हल्ली नदीकाठी असतो. आत्ताच भट्टी लावून इकडे आलो मालक.—"

"भट्टी ?"

"होय सरकार. गेले ते दिवस. पूर्वी गुत्ते असत. खुद्द महाराज तीन–तीन दिवस बेहोश राहून धंद्याला सक्रिय प्रोत्साहन देत. दुर्दैवाने आता दारूबंदीवर व्याख्याने होतात, म्हणून बरे—"

"हां हां ! तुमची दारू-भट्टी आहे होय ? हातभट्टी ? बेकायदा! – कंबख्त, तुम्हाला आम्ही कडक शासन करू. तुमची गर्दन — हां, ती नाही छाटता येणार. पण तुम्हाला अटक करू."

"महाराज. महाराज, थोडा धीर धरावा आपण. आपण विसरू



जुनी थेटरें, जुने प्रयोग. . . ५

## आजच्या प्रकाशकांना नार्मा पण फुकट सल्ला

किर्लोस्कर नाटक मंडळीने नाटकगृहामध्ये नवीन नवीन सुधारणा केल्याचे दिसून येते. मंडळीच्या १९१२ सालच्या प्रेमशोधन नाटकाच्या हँडबिलात काही सुधारणा आढळतात.

ज्या कुलीन स्त्रियांची पुरुषांच्या जागेत बसण्याची इच्छा असेल त्यांनी त्या जागेचे तिकीट काढल्यास त्यांना तेथे बसता येईल.

क्लोक रूम:—नाटकगृहात प्रेक्षकांच्या सायकलस, छत्री, काठ्या, ओव्हर कोट वगैरे सामान सांभाळण्याकरिता स्वतंत्र दालन ठेवण्यात आले आहे. त्यात सामान ठेवणे झाल्यास प्रत्येक जिनसास एक आणा घेण्यात येईल.

नाटकाच्या वेळी एक आणा घेऊन नाटकाची पुस्तके वाचावयास मिळतील. मात्र पुस्तकाची किंमत डिपॉझिट ठेवली पाहिजे.

नवीन सोय:—कोणत्याहि वर्गातील, बाकाच्या सीट रिझर्व करणे झाल्यास, प्रत्येक सीटला दोन आणे घेऊन दरवाजे उघडण्यापूर्वी दोन तास अगोदर कळविल्यास रिझर्व करण्यात येईल.

–केटी

नये सरकार की आता आपली जबाबदारी वाढली आहे. आपण सरपंच आहात चिमूटपूरचे. असा उतावीळ निर्णय घेऊ नका...आपण याचा स्वीकार करावा !" असे समजावणीच्या सूरात त्या इसमाने सांगून कमरेच्या कश्यातून शंभराच्या नोटांचे एक पुडके हळूच फताडसिंगांच्या पायाशी ठेवले. शाही मुजरा केला.

"आमची वहिवाट ऋजू करून घ्यावी सरकार. आमच्या हप्त्याचा स्वीकार करावा, सरपंचांनी !"

"हप्ता ?" महाराज चक्रावले.

"होय महाराज !"

"हां हां ! म्हणजे तनखा म्हणायचंय् तुम्हाला !"

त्यावर त्या काळ्या इसमाने शुभ्र दंतपक्तींचे प्रदर्शन करीत दिलखुलास हास्य केले आणि कींव करावी तशा सुरात फताडसिंगास म्हणाला,

"छे : छे : ! हा हप्ता. एकवेळ तनख्याला उशीर होईल. रकमेत चूक होईल. पण हप्ता अगदी वेळशीर गेलाच पाहिजे, असा आमचा वहिवाट आहे. मग इमानदारी काय राहिली धनी !"

हा सूक्ष्म फरक महाराजांच्या डोक्यातून आत शिरायला थोडा वेळ लागला. त्याआधीच त्यानी ते नोटांचे पुडके पटकन् उचलून







नव्याने शिवलेल्या लांब अंगरख्याच्या खिशात ठेवून दिले.

"पुढं बोला !"

"दरेक हप्त्याला ही फुलाची पाकळी सरपंचांनी स्वीकारावी एवढीच या चरणाशी प्रार्थना आहे."

"ठीक आहे. ठीक आहे. आत्ता पुढचा हप्ता ?–"

"आठा दिवसानी पुन्हा सरकार. तनख्यासारखा महिन्यातून एकदा नाही. याबाबत आपण इंग्लंड अमेरिका. . . !"

आणि इतक्या सुधारलेल्या हप्ता पद्धतीचा राजाना विस्मय वाटला. स्वतःच्या मागासलेपणाची जरा लाज वाटली.

त्या काळ्या माणसाने पुन्हा अदबीने नमस्कार केला. अणि तोंडाने शीळ काढीत टाळी वाजवली. त्यासरशी चार माणसे पुढे धावली. एका ओळीत उभे राहिलेले त्यांचे निष्पाप चेहरे राजांनी उजेडात निरखून पाहिले.

"हे कोण ?" महाराजांनी पृच्छा केली.

"सरकार, हे पलीकडच्या गावाचे. संस्थानात नव्हते ते गाव. पण आता आपल्याच ग्रामपंचायतीत ते आले आहे.

"काय काम आहे यांचं ?"

"सरकार, हे आकडे घेतात वेगवेगळया खेडयातून. समाजवाद देशात आणावा म्हणून यानी शॉर्टकट् शोधून काढला आहे––"

"आकडे ?"

"सरकार, तूर्त आपण हप्ता घ्यावा. ते एक शास्त्र आहे. पुढल्या हप्त्याचे वेळी सांगू–"

"हप्ता ? पुन्हा हप्ता ?... द्या लवकर."

आणि महाराजानी चिमूटपूरच्या दिशेने एकवार धावऱ्या धावऱ्या पाहून घेतल्यावर हप्त्यांची पुडकी खिशात कोंबली. आता अधिक वेळ थांबल्यास ही मंडळी कुरापत शोधून पैसे परत मागतील या भीतीने राजांनी दोन्ही हात आशीर्वादासाठी उंच करावे तसे करीत सर्वांचा निरोप घेतला.

"चला आता. आपापल्या कामाला लागा."

"गरीबांकडे लक्ष ठेवा सरकार !"

आणि झपाझप पावले टाकीत ती टोळी काळोखात दिसेनाशी झाली.



सरकारांनी दोन्ही खिशातली नोटांची पुडकी एकवार पुन्हा बाहेर काढली. छातीशी घट्ट धरली. कुरवाळली. त्यांचे दीर्घ चुंबन घेतले. आणि कोणत्या शयनगृहाकडे जावे याचा विचार करीत मागे फिरले.

दुसरे दिवशी सचिव सताडसिंग पहाटेच सरकारांच्या निवासस्थानी आले. त्यानी सगळा वाडा डोक्यावर घरला.

"उठा सरकार. आता झोपून चालणार नाही. जनता आता भडकली आहे. ती तुमच्या पाठीशी उभी आहे. ती आता तुमचा तनखा दिल्लीहून आणल्याशिवाय राहणार नाही. त्यांना सामोरा या. विश्वासात घ्या." महाराज फताडसिंगांची झोप चाळवली गेली. किलकिल्या डोळयानी त्यानी वृद्ध सचिवाकड पाहिलं. त्यांची आग मस्तकात गेली. त्यांच्या अंगावर खेकसून सरकार स्वारी कुरकुरली, "सचिव, कसला तनखा म्हणता ?"

"म्हणजे ?. . . सरकारानी नीट जागे व्हावं."

"आमचे डोळे पूर्ण उघडले आहेत. आम्हास आता शिकवू नका. काखेत कळसा असून गावाला वळसा घ्यायला सांगता आहात. वेवकूफ !"

"महाराज, भाषा भाषा महाराज.– महाराजानी शांत व्हावे, आणि तनख्याचा विचार–"

"तनखा गेला जहन्नममध्ये. समजलात ! आधी मी सांगतो तेवढं करा. आपल्या पंचक्रोशीत एकूण भट्ट्यांची संख्या किती आहे त्याची आकडेवारी काढा."

"केळयांची भट्टी ?"

"आहे ! सचिव, तुम्ही पूर्णवेळ स्टॅंप-वेंडर व्हा आता. अहो, हातभट्टी––"

"हातभट्टी ? दारू ?"

"सांगतो तेवढं करा. आणखी पुष्कळ कामे काढायची आहेत– ती मलाहि ठाऊक नाहीत. पुढच्या हप्त्याला पाहू.–"

"हप्ता ?–– महाराज, आपली प्रकृति ठीक नाही का ?"

"मी हप्ता म्हणालो का सचिव ?... हां ! म्हणजे पुढच्या आठवडयात म्हणायचं मला. तुम्ही चला आणि असे पहाता काय फुलटाइम प्रधानासारखे––"

महाराजानी एक नोटांचे पुडके सचिवाच्या दिशेने फेकले. "हा तुमचा थकलेला पगार !"

सचिवांनी आश्चर्याने तोंडात बोट घातले. सरकार फार दिवसात इतके खूष दिसत नव्हते.

"येतो सरकार. चिंता नको."

आणि आपल्या पंचक्रोशीतल्या भट्ट्यांचा शोध घेण्यासाठी सचिव सताडसिंग सावकाश पावले टाकीत बाहेर पडले. बाहेर पडता पडता त्यांच्या कानी सरकार फताडसिंगाची एक उंच हाक आली. ते उत्साहाने सांगत होते, "हे पहा, जाता जाता तालुक्याला जा. पोस्टातून तार करा दिल्लीला. म्हणावं, तनखा-बिनखा काही नको !...एकदम बंद केला तरी चालेल म्हणावं !"

––त्यावर सचिव सताडसिंग एक पाय वाड्याबाहेर आणि एक आत असे भ्रमिष्टावस्थेत असल्यासारखे सरकारांकडे सताड उघड्या डोळयांनी वेड्यासारखे पहात राहीले ! फताडसिंग दोन गलेलठ्ठ ससे दोन्ही खिशात कोंबल्यासारखे, डुलत डुलत. गाणे गणगणत शयनगृहाच्या दिशेने चालले होते !!

★ ★ ★

अनुक्रमणिका



'नको, जाते आता'
'कोण आलं होतं म्हणून सांगू?'
पुन्हा तेच मिष्किल हसणं
'त्याला माहीत आहे'
'मला नाही सांगायचं नांव ?'
'ईडा'



--सदानंद. रेगे

गाडी ऑस्लोला आली नि मला एकदम हायसं वाटलं. खरं म्हणजे नॉर्वेला आल्यापास्नं मी एकाच गोष्टीचा ध्यास घेतला होता. इथल्या वास्तव्यात जमेल तेवढ्या लेखक–चित्रकारांची भेट मला घ्यायची होती. पण इथं आलो नि पहिल्यापास्नं माझी निराशा व्हायला सुरुवात झाली. ज्या संस्थेची स्कॉलरशिप घेऊन इथं आलो त्या संस्थेनं या कामी कोणत्याही प्रकारचं सहकार्य द्यायचं नाकारलं. 'तू इथं आलायस नॉर्वेजियन भाषा शिकायला नि इतल्या सांस्कृतिक जीवनाचं निरीक्षण करायला. तेवढी व्यवस्था आम्ही करू. बाकीचं आम्हाला काही जमायचं नाही. ते आमचं कामही नव्हे.' खूप वादावादी झाली, पण काही उपयोग होईलसं वाटेना. माझा फारच आग्रह आहे असं पाहून एक आठवडाभर मला एका म्हाताऱ्या टीकाकाराच्या घरी पाठविण्यात आलं. तो रंगभूमिविषयक लेखन करीत असे. तो आपल्याच जमान्यात वावरत होता. साहित्यक्षेत्रातील नव्या विचारप्रवाहांशी त्याला काही सोयरसुतक नव्हतं. मी त्याच्याकडे गेलो तेव्हा जागतिक रंगभूमीचा इतिहास लिहिण्यात तो गर्क होता. त्यामुळे माझ्याशी बोलण्याइतका किंवा माझ्याकडे लक्ष न देण्याइतका वेळच त्याच्यापाशी नव्हता. वय झालेलं असल्यामुळे भल्या पहाटे उठणं त्याला अगदी सहज जमे. माझा ब्रेकफास्ट एका टेबलावर ठेवून तो आठच्या सुमाराला जो आपल्या अभ्यासिकेत स्वतःला बंद करून घेई तो संध्याकाळी चारपांचच्या सुमारास बाहेर येई. सकाळच्या ब्रेकफास्टनंतर जेवणाचं दर्शन होई ते संध्याकाळी. मला अगदी वैताग आला होता. 'भीक नको पण कुत्रं आवर' अशी माझी स्थिती होऊन गेली होती.

पण पुढे लिलेहामेरला आलो नि वेळ नाही म्हटलं तरी पूर्वीपेक्षा मजेत जाऊ लागला. इतकं असूनही अजून मनात रुखरुख होतीच. कधी नाही तो परदेशात यायची संधी मिळालेय् पण अजून एकाही लेखकाला किंवा चित्रकाराला भेटायचं आपल्याला जमू नये याचं वाईट वाटत होतं. पण काही ईलाज नव्हता.

लिलेहामेरच्या शाळेत हाराल्द कविता वाचायला आला. त्याची माझी लगेच









# कॅमल क्रायलिन

रंग वापरून
मी माझी साडी
स्वत:च रंगवली




तुम्हीसुद्धां प्रयत्न करून पहा. तशा डिझाईनची फक्त तुमचीच साडी असेल. तुमच्या साड्या, मुलांचे कपडे उशांचे अभ्रे आणि खिडक्यादारांचे पडदेहि तुम्ही रंगवूं शकाल. क्रायलिन रंगांमुळें भरतकामाचे कष्ट करण्याची गरजच राहणार नाहीं.

कॅमल क्रायलिन रंग खास कापडाचे रंग आहेत. पण, कांच, लाकूड, भिंती, इत्यादि इतर कोणत्याहि पृष्ठभागांवर ते उठावदारपणे वापरणें शक्य आहे. हे रंग वापरायला अगदीं सुलभसोपे असून तुमच्या कल्पनाशक्तिला त्यामुळें भरपूर वाव मिळेल.

* क्रायलिन रंग खरेदी करताना, मार्गदर्शन व सूचना' ही पुस्तिका जरूर मागा.



**कॅम्लिन प्रायव्हेट लि.**
मुंबई • दिल्ली • कलकत्ता • मद्रास
कॅमल चित्रकला साहित्याचे निर्माते.



अनुक्रमणिका






गट्टी जमली. बोलता बोलता मी माझं मत त्याच्यापाशी उघडं केलं. तो म्हणाला: "बरोबर आहे तुझं. तुझ्या-सारख्या माणसानं नुसतं एकाच गावात राहून कसं चालेल? काहीतरी करून तुला इथनं काढायलाच हवं. मी ऑस्लोला गेल्यावर प्रयत्न करून पहातो. अन् एक लक्ष्यात ठेव, ऑस्लोला येशील तेव्हा माझ्याकडे उतरायचं. भेट किती लेख-कांना नि चित्रकारांना भेटायचं ते."

हाराल्द ऑस्लोला गेला नि त्यानं माझ्यासाठी दुसऱ्या स्कॉलरशिपची व्यवस्था केली.

लिलेहामेर सोडून मी ऑस्लोला आलो. अर्थात् हाराल्दशिवाय दुसरीकडे कुठं उतरून चालणारच नव्हतं.

हाराल्दच्या घरी येईस्तंवर सकाळचे अकरा तरी नक्कीच वाजले असतील. मी आलो तेव्हा तो एकटाच घरी होता.

मी आलेला पाहून त्याला मनस्वी आनंद झाला. माझी खोली त्यानं मला दाखवली. मी कपड्यांची बॅग एका कोप-ऱ्यात टाकली नि दिवाणखान्यात आलो.

घरात हाराल्दखेरीज कुणाचीच जाग दिसेना. म्हणून मी विचारलं: 'तू एकटाच आहेस?"



'नाही, बायको गेलेय् शाळेत. ती चार एक वाजता येईल. अन् छोटी मुलगी आहे शेजारच्या घरात. आम्ही दिवसभर तिला तिथंच ठेवतो.'

'तू काहीच करीत नाहीस?'

'म्हणजे?"

'नोकरी वगैरे?'

'नाही, नोकरी करायची नाही असं मी ठरवलंय्?'

'मग?'

'मग काय? कविता करायच्या. बस्स्'.

'तेवढ्यावर चालतं?'

'छट्. उभंसुद्धा रहाता येत नाही.'

'मग भागतं कसं?"

'म्हणून तर बायको नोकरी करते. शिवाय मी सटरफटर काहीतरी करीत असतोच. रेडीओ–टेलिव्हीजनवर कार्य-क्रम, वर्तमानपत्री लिखाण'.

बोलता बोलता तो उठला नि म्हणाला, 'बरं, तू बस थोडा वेळ. मी पाच–दहा मिनिटं बाहेर जाऊन येतो.'

त्यानं डोक्यावर बेरे घातली नि झटकन् बाहेर गेला.

आता घरात मी एकटाच होतो. थोडा वेळ खिडकीतनं रस्त्यावरची मजा पहात राहिलो. पुस्तकं चाळली. एक चित्रांचं पुस्तक घेऊन सोफ्यावर येऊन बसलो.

म्हणजे त्या म्हाताऱ्या लेखकाकडे कंटाळवाणे दिवस काढले तसेच इथंही काढायचे की काय?"

तेवढ्यात दारावरची वेल वाजली. मी गांगरून गेलो. कोण असेल? पुन्हा वेल वाजली. आता दार उघडा-यलाच हवं होतं. दारापाशी येईस्तंवर पुन्हा एकदा वेल वाजली.

मी दार उघडलं–

अन् मी पहातच राहिलो. क्षणभर काही सुचेनाच. अगदी कोरंकरीत व्हायचं म्हणजे काय ते त्या क्षणी मला जाणवलं.

एक मुलगी दारात उभी होती. अंगांगा-तून तारुण्यानं मुसमुसलेली. सोनेरी केसांची. अन् रूप—त्याचं वर्णन तरी काय करू नि कसं करू? बऱ्याच वेळानं माझ्या लक्ष्यात आलं की, ती तशी सुंदर नव्हती. पण.. पण... असलं सौंदर्य... असलं जीवघेणं सौंदर्य मी तरी आज प्रथमच न्याहाळीत होतो. क्षणभर वाटलं, प्रथमदर्शनी प्रेमाची तर आपल्याला बाधा झाली नाही! मन आवरता आवरता अगदी नकोसं झालं. एकदा वाटे, किती झालं तरी आपण परदेशात आलो आहोत. वाटेल तसं वागून नाही चालायचं आपल्याला. पण मग. लगेच दुसरा विचार मनात येई: 'कुठंही असलं म्हणून काय झालं? व्हायची ती बाधा कुठंही होणारच. अन् होतंय् त्यानं चुकतंय तरी काय आपलं?'

माझ्या तोंडून शब्द बाहेर पडेपडेस्तंवर तिनं माझी गोंधळलेली मन:स्थिती ओळखली असावी. गालावरचं मिस्कील हसू आवरीत तिनं मला अभिवादन केलं.

'मॉण्.. मॉण्..' म्हणजे मॉर्निंग.

'मॉण्.. मॉण्..'

'आत्ताच आलास वाटतं?'

'हो, पण तुला कसं माहीत?'

'हाराल्द म्हणाला होता तू आज येणार आहेस म्हणून.'

'आत ये ना–'

'नको, जाते आता. हाराल्द बाहेर गेलाय्?'

'पण आत येऊन बस ना. आत्ता येईल तो.'

'नको, मग येईन मी.'

'कोण आलं होतं म्हणून सांगू?'

पुन्हा तेच मिस्कील हसणं.

'त्याला माहीत आहे.'

'मला नाही सांगायचं नांव?'

'ईडा –'

ती झर्रदिशी वळली अन् भराभर पावलं टाकीत निघून गेली. किती वेळ भरकटल्या-सारखा मी दारात उभा होतो कोण जाणे!

अशी भुताटकी करून जायचं होतं तरी ती आलीच होती कशाला?

सुन्न होऊन मी दार लावलं नि पुन्हा हाराल्दच्या दिवाणखान्यात आलो. थोडा वेळ काहीच न करता सोफ्यावर वसलो. पण करमेना. दोन चार मासिकं चाळली, पण तिकडेही काही लक्ष नव्हतं. खिडकीतून









रस्त्याकडे पहात राहिलो, पण बाहेरचं काही दिसत नव्हतं. भिंतीवर एकदोन पेंटीग्ज होती, पण ती पहावीशी वाटेनात. पुस्तकांच्या शेल्फवर एक गंमतीदार फोटो होता. उत्तर ध्रुवावरचं एक घर नि त्याच्या भोवती मात्र पांढऱ्याशुभ्र अस्वलांचा वेढा. हाराल्द उत्तर ध्रुवावर गेला होता तेव्हा ही अस्वलं त्याच्या घरावर चालून आली होती. छपरावरच्या खिडकीमधनं स्वत: हाराल्दनं तो फोटो घेतला होता. हा फोटो बघत क्षणभर उभा राहिलो, अन् हळू हळू त्या अस्वलांच्या जागी मला ईडा दिसू लागली. माझं घर नि त्याच्याभोवती तिचा वेढा. छे, असलं चेटूक आयुष्यात कुणी केलं नव्हतं. खरंच चेटूक झालंय् की आपल्याला नसता भास होतोय् ?

तेवढ्यात पुन्हा दारावरची बेल वाजली. माझ्या पोटात भीतीचा गोळा उभा राहिला.

तीच असेल का पुन्हा ?– तीच–जी आत्ता क्षणापूर्वी मनात वणवा पेटवून गेली ती ?—

माझ्यानं दार उघडायचा धीर होईना.

पुन्हा बेल.

आता गत्यंतरच नव्हतं. कसाबसा पुढे झालो नि थरथरत्या हातांनी दार उघडलं.

हाराल्द नि त्याच्या हातात बिअरच्या बाटल्यांनी भरलेली पिशवी.

'ईडा आली होती.' मी म्हणालो.

'असं ?' हाराल्दच्या हिशेबी जणू काही घडलंच नव्हतं.

मग बराच वेळ कुणीच बोललं नाही. हाराल्दनं बिअरच्या बाटल्या दिवाणखान्यातील टेबलावर ठेवल्या नि ग्लासं आणायला तो स्वैपाकघरात गेला.

बीयर पिता पिता आम्ही अनेक विषयांवर बोलत होतो. मग मध्येच मी त्याला विचारलं, "ही ईडा कोण आहे ?"

तो खुदकन् हसला.

"हसलात कां ?" मी विचारलं.

"तुलाही झाली ना तिची बाधा ?"

"कसली बाधा ?"

"खोटं बोलू नकोस."

त्यानं माझ्या नजरेला नजर भिडवली. आता खोटं बोलणं शक्यच नव्हतं मला. मी काहीच बोललो नाही. समजायचं ते तो समजला नि पुन्हा हसू लागला.

'मग सांगेन पुन्हा सावकाश कधी तरी.' एवढंच तो म्हणाला नि रिकाम्या ग्लासात बियर ओतू लागला.

★ ★

ऑस्लोतले दिवस भराभर चालले होते. हाराल्दकडे आल्यापास्नं रिकामा असा वेळ मिळतच नव्हता. सकाळी उठल्यापासून सारखी एकामागून एक कामं लागलेली असायची. रेडीओवर जायचंय. टेलीव्हिजनच्या स्टुडिओत जायचंय. अमक्या तमक्या वर्तमानपत्राच्या हपिसात जाऊन कविता द्यायचीय्... मुलाखत द्यायचीय्... फलाण्या लेखकानं जेवायला बोलावलंय... फलाण्या चित्रकाराच्या घरी जायचंय्... क्षणाची उसंत मिळत नव्हती, पण थकायला मात्र होत नव्हतं. हे सारं हवंहवंसं वाटत होतं. सकाळी घरातनं बाहेर पडायचं ते रात्री घरी यायचं.

वेळात वेळ काढून हाराल्द आपल्या मित्र-मैत्रिणींना घरी जेवायला बोलावी. केवळ माझ्यासाठी. मग उलट निमंत्रणं येत. तीही केवळ माझ्याखातर.

ईडाच्या घरीही आम्ही आता वरचेवर जात असू. हाराल्दच्या घरापास्नं दहाएक मिनिटांच्या रस्त्यावर तिचं घर होतं.

पहिल्या दिवशी तिच्या घरी गेलो तेव्हा मला तिथलं वातावरण विचित्र वाटलं. अगदी नव्यानंच बांधलेल्या एका इमारतीच्या तिसऱ्या मजल्यावर तिचा तीन खोल्यांचा फ्लॅट होता. आम्ही बाहेरच्या दिवाणखान्यात बसलो होतो. कोपऱ्यातल्या टेबलावर बरीचशी पुस्तकं होती. अन् बाजूलाच पुस्तकांनी खच्चून भरलेलं एक शेल्फ. भिंतीवर कुणाचा तरी फोटो होता. मी शेल्फवरच्या पुस्तकांवरून नजर फिरवली. 'आयलिंग लार्स'. कितीतरी पुस्तकांवर एकच नांव होतं. वाटलं, इतके दिवस झाले ऑस्लोला येऊन. इतक्या लेखकांची भेट

हाराल्दनं घडवून आणली, पण हे नांव कसं अद्याप आपल्या परिचयाचं नाही ?

मी त्यातली दोन-तीन पुस्तकं काढली नि ती चाळत तिथंच उभा राहिलो.

"काय चाळतोयस् ?" हाराल्दनं बसल्या जागेवरूनच मला विचारलं.

"हा आर्यलिग लार्स कोण ?"

हेराल्दनं दचकून आजूबाजूला पाहिलं नि मला गप्प बसायला खूण केली.

त्याचं हे विचित्र वागणं मला उमगेना.

"कधी बोलण्यात नाही आलं तुझ्या हे नांव !"

तसाच उठून तो माझ्या अगदी जवळ आला नि म्हणाला, "मग सांगेन केव्हा तरी."

★ ★

ईडाच्या घरात दोन लहान मुलं खेळत होती ही गोष्ट माझ्या ध्यानात आली. पण इतक्या वेळा तिच्याकडे जाऊनही कुणी पुरुष माणूस तिथं दिसलं नाही, हेही मला विचित्र वाटत होतं. पण विचारणार कसं नि कुणाला ?

शेवटी एक दिवस धीर करून मी हाराल्दला विचारलंच:

"ती दोन मुलं ईडाचीच का ?"

"हो."

"अन् ती म्हातारी बाई, परवा घरात होती ती ?"

"ती तिची आई."

त्या दिवशी तेवढ्यावरच राहिलं. आणखी काही विचारलं तर त्याला ते आवडायचं नाही कदाचित्, असा विचार करून मी मग दुसराच विषय काढला.

तोही आपणहून काही बोलला नाही.

★ ★

एक दिवस दुपारी हाराल्दचा एक मित्र आला. वयानं जेमतेम पंचविशीतला. अंगापिंडानं चांगला दणकट. कपाळावर केसांची झुलपं झुकलेली.

हाराल्दनं त्याची-माझी ओळख करून दिली.

"सदानंद, हा माथिस. माझा चांगला दोस्त. इतके दिवस हा पार उत्तरेकडे लापलॅंडमध्ये मास्तरकी करीत होता. आता इकडे आलाय् लेखन करायला."

मी माथिसशी हस्तांदोलन केलं. मग बराच वेळ आम्ही इकडच्या तिकडच्या गप्पा मारीत बसलो.

तो गेला तेव्हा बाहेर काळोख झाला होता. रात्री कॉफी घेताना पुन्हा त्याचा विषय निघाला तेव्हा हाराल्दनं मला माथिसची गोष्ट सांगितली.

वर्षभरापूर्वीच त्याचं एका लापलॅंडीश मुलीशी लग्न झालं होतं. दृष्ट लागावी असं तिचं लावण्य होतं. अन् लग्नानंतर साताठ महिन्यातच त्यांच्या संसाराला कुणाची तरी दृष्ट खरोखरच लागली. रक्ताचा कॅन्सर होऊन ती तडकाफडकी मरून गेली. ती गेली नि माथिस वेड लागल्यागत लेखन करू लागला. त्याला दुसरं काही सुचेनाच. पुढे हाराल्दच्या सल्ल्यावरून तो ऑस्लोला आला. हाराल्द सांगत होता:

"तो आला नि त्याला सोफ्यावर बसवून मी बियर आणायला बाहेर गेलो. तेवढ्यात तू आलास त्या दिवसासारखीच ईडा येऊन गेली. परत आलो तो काय ? माथिसची स्वारी पेटलेली. थेट तुझ्यासारखीच. मी त्याला गंमतीनं म्हटलं. लग्न करतोस ? तो काहीच बोलला नाही. लग्नाची गोष्ट काढली की यांची तोंडं बंद. पण रात्री मी बाहेरून परत आलो तो माथिसची स्वारी कुठं दिसेना. तशी बायकोला विचारलं. ती म्हणाली: तो आपलं समान घेऊन ईडाकडे गेलाय् राह्यला..."

"ईडाकडे तो रहातो म्हणजे काय ? पेइंग गेस्ट म्हणून ?" माझ्या डोक्यात सगळाच गुंतवळा झाला होता. काही केल्या काही माझ्या लक्ष्यात येत नव्हतं.

यावर हाराल्द, त्याची बायको नि छोटी एल्फीसुद्धा मोठमोठ्यानं हंसू लागली.

"हंसायला काय झालं ?" मी विचारलं.

"पेइंग गेस्ट ? अरे, आता सध्या तरी तीच त्याला पैसे देत असते. त्याच्या नोकरीचा अजून कुठं पत्ता आहे ?"

"माझ्या नाही लक्ष्यात आलं--"

"येईल. मी न सांगताच येईल."

★ ★

अन् तसंच झालं. हाराल्दनं न सांगताच ती गोष्ट माझ्या लक्षात आली.

माथिस ईडाकडे नवऱ्याच्या नात्यानं रहात होता.

मग ती मुलं कुणाची ?

अन् तो फोटो ? – इडा विधवा तर नाही ?

सगळे प्रश्न एकमेकात गुंतत चालले होते. आता सुटेल तेव्हा सुटेल हा गुंतवळा.

मला भारतांत परतायला अवघा एक आठवडा राहिला होता. ओळखीच्या लोकांना निरोपाच्या भेटी द्यायचं सत्र सुरू

अहा, भारत विराजे, वर्ष हें 'पर्यटनी' गाजे . . . ९



**सांस्कृतिक प्रगति !**

**आपली 'रोंबा सोंबा' संस्कृति पाहून पाहुणे चाट पडतील!**

झालं होतं.

एक दिवस हाराल्द म्हणाला: "आपल्याला आज एके ठिकाणी जायचंय्."

"कुठं ?"

"माझ्या एका मित्राला भेटायला. जायच्या आधी तू त्याला पहायला हवंस."

"पहायला ?"

"हो, पहायला."

दुपारी आम्ही एका इस्पितळात गेलो.

"कसलं इस्पितळ आहे."

"मानसिक व्याधिग्रस्तांचं."

"तुझा मित्र इथं आहे ?"

"होय."

जिना चढून आम्ही पहिल्या मजल्यावर आलो. हाराल्दच्या मित्राला एका स्वतंत्र खोलीत ठेवण्यात आलं होतं. आम्ही गेलो तेव्हा पुढ्यातल्या टाईपराईटरवर तो बोटं चांचपीत होता. डोळे उघडेच होते, पण ते रिकामे होते. म्हणजे हा आंधळा आहे तर !

"आयलिंग, मी आलोय्, हाराल्द."

आयलिंग.. आयलिंग... नांव तर ऐकल्यासारखं वाटतंय्.

आयलिंग...आयलिंग...आयलिंग.. लार्स !

हा सगळा काय प्रकार चाललाय्, माझ्या काहीच ध्यानात येईना.

आयलिंगनं रिकाम्या अवकाशात आपली नजर फिरवली अन् तो म्हणाला, "अं ?"

"मी हाराल्द. अन् माझ्याबरोबर एक नवा मित्र आहे. इंडियाहून आलेला. तो भेटायला आलाय् तुला."

आयलिंग भेसूर हंसला.

बराच वेळ आम्ही तिथं होतो. पण हाराल्द एकटाच त्याच्याशी बोलत होता. अधनंमधनं तो वर पाही अन् काही आठवल्यासारखं करी. मग त्यानं टाईपराईटरवर भराभर काही टाईप केलं अन् तो कागद हाराल्दकडे दिला. हाराल्दनं एकदा त्याच्यावर नजर फिरवली अन् तो माझ्याकडे दिला. त्या कागदावर काही नव्हतं. फक्त वेडीविद्री अक्षरं.

A D F G M X Z O
Q S E L T
B C K X X
Z V V

"आयलिंग, आपला नवा मित्रही कविता करतो, बरं का ?"

"अं ?" अन् एकदम भेसूर हंसणं.

असंच बराच वेळ चाललं होतं. तो भराभर 'कविता' करीत होता नि ते कागद हाराल्दकडे देत होता.

निघताना मी त्याच्याशी हस्तांदोलन केलं तेही एकट्यानंच. माझा हात मी त्याच्या हातात दिला एवढंच.

खाली आल्यावर मी हाराल्दला विचारलं, "हा काय प्रकार आहे ?"

हाराल्दनं एक दीर्घ निःश्वास सोडला

नि स्वत:शीच तो विमनस्कपणे हंसला.

माझं डोकं गरगरू लागलं होतं.

★ ★

अन् निघायच्या आदल्या दिवशी हाराल्दनं मला सारं सांगितलं.

आयलिग लार्स... ईडाचा नवरा... सहासात वर्षांपूर्वी तो लिहायला लागला. अशा झपाट्यानं की त्याचे मित्र पहातच राहिले. आयलिगच्या कवितांचे तीन संग्रह निघाले. शिवाय एक कथासंग्रह नि दोन टीकालेखांचे संग्रह. जिकडे तिकडे त्याचं नांव होऊ लागलं. त्याच्या एका पुस्तकाला क्रिटीक क्लबचं पारितोषिक मिळालं. भल्याभल्याना हा मान मिळायला केस पांढरे होईपर्यंत थांबावं लागत होतं.

आयलिगनं विमाकंपनीच्या ऑफीसातली आपली नोकरी सोडली अन् सर्व वेळ आता तो लेखनासाठी देऊ लागला.

सगळं काही व्यवस्थित चाललं होतं, पण...

अलीअलीकडे हाराल्दच्या लक्ष्यात एक गोष्ट येऊ लागली होती. आयलिगचा संसार वर वर पाहता सुखाचा दिसत होता, पण आत कुठंतरी मिठाचा खडा पडला होता.

ईडाशी किंवा आयलिगशी बोलताना दोघांच्याही मनात कसलीतरी अनामिक व्यथा खुपते आहे, हे त्याला जाणवत होतं. दोन सोन्यासारखी मुलं घरात असताना आयलिगला उगाचंच वाटत होतं की, आपण ईडाला सुखी करायला असमर्थ आहोत. कोणत्या अशुभ क्षणी या अभद्र कल्पनेनं त्याच्या मनाचा तावा घेतला होता कुणास ठाऊक ! पण आता काही केल्या तो तिच्या षड्यंत्रातून बाहेर पडू शकत नव्हता. असं कित्येक दिवस चाललं होतं. नुसतं घुमसणं. नुसतं हुरहुरणं. दोनतीन वेळा त्यानं आत्महत्त्येचाही प्रयत्न करून पाहिला होता. जवळच्या मित्रांनी प्रयत्नांची अगदी शिकस्त केली, पण काही जमेना. आयलिगच्या मनावर त्या अभद्राचा उमटलेला व्रण कायमच होता.

अन् एक दिवस आयलिगचा चौथा कवितासंग्रह प्रसिद्ध झाला. हाराल्दला वाटलं, आता तरी तो माणसात येईल. संग्रह प्रसिद्ध झाला त्याच्या पुढच्याच रविवारी आयलिगने--नव्हे, हाराल्दच्या सांगण्यावरून ईडानं एक झक्कपैकी पार्टी दिली.

हाराल्द मला सांगत होता:

"काळोख पडत चालला होता. सगळयानी अगदी खूप मद्य झोकलं होतं. गप्पांना, हंसण्याखिदळण्याला नुसता ऊत आला होता. आयलिगनं आपल्या कविता वाचून दाखवल्या. मी माझ्या काही. अन् आम्ही मग जेवायला बसलो. क्षणभर कुणी कुणाशी काही बोलेना. कधी मी टेबलापाशी जेवायला बसलेली माणसं मोजीत नाही. पण त्या दिवशी, कशी कुणास ठाऊक, पण मी ती मोजली. तेरा. तब्बल तेरा. मला एकदम धसका बसला. तेरा. का माहीत आहे ? आठवतं ? खिस्ताच्या लास्ट सपरच्या वेळीही अशीच तेरा माणसं होती...

"रात्री बारा-साडे बाराच्या सुमाराला आम्ही आयलिगचा नि ईडाचा निरोप घेतला.

"मी घरी आलो नि सिग्रेट शिलगावून बायकोशी गप्पा मारीत सोफ्यावर बसलो.

"तेवढ्यात दारावरची बेल वाजली. या वेळेला कोण असेल ? दार उघडून पहातो तो ईडा. . .

"काय ग ?" मी दचकूनच विचारलं.

तिला धड बोलवतही नव्हतं.

"ईडा..."

"चल... आधी... आधी माझ्याबरोबर चल..."

"अग, पण झालंय् तरी काय ?"

"ती वळून झपझप चालायला लागली. पाठोपाठ मीही बाहेर पडलो.

"आयलिगच्या घरापाशी माणसांची गर्दी झाली होती. तिच्यातून वाट काढीत आम्ही कसेबसे आत आलो. तळमजल्यावरच्या जिन्याच्या डाव्या अंगाला आयलिग रक्ताच्या थारोळ्यात पडला होता. बिल्डिंगचं काम अजूनहि चाललेलं असल्यामुळे खाली एक फळकूट तसंच पडलेलं होतं. त्याच्यातून एक भलामोठा खिळा वर आला होता. आयलिग वरून जो खाली पडला तो नेमका या फळकुटावर.

"तो खिळा त्याच्या डोळ्यात शिरला होता."

"आयलिगला हॉस्पिटलमध्ये पोचवून मी घरी आलो. रात्रभर देवाला विनवणी करीत होतो. आता नको याला जिवंत ठेवूस.

"सकाळी हॉस्पिटलात गेलो तेव्हा कळलं की आयलिगची दृष्टि गेलेय्. अन् स्मरणशक्तीही... होय, स्मरणशक्तीही...

"ईडाच्या सांगण्यावरून तो जिन्याच्या कठड्यावरून तोल जाऊन पडला होता. पण खरा प्रकार तसा नव्हता हे मला माहीत होतं. आयलिगनं आपणहूनच खाली उडी घेतली होती. उडी घ्यायची ती अशी अघंवट कां ? पण या गोष्टी माणसाच्या हातात असतात थोड्याच !

"आता सगळा खेळ संपलाय्. खरा आयलिग केव्हाच मरून गेलाय्. राहिलंय् आता नुसतं मांस नि कातडं. डॉक्टरानी त्याला एक टाईपरायटर आणून दिलाय्. त्याना आशा वाटतेय् की आज ना उद्या त्याची स्मरणशक्ती परत येईल. मी एकदा त्याना म्हटलं, नका, डॉक्टर, नका.. काय वाट्टेल ते करा पण त्याची स्मरणशक्ती नका त्याला परत देऊ. ते म्हणाले, असं कसं? माझं काम मला करायलाच हवं. खरंच, प्रत्येकजण आपापली काम करीत असतो. अगदी गुपचूप. आयलिग आपलं जिन्यावरून उडी घ्यायचं. ईडा आपलं. ज्याच्या त्याच्या मनाला वणवा लावयाचं. नि या सर्वांपेक्षा म्हणजे माणसाचं दैव. त्याच्या पावलांची चाहूल कधीच कुणाला येत नाही...."

"आत्तां पुढं?" मी काहीतरी विचारायचं म्हणून विचारलं.

"पुढं काय ? कायद्यानुसार तीन वर्षं झाली की ईडाला घटस्फोट घेता येईल."

"ती घेणार आहे ?"

"नाहीतर काय करणार ? तिच्या शरीरात अजून मन आहे. त्या मनात अजून आग आहे..."

"हाराल्द, आयलिगनं त्या दिवशी दिलेला हा कवितेचा कागद मी ठेवू."

"ठेव... पण संभाळ, ते एक अभद्र आहे."

"अभद्रावर तुझा विश्वास आहे ?"

"विश्वास ठेवणारा, न ठेवणारा मी कोण ? आपलं मनात आलं ते तुला सांगितलं."

★ ★

गेल्याच वर्षी ईडानं माथिसशी लग्न केलं. ऑस्लोपासून पांच-पंचवीस मैलांवर त्या दोघांनी एक घर घेतलंय्. अन् आयलिगही अजून हॉस्पिटलातच आहे. त्याच्या टाईपरायटरला साक्ष ठेवून डॉक्टर त्याची स्मरणशक्ती परत आणायच्या खटपटीत आहेत.

खटपट... खटपट... खटपट.
टपखट खपटट पटखट
ख ट ट प
प ख ट ट
ट ख प
ख. . . .

कुठून तरी टाईपरायटरचा आवाज येतोय्... खटपट... खटपट...








—रमेश मंत्री

# चित्रशाकापूपभक्षाविकारक्रियातज्ञ





मासिके ही करमणुकीसाठी वाचायची असतात अशी पूर्वी समजूत होती. पण आताची स्त्रियांची मासिके महाराष्ट्रातील अडीच कोटी महिलांना 'मार्गदर्शन' करण्यासाठी निघालेली आहेत. मासिकांत वाचायचे आणि त्याप्रमाणे वागायचे अशी या नियतकालिकांच्या श्रद्धाळु वाचिकांची समजूत आहे. 'घर कसे सजवावे?' 'आज खायला आहे ?' 'केशभूषा कशी कराल ?' 'बाळाला काय होतंय ?' 'नवरा फार खातो काय ?' 'चेहऱ्याची शोभा कशी वाढवाल ?' 'कपड्यावरचे चहाचे डाग' 'घटस्फोटात पोटगी' 'गरोदरपणी कोणती काळजी घ्यावी ?' 'गरोदर नसाल तेव्हा कोणती काळजी घ्यावी ?' 'नव्या सुनेने सासरी कसे वागावे ?' 'आत्याबाईने कसे वागावे ?' 'आत्याबाईला मिशा असल्या तर तिला काका म्हणावे काय ?' 'काकाला मिशा नसल्या तर त्याला आत्याबाई म्हणायचे काय ?' 'लोणची कशी घालायची ?' 'ब्लाउझला नव्या फॅशन्स' 'छत्रीला अभ्रा कसा घालावा ?' 'टेबलावरील रांगोळ्या' 'रांगोळ्यावरील टेबल' 'पोळ्या कशा लाटाव्यात ?' 'कचेरीतले कागद व पेन्सिली कशा लाटाव्यात ?' 'उपवासाला किती खावे?' 'वजन कसे कमी करावे ?' अशा अनंत विषयावर ही बायकी मासिके अखंड मार्गदर्शन करीत असतात. एका अर्थी हे संपादक (यात संपादिका जवळजवळ नाहीतच) आणि या मासिकांच्या खंद्या वाचिका यांचे कौतुक करावे तेवढे थोडेच. मला इतकेच म्हणायचे आहे, की कथा किंवा कविता यांच्याप्रमाणे आमच्या गृहिणींनी हे सर्व साहित्य वाचून सोडून दिले तर आमच्या संसारात काहीच अडचण येणार नाही. पण स्त्रियांच्या मासिकात छापून आलेली प्रत्येक ओळ म्हणजे आपल्याला दिलेला आदेशच आहे, या भावनेने जेव्हा स्त्रिया हा मजकूर कृतीत आणू पहातात, तेव्हा मात्र आमच्या सारख्या सर्वसामान्य नवऱ्यांची मोठी पंचाईत होऊन बसते.

हे आठवायचे कारण असे की एक दिवस मी कचेरीला जाण्याच्या गडबडीत होतो. नेहमीप्रमाणे उशीर होण्याच्या बेतात होता. मी घाईघाईने जेवण करून कसेबसे कपडे चढवून बुटांचे बंद शोधीत

होतो. तोच लडिवाळपणे माझ्या जवळ येऊन विद्या म्हणाली "आज पगार आहे ना ? मग माझ्यासाठी एक आणायचं गडे."

"अग आता मला उशीर होतोय. हे तुझं गडेबिडे सोडून सरळ काय ते सांग बरं." मी किंचित कातावून म्हटलं. टेबल-क्लॉथ, ब्लाउजचं कापड असं काहीतरी आणण्यासाठी ही मखलाशी असेल असं मला वाटलं होतं.

"गडे की नाही, मला एक स्वच्छ म्हैस हवीय्" तिनं माझ्या रुमालाशी खेळत म्हटलं.

"अग, म्हैस कधी स्वच्छ असते काय ?" असं मी बोलून गेलो खरा. पण बायकोनं आपल्याकडे काय मागितलं, याची त्यानंतर मला कल्पना आली. मग मी ओरडलोच, "काय म्हणालीस ? काय आणू ?"

"म्हैस; स्वच्छशी म्हैस."

"म्हैस ? अग म्हैस म्हणजे काय हातरुमाल आहे की टॉवेल आहे? शिरलं आपलं दुकानात आणि आठ आणे रुपया टाकून आणली म्हैस खिशात टाकून ? म्हैस म्हणजे भलतं खटलं असतं. या मुंबईत म्हशींचा बाजार कुठं असतो, हे सुद्धा मला माहीत नाही. तिला किती पैसे पडतात हेहि मला माहीत नाही. आणि समज म्हैस आणली, तरी ती कुठं ठेवायची हे तुलासुद्धा सांगता यायचं नाही. मुंबईच्या लोकल गाड्यातून माणसांना उभे रहायला जागा मिळत नाही. मग मी म्हैस कशी आणणार ? आं ? आणि काय ग ? तुला म्हैस हवी तरी कशाला ?" मला कचेरीत जायला उशीर होतं आहे, याचा मला या म्हैस प्रकरणामुळं विसर पडत चालला होता.

"बरं का गडे —"

"नुसतं सांग ग."

"बरं बाई. या महिन्याचा 'भामिनी' मासिकाचा अंक कि नई, 'अन्नपूर्णा विशेषांक म्हणून निघाला आहे."

"असेल. पुढं ?"

"त्यात कि नई, 'ताक करण्याची कृति' दिली आहे. ही बघा—" असं म्हणून तिनं 'भामिनी' मासिकातलं कुठलं तरी पान शोधायला सुरवात केली.

ताक करण्याला काहीतरी गुंतागुंतीची 'कृति' असते हे मी आयुष्यात प्रथमच ऐकत होतो. मी म्हटलं, "अग जन्मभर तूं ताक करते आहेस. आता त्या मासिकात नवीन ते काय असणार ?"

"तुम्हा पुरुषांना कळत नाही ते हेच" हवे असलेले पान शोधून सौ. विद्या बाणेदारपणे म्हणाली, "अहो ती अशास्त्रीय रीत झाली. पण आता ताक करण्याची शास्त्रोक्त पद्धत या मासिकात सौ. उमाबाई केंजळकर यानी दिली आहे, ती ऐका.

करण्याची कृति. याच पदार्थाला कोणी छास, कोणी बटर-मिल्क तर कोणी 'ताक' या गांवठी नांवाने ओळखतात. हा पदार्थ तयार करण्यासाठी प्रथम एक स्वच्छ म्हैस घ्यावी. तिला आंबोण घालावे. म्हैस हा प्राणी सकाळी व संध्याकाळी दूध देतो. हे दूध पांढऱ्या रंगाचे असते. हे दूध गरम करून रात्री त्यात थोडे दही टाकावे. त्याला विरजण म्हणतात. (विरजण घालण्याची शास्त्रोक्त पद्धत माझ्या 'पंचरा हजार पाककिया'मध्ये दिली आहे. पृष्ठ ३८९) सकाळी त्या सर्व दुधाचे दही होईल."

एवढे वाचन केल्यावर सौ. विद्या मल्लीनाथी करू लागली, "अहो, पूर्वीच्या काळी बायका दही घेऊन त्यात पाणी ढवळीत असत. पण ताक करायची शास्त्रोक्त कृति केंजळकरबाईनी दोन पानं भरून दिली आहे. दह्याचं उष्णतामान किती असावं, त्यात घालायच्या पाण्याचं उष्णतामान किती असावं, किती सी. सी. दह्यात किती सी. सी. पाणी मिसळावं, किती दह्याला रवीच्या किती फेऱ्या माराव्यात, लोणी कसं काढावं हे अगदी बारकाईनं सांगितलं आहे. या बाई वाचक भगिनींची गैरसमजूत होऊ नये म्हणून किती काळजी घेतात पहा. या कृतीत त्यांनी म्हटलं आहे, 'रवि याचा अर्थ सूर्य असाहि आहे. पण वाचक भगिनींनी दही घुसळून ताक करण्यासाठी रवि म्हणजे सूर्य हातात घेऊ नये. बाजारात रवि नांवाची लाकडी किंवा अर्धी लाकडी व अर्धी लोखंडी वस्तु मिळते तीच घ्यावी."

मी उपहासानं म्हटलं, "अस्सं ! त्या बाईनी ही धोक्याची सूचना दिली म्हणून बरं झालं. नाही तर तुम्ही बायकांनी अकाशातला सूर्य घेऊन त्याला धरून भांड्यात घुसळलं असतं ! काय ही विद्वत्ता! ही मासिकं चालविणाऱ्यांची आणि तुम्हा वाचकांची !"

"मग ? त्यात काय झालं ? काही बायकांचा गैरसमज होईल म्हणून योग्य अशीच सूचना दिली आहे केंजळकरबाईनी. अहो मागे त्यांनी 'चहाची पॉवडर' असं म्हटलं होतं. त्यावर एका भगिनीनं संपादकांना प्रश्न विचारला, 'चहा कसा करायचा तो आम्हाला माहीत आहे. पण चहा केल्यावर त्याची पुनः पावडर कशी करायची ?' त्यावर केंजळकरबाईनी उत्तर दिलं होतं की चहाची पावडर आणि तोंडाला लावायची पावडर वेगळी असते. बाण्याला 'टी डस्ट' असं सांगितलं तर समजेल. पावडरचा चहा करता येतो, पण चहा केल्यावर त्याची पुनः पावडर करता येत नाही. असा अगदी स्पष्ट खुलासा केला होता." माझ्या पत्नीनं एकंदरीत स्त्रियांची मासिकं वाचणाऱ्यांची बौद्धिक पातळी कुठे असते याची मला कल्पना दिली. अर्थातच या वाचिकांना सूर्यानं ताक घुसळायचं नाही आणि चहाची पावडर तोंडाला फासायची नसते या व्यवहारी सूचना देणे अगत्याचे होते हे मला पटलेच. मला कचेरीला जायला वेळ होत होता, म्हणून मी संभाषण आटोपते घेण्यासाठी म्हटले, "बरं, आता या प्रश्नाची चर्चा आपण नंतर करू. मला उशीर होतोय्—"

"पण गडे मला ती स्वच्छ म्हैस आणताना ?"

"अग भैय्यानं दूध दिलं की दही कर नि त्याचं ताक कर." मी तिची समजूत काढीत म्हणालो.

"शी: ! ती काय अडाणी पद्धत. आम्ही बायकांनी कि नई मॉडर्न पद्धतीनं वागायचं ठरवलंय."

"पण हे बघ, तुझं हे म्हशीचं प्रकरण आता पुढच्या पगारावर टाकू." असं म्हणून मी ही चर्चा आटपती घेतली. कारण पुढच्या महिन्यापर्यंत आणखी कुठच्या तरी मासिकात "म्हैस घेतल्याबाचून ताक करण्याची अद्यावत् कृति' येणार आणि ती कृति वाचून माझ्या

(दीपा. २१)








पत्नीच्या डोक्यातील म्हैस जाणार अशी माझी खात्री होती.

पण एक म्हैस गेली, तरी तिच्याऐवजी दुसरी म्हैस येते, असा अनुभव मला याबाबतीतहि आलाच. कारण या प्रसंगानंतर दोन दिवसांतच 'भामिनी'सारखेच दुसरे कसले तरी 'बहुराघा' की 'सासर' हे मासिक आमच्या घरी आले. त्यातील काहीतरी वाचून आमच्या बाईसाहेबांनी लगेच 'कृति' करायचे ठरवले. ती म्हणाली, "बरं का, या रविवारी मी या मासिकातली कृति करणार आहे."

मी म्हटले, "अग 'कृति' 'कृति समिति' हे शब्द राजकारणातल्या विरोधी पक्षाला शोभून दिसतात आपल्यासारख्या घरेलु माणसांना हे शब्द फार हिंसक वाटत नाहीत का ?"

"अहो कृति म्हणजे पाककृति." माझी भीति नष्ट करण्याचा प्रयत्न करीत विद्या म्हणाली.

"पण मासिकातली ही पाककृति सुद्धा पुरुषांच्या काळजात धडक भरवते, माहीत आहे ? आमच्या ऑफिसातल्या रानडे अकौंटंटच्या बायकोनं असलीच काहीतरी कृति केली आणि बायकोचा वाढदिवस म्हणून बिचाऱ्याने ती 'कृति' खाल्ली. दीड महिना सिक्लीव्ह घ्यावी लागली त्याला !"

"पण ही किनई, लोणच्याची कृति आहे हो." निष्कारण लाडिकपणा करीत जवळ येत ती म्हणाली. आता तुम्हीच सांगा. लोणच्यात लाडिकपणा करण्यासारखं काही आहे काय? पण बायकांना ही फार वाईट संवय आहे. कोळशाच्या पोत्यासंबंधी नवऱ्याबरोबर बोलताना सुद्धा त्या उगीचच 'गडे' नि 'किनई' करीत असतात.

मी म्हटले, "ही कृति काय असेल ते मी सांगतो तुला. त्या मासिकात कोणी गंगूताई शेवडेबाईनी लिहिलं असेल की एक स्वच्छ बाग घ्यावी. त्या बागेत आंब्याची कोय रोवावी. तिला पाणी घालावं, मग पंधरा वर्षांनी झाडाला आंबे लागतील. ते कापावेत, त्यात मसाला —"

मध्येच हंसून विद्या म्हणाली, "इश्श्य ! इतकं काही बायकांना हिणवायला नको हं. या 'सासर' मासिकाच्या 'अपूर्ण अन्न' विशेषांकात किती छान छान लोणच्यांच्या कृति दिल्या आहेत. एकट्या लिंबाच्या लोणच्याचेच एकतीस प्रकार आहेत."

"एकतीस प्रकार ? लिंबाच्या लोणच्याचे एकतीस प्रकार करणार तूं ? हा कुठला आंबटशोक आठवला तुला ?" मी आश्चर्याने विचारले.

मला नामोहरम करण्यासाठी सौ. ने 'सासर' मासिकाचा तो 'अपूर्ण अन्न' विशेषांक आणला. त्यातलं एक पान शोधून माझ्यापुढे तिनं धरलं आणि ती म्हणाली, "अहो, हे सगळे प्रकार मी करणार नाही हो. पण या बनुताई बनचुके लोणच्यात किती स्पेशॅलिस्ट झाल्या आहेत ते पहा तरी वाचून."

मी ते मासिक तसेच मिटले आणि म्हणालो, "लोणच्याची कृति मासिकात कशाला पहायला पाहिजे ? शेकडो, हजारो वर्षं आपण, लोणची करतो. आणि आधुनिक कृतीच हवी असेल, तर मी सांगतो तुला."

"तुम्ही ?" आता मात्र सौ. ला हंसू आवरेना. ती म्हणाली, "अहो, वरणीतून चमचाभर लोणचं ताटात घ्या म्हटलं, तर सतरा वेळ सांडता तुम्ही !"

"चेष्टा करू नकोस. कृति ऐक. आंब्याचं लोणचं करण्याची कृति. साहित्य— भरपूर पैसे, भरपूर पैसे देणारा मूर्ख नवरा, एक वाणी, टॅक्सी किंवा बस आणि पुरेसा वेळ. कृति— घरातलं काम आटोपल्यावर आराम झोपून तीनचार वाजता उठावं. चहा घेऊन चांगलंसं पातळ नेसून बसस्टॉपवर किंवा टॅक्सी स्टँडवर जावं. वाण्याचं दुकान जवळ असलं तर चालत गेलं तरी चालेल. वाण्याला सांगावं, "बेडेकरांचं आब्याचं लोणचं दोनशे ग्राम द्या." त्याला पैसे द्यावेत आणि घरी परतावं. हा पदार्थ जेवताना तोंडी लावणे म्हणून रुचकर लागतो. लोणचं संपल्यावर बाटलीचे नवे दहा पैसे येतात. त्यामुळं लोणच्याच्या खर्चात तेवढीच बचत होते! अग, आजकाल शहरातल्या लाखो बायका लोणच्याची हीच कृति करतात."

असं सांगून मी हा विषय तात्पुरता आवरता घेतला खरं. पण माझी बायको रविवारी खरोखरच लोणचं करील ही भीति काही केल्या मनातून जाईना. हिचा तो बेत हाणून पाडण्यासाठी मी आदल्या दिवशी संध्याकाळी तिने न सांगताच आंबा आणि लिंबू अशा दोन्ही लोणच्याच्या बाटल्या बाजारातून आणल्या. त्या पाहून ती म्हणाली, "बरं झालं बाई तुम्ही लोणचं आणलंत ते."

मला विजयाच्या आनंदाच्या उकळ्या फुटू लागल्या. पण त्या वरकरणी न दाखवता मी म्हटलं, "म्हणजे त्याचं काय आहे, की रविवारी लोणचं करायचा उगीच त्रास नको तुला !"

"छे : छे : तसं नीही म्हणत मी. उद्या मी लोणचं करणारच आहे. तुम्ही आणलंय् हे आंब्याचं नि लिंबाचं लोणचं. पण मी उद्या करणार आहे ते फणसाच्या बियांचं लोणचं."











"मग मी लोणची विकत आणली ते बरं झालं असं कां म्हणालीस तू ?" स्त्रियांच्या मानसशास्त्रातला कप्पा समजून घेण्याचा प्रयत्न करीत मी विचारले.

"ते अशासाठी, की मी हे फणसाच्या बियांचं लोणचं नवीनच घालते आहे. ते बिघडलं तर तुम्ही आणलेलं लोणचं खाता येईल हो. आणि बरं का हो, माझ्या मैत्रिणी येणार आहेत उद्या लोणचं घालायला. तुम्ही सिनेमाला नाही तर मित्रांकडं जावं गडे" तिनं पुन: लडिवाळपणा केलाच.

"अगं म्हणजे तू लवकरच चित्रशाकापूपभक्षाविकारक्रियातज्ञ होणार !" ग्रंथालयात जाऊन एका कागदावर उतरून आणलेला मजकूर वाचीत मी म्हणालो.

इतका लांबलचक शब्द मी उच्चारलेला पाहून माझी बायको चकितच झाली. ती चमकून म्हणाली, "काय म्हणालात ?" तो अवघड शब्द मी पुन: वाचला. ही नक्की आपली स्तुति आहे की निंदा आहे याचा तिला अंदाज येईना. पण तो अंदाज घेण्यासाठी आधी नवऱ्यावर फणकारून तरी पहावे म्हणून विद्या म्हणाली, "उगीच काहीतरी मला भलतं सलतं म्हणू नका हं." त्यावर मी हंसून विचारले, "या शब्दाचा अर्थ तरी तुला माहीत आहे का ?" विद्या म्हणाली, "ही काहीतरी शिवी असेल नाहीतर एखाद्या रोगाचं नांव असेल." मी सांगितलं, "हे बघ. फसलीस की नाही ? अग माझ्या एका प्राध्यापक मित्रानं सांगितलं म्हणून मी ग्रंथालयात जाऊन हा शब्द उतरून आणला. या मालगाडीवजा लांबलचक शब्दाचा अर्थ 'नाना तऱ्हेच्या भाज्या आणि पक्वान्ने तयार करण्यात तज्ञ' असा आहे. आपल्या शास्त्रकारांनी ज्या चौसष्ट कला सांगितल्या आहेत, त्यातली ही तेविसावी कला आहे."

"असू दे. आम्हाला नको ती अवघड कला. आम्हाला आपली 'जिच्या हाती पाककला, तिचा संसार धन्य झाला' ही साधी घरगुती म्हणच पटते." विद्यानं आपल्या कलेचं नि अकलेचं समर्थन केलं.

सौ. विद्याच्या या सर्व कृतींचा परिणाम इतकाच झाला, की रविवारी मला निष्कारण बाहेर भटकावं लागलं. सौ. ची ती दुपार लोणचं करण्यात गेल्यानं संध्याकाळी तिला घेऊन हॉटेलात जेवावं लागलं. चार दिवसांनी नवीन लोणचं नासल्याचं लक्षात आल्यावर चार आणे मोलकरणीला देऊन तिला ते लांब कुठेतरी नेऊन टाकून द्यायला सांगितलं. अखेर मी आणलेल्या तयार लोणच्यावरच गुजराण करावी लागली. 'हवेमुळं लोणचं बिघडतं.' असं सौ. नं. सांगून आपल्यावरची जबाबदारी झटकली. पैसे गेले तरी हरकत नाही, पण ते प्रायोगिक लोणचं खाण्याची आपत्ति टळली म्हणून मीहि सुटकेचा निश्वास टाकला.

बायकांची मासिके वाचून आपल्या गृहिणी नुसत्या पाककृतीच करतात असे नाही, तर शरीराचे इतरहि बरेच हाल करून घेतात. अगदी तंग कपडे घालून स्वत:ला करकचून बांधून घेणे आणि केसांच्या चित्र विचित्र रचना करून स्वत:बरोबरच इतरांचेहि हाल करणे हे त्यातले आणखी काही प्रकार. केशरचनेचाच प्रश्न घ्या. वेणी' घालणे

किंवा अंबाडा घालणे हे दोन सर्वसामान्यपणे मान्यता पावलेले प्रकार. पूर्वी खोपा की काय म्हणतात तो कोणी स्त्रिया घालीत. पण आता नजरेआडच झाला आहे. डोनटसारख्या काहीतरी वस्तू केसात खुपसून त्या भोवती केसांचे उंच वारूळ उभे करणे ही अलीकडच्या स्त्रियांना आवडती अशी एक पद्धत. शिक्षणाने महिलांची मान उंचावली असे म्हणतात. पण स्त्रियांची मासिके वाचून मानेऐवजी केस मात्र खूपच उंचावत आहेत.

आधुनिक केशरचनांची नुसती नांवे वाचून सुद्धा डोके गरगरायला लागते. ही काय म्हणे शेल पफ् रचना, हिचं नांव काय तर फ्रेंच रोल, अमकीला म्हणायचं रोल टॉप नि तमकीचं नांव हॉट डॉग नि हॅंबर्गर. या पाश्चात्य नांवाबरोबरच चंद्रिका, त्रिमूर्ति, अंजली, चक्रताल, मोहिनी, प्रियदर्शिनी, मौक्तिका अशा खास संस्कृतनिष्ठ नांवांच्या केशरचनाहि आहेतच. बरं, नुसत्या नांवावरच भागत नाही. सर्व नववधूंसाठी म्हणे वेगळी केशरचना असते. लग्नानंतर सहा महिन्यांनी ती केशरचना कां चालू नये, याचे उत्तर कोणत्याहि केशरचनातज्ज्ञेने दिलेले नाही. काही केशरचना तर विशिष्ट ऋतूतच करायच्या असतात म्हणे. वसंत ऋतूत काय तर वसंत बहार आणि पावसाळ्यात कसली तरी वर्षा बहार याच रचना करायच्यात, असे महिलांच्या मासिकांतून समस्त गृहिणीना आदेश देण्यात येत असतात. बहुतेक गृहिणीना दैनंदिन कामाच्या रगाड्यात केस एका जागी बांधून ठेवण्याइतकीहि फुरसत नसते. पण केशरचनेच्या अनंत तऱ्हा या स्त्रिया अगदी बारकाईने वाचतात. या सर्व केशरचना कशा करायच्या किंवा केल्यानंतर कशा दिसतात हे दाखविण्यासाठी छायाचित्रेहि घेण्यात येतात. अर्थात् स्त्रियांनी जेथे डोके वापरलेले असते, अशी ही दुर्मिळ छायाचित्रे असल्याने ती पहायला हरकत नाही. पण मासिकातील केशरचना या केवळ वाचण्यासाठी किंवा पहाण्यासाठी असतात याचा विसर पडून बायका जेव्हा या केशरचना करून पाहू लागतात, तेव्हा मात्र कधी कधी अडचणीचे प्रसंग उद्भवतात.

असाच एक प्रसंग माझ्यावर गुदरला, म्हणून तर मी एवढा कळवळून सांगतो आहे. एक दिवस मी संध्याकाळच्या सिनेमाची तिकिटे काढली. मोठ्या हौसेने मी बायकोला न्यायला आलो. साडेसहाला चांगला सिनेमा होता म्हणून सहा वाजेपर्यंत सगळी तयारी करून रहायला मी तिला सांगितलं होतं. सहा वाजता घरी येऊन पहातो तो काय ? ही आपली केस पिंजारून कडकलक्ष्मीसारखी बसलेली. आता हिची तयारी व्हायला आणखी तासभर लागणार आणि सिनेमाचा अर्धा भाग चुकणार म्हणून मी जवळजवळ ओरडलोच, "अग तू तयार कां झाली नाहीस अजून ?"

"म्हणजे ? अहो मी तयारच आहे." तिनं खुर्चीवरून उठत शांतपणे सांगितलं.

"तयार ? याला काय तयार म्हणतात ? अग अजून केस सुद्धा विंचरले नाहीस तू ?" मी पुनः कातावून ओरडलो. पण माझ्या रागावण्याचा तिच्यावर काहीच परिणाम झाला नाही. उलट ती हंसऱ्या चेहऱ्याने म्हणाली, "अय्या ! अहो ही नवी केशरचना आहे. 'कडकलक्ष्मी' मासिकात दिली आहे. या रचनेचं नांव आहे 'निसर्ग बहार.' म्हणजे नैसर्गिक अवस्थेतल्या सारखे केस करायचे असतात या रचनेत. अहो गेले दोन तास मी केस विसकटून नैसर्गिक अवस्थेत आणीत होते त्यांना. तेव्हा कुठं आता ही रचना जमली! आणि तुम्ही म्हणता की केस विंचरायचे राहिलेत म्हणून ! आता बाई कमाल झाली. जगाच्या अगदीच मागं आहात हो तुम्ही !"

मी निश्चयाने म्हटले, "मी साफ सांगतो, मी येणार नाही तुझ्या बरोबर अशा अवतारात. अग मला निदान जनाची तरी काही आहे की नाही ? एवढ्या मोठमोठ्या बायका येणार तिथं. आमचा साहेबसुद्धा कदाचित् येईल सिनेमाला बायकोबरोबर. त्यानी असं जर तुला पाहिलं, तर ती म्हणेल की याची बायको अगदीच जंगली आहे. तूं चार माणसांसारखे नीट केस विंचर आणि मग ये माझ्याबरोबर."

झालं. सौ. नं बरीच आदळआपट केली, पण अखेर केसावरून फणी फिरवून ती माझ्याबरोबर सिनेमाला आली. मध्यंतरात दिवे लागले आणि खरोखरच आमचा साहेब बायकोबरोबर आल्याचे दिसले. पण त्याहून आश्चर्य म्हणजे त्याच्या बायकोने 'कडकलक्ष्मी' मासिकात सांगितलेलीच 'निसर्ग बहार' की काय ती केशरचना केली होती! मी तिची आणि माझ्या बायकोची ओळख करून दिली, तेव्हा साहेबाची बायको चमत्कारिक नजरेने सौ. कडे पहात होती. नैसर्गिक अवस्थेत केस आणायचे सोडून ही वेणी अंबाडा घालण्याची कुठली जंगली पद्धत! असाच विचार तिच्या त्या चमत्कारिक दृष्टीत होता. ती जरा दूर गेल्यावर माझी सौ. म्हणाली, "पाहिलंत ! आजकाल मोठ्या बायका अशीच मॉडर्न हेअर–स्टाईल करतात. तुम्ही, मात्र मला अडाणी बायकांच्या सारखी वेणी घालायला लावलीत !" यावर काय बोलावे हे मला समजेना. कारण या नव्या केशरचना देऊन कोण्यातरी केशरचनातज्ज्ञ बाईने त्या दिवशी केसाने माझा गळा कापला होता, हे मात्र खरे.

केशभूषेबरोबर वेषभूषा आलीच. सध्या इतर सर्वच क्षेत्रातल्या प्रमाणे पोषाखातहि स्पेशॅलिझेशन निघालं आहे हे माझ्या लक्षात यायला कारण असं झालं, की एका रविवारी सकाळी सौ. विद्या आपलं घरकाम सोडून कसले तरी टाईम-टेबल आखीत बसली होती. मी ते लांबूनच पहात होतो. हीची थट्टा करण्यासाठी मी म्हटलं, "काय ग, मला न सांगता तू कुठल्या शाळेत शिकवायला लागली आहेस की रेल्वे खात्यात नोकरी धरली आहेस ? सारखं टाईम-टेबल मांडते आहेस म्हणून विचारलं."

"थांबा हो. मला डिस्टर्ब करू नका. 'कारभारीण' या मासिकात आलेलं वेळापत्रक उतरून घेते आहे मी." तिनं फूटपट्टीने एक रेघ ओढीत सांगितले.

"कसलं वेळापत्रक? कोणत्या वारी कोणत्या तासाला कोणत्या शेजारणीशी भांडायचं याचं?" मी अजूनहि थट्टेच्या सुरात विचारलं.

"ही फार गंभीर गोष्ट आहे. उगाच त्यांची टिंगल









करू नका. हे किनई कपडे, वेण्या, पर्स यांच्या रंगसंगतीचं पत्रक आहे. उगीच वाटेल त्यावेळी वाटेल तसे कपडे घालून बाहेर पडायचं नसतं. त्यालाहि एक शास्त्र असतं. हे पहा पत्रक–" असं म्हणून तिनं 'कारभारीण' मासिकातलं पत्रक माझ्यापुढे धरलं. ते असं होतं:

| दिवस | वेळ | साडीचा रंग | गजऱ्याचा रंग | पर्सचा रंग | ब्लाउजचा रंग |
|---|---|---|---|---|---|
| | संध्याकाळी | | | | |
| सोमवार | ५ | पांढरा | गुलाबी | तांबडा | लाल |
| मंगळवार | ६ | पिवळा | अबोली | निळा | काळा |
| बुधवार | ५॥ | निळा जांभळा | फिक्का निळा | पांढरा | सोनेरी |
| गुरुवार | ६॥ | तपकिरी | उदी | अबोली | पांढरा |
| शुक्रवार | ७ | हिरवा | पिवळा | काळा | लाल |
| शनिवार | ५॥। | पिवळा | अबोली | फिकट निळा | गडद हिरवा |
| रविवार | ४ | काळा | पांढरा | सोनेरी | काळा |
| " | ६ | चटेरी पटेरी | काळा | पटेरी चटेरी | चटेरी पटेरी |

कपडे आणि पर्स यांच्या रंगसंगतीचं हे वेळापत्रक पाहून मी थक्कच झालो. आमच्या पुरुषांचे हेच वेळापत्रक साधारण असे असते.

| दिवस | वेळ | शर्ट | पॅंट | छत्री | पाकीट |
|---|---|---|---|---|---|
| सोमवार सकाळी | ९। | हाताला येईल तो | न फाटलेली | काळी | एकुलते एक |
| मंगळवार | " | " | " | " | " |
| बुधवार | " | " | " | " | " |

एकंदरीत आमची वेषभूषा अशी मिळमिळीत असते. मात्र बायकांच्या मासिकांनी स्त्रियांच्या वेषभूषेचे केवढे मोठे तंत्र करून ठेवले आहे पहा. अमुक वारी अमुक वेळी अमक्याच रंगाची साडी पाहिजे आणि तमक्याच रंगाचा ब्लाउझ पाहिजे. तशी रंगसंगति नसेल, तर ती स्त्री गांवढळ असे ही सदरे लिहिणाऱ्याचा अभिप्राय असतो. हे सारे स्पेशॉलिझेशन असह्य होऊन मी सौ. विद्याला म्हटले "अग पण आणखी एकदोन रकाने या वेळापत्रकात घालायचे राहिले आहेत. तेहि घे लिहून.

सोमवार–नवऱ्याचा रंग काळा. मंगळवार हिरवा. बुधवार बायकोच्या फॅशनी बघून रागाने लाल रंग. इतकंच नाही, तर त्या कपड्याना शोभेल असे मुलांचे रंग असावेत नि टॅक्सी, बस आणि खाजगी मोटारी यांचे रंग असावेत असा नाही का सल्ला दिला या 'कारभारीण' मासिकानं?"

"तुम्हाला मेली कसली हौसच नाही!" नेहमीच्या लाडिक हसण्याने सौ. म्हणाली, "एवढं साधं टाईम–टेबल पाळायला येत नाही तुम्हाला मग देशात शिस्त येणार कशी?"

"देशाच्या शिस्तीचा यात काय संबंध आहे? आं? अग पूर्वी ही पातळाच्या नि नवऱ्याच्या रंगाची टाईम–टेबलं नव्हती, तेव्हा काय देशात शिस्त नव्हती?"

"ते काही नाही. मी हा प्रयोग करून पहाणारच. फसला, तर पुन्हा नाही हे टाईम–टेबल वापरणार, मग आलं?" सौ. ने अगदीच गळ घातली, तेव्हा मला नाइलाजाने संमति द्यावी लागली. पण मीहि एक अट घातली. ती अशी, की आहेत त्याच पातळात हिने काय ते रंग करावेत. त्यासाठी नवीन साड्या घ्यायच्या नाहीत.

सौ.ने प्रयोग सुरू केला. कसाबसा पहिला दिवस निभावला. मग मात्र 'ती उदी साडी धोब्याकडून आलीच नाही' ह्या 'हिरव्या ब्लाउझचा रंग धुतला गेलाय्', 'पिवळ्या साडीला हिरवी किनार टाईम–टेबलात बसत नाही, अशी खरी खोटी कारणे निघाली आणि हिचे रंगी बेरंगी वेळापत्रक जे एकदा केराच्या टोपलीत गेले, ते गेलेच. अर्थात ते पत्रक कोणत्या रंगाच्या टोपलीत टाकून द्यायचे याचा खुलासा मूळ लेखात नव्हता ही त्यातल्या त्यात समाधानाची गोष्ट!

ही केशभूषा, वेषभूषा आणि गृहरचना या साऱ्यांना मी कसेबसे

तोंड दिले असते. पण शेवटी जेव्हा सौ. विद्याने खाण्या-पिण्याच 'सप्ताह' सुरू केले, तेव्हा मात्र माझी सहनशक्ति मावळली. 'अस्तुरी' नांवाच्या स्त्री-साप्ताहिकाने ही नवी टूम काढली होती. या सुखवस्तु टुमटुमीत बायका काहीतरी टूमा काढतात आणि आमच्या सारख्या सर्वसाधारण गृहस्थांची पंचाईत करतात. कारण एका रविवारी सकाळी सौ. विद्याने चहाबरोबर पावाचे टोस्ट केले. अर्थात् त्यात काही गैर नाही म्हणून मी ते टोस्ट खाल्ले. पण काय हो, एक माणूस एका दिवसात किती पाव खाईल याचे तुम्ही कधी गुणित केले आहे काय? नसेल तर आमच्या घरी त्या दिवशी मी जितका पाव खाल्ला, तो पाव खाण्याचा जागतिक विक्रम आहे असे खुशाल समजा. कारण सकाळच्या चहानंतर विद्याने दहा वाजता पावाची भाजी केली. तीहि मी विरोध न करता खाल्ली. पण बारा वाजता जेवतानाहि ताटात पावच पाव पाहून माझे पित्त खवळले. भाताऐवजी पावाचे बारीक तुकडे होते. तोंडी लावणे म्हणून पावाची भाजी होती. चवीला पावाची चटणी होती. आमटीहि पावाची होती आणि चपाती पोळीऐवजीहि पावच होता. फार काय, गोड पदार्थ म्हणून पावाची जिलबी होती! मी ओरडून म्हटले, "अग, तू काय बेकरी काढली आहेस की काय?"

"मी? नाही बाई!" माझ्या वाकड्या प्रश्नाला तिने सरळ उत्तर दिले.

"मला वाटलं की तू बेकरी काढली आहेस आणि न खपलेला सगळा पाव एका दिवसात संपवायचा तुझा बेत आहे" मी पानातल्या पाव-प्रकारांना हातहि न लावता म्हटलं. त्यावर तिने किंचितसे हंसून म्हटले, "हां. हां. आता आला तुमचा टोमणा माझ्या लक्षात. अहो 'अस्तुरी' साप्ताहिकानं ही आयडिया काढली आहे. दररोज सर्व जिन्नस एकाच पदार्थाचे करायचे. रविवारी पावाचे, सोमवारी मुगाचे, मंगळवारी उडदाचे—"

"बस्. बस्. अग पण माणूस पाव खाईल तरी किती? आता ही जिलबी म्हणून तू वाढली आहेस. पण खरं म्हणजे हा जिलबीच्या रंगाचा पावच आहे. आता पावाचं पाणी केलंस की सुटलीस. त्या अस्तुरी का कस्तुरीनं तेहि सांगितलं नाही का?" मी उपरोधानं विचारलं.

"पण खाऊन तरी पहा. त्या साप्ताहिकानं म्हटलंच आहे, 'जिच्या हाती पाककला तिचा संसार धन्य झाला—'"

"ते खरं असेल. पण केव्हा? तर जेव्हा ही बायकांची मासिकं नि साप्ताहिकं न वाचता बायका स्वयंपाक करतील तेव्हा. अग आता तूच पहा, असा निरनिराळ्या नांवाखाली पोटभर पाव खाऊन कुठल्या नवऱ्याला धन्य वाटेल? मी सांगतो तुला. कुठल्यातरी बेकरीवाल्यांच्या संघटनेनं पावांचे हे प्रकार त्या संपादकाच्या गळ्यात बांधले असतील."

असा आमचा बराच वादविवाद झाला. अखेर हिने मोठ्या हौसेने केलेले ते पावांचे अघटित प्रकार खाऊन तरी पहाण्याचे मी कबूल केले. खरे म्हणजे जिलबी आणि चटणी यांच्या चवीत काही फरक नव्हता; फरक असलाच, तर तो फक्त रंगात आणि आकारात होता. तो विविध प्रकारचा पाव खाताना 'अस्तुरी'च्या संपादकांना मी मनातल्या मनात जी पुष्पांजली वाहिली, ती जर संपादकांच्या कानी गेली असती, तर त्यानी आपले नियतकालिक तात्काळ बंद केले असते यात शंका नाही. पण पाव हा सौ. विद्याच्या नव्या फॅडमधील अखेरचा शब्द नव्हता. दुसऱ्या रविवारी तिने आधल्या रविवारचे स्वतःचेच रेकॉर्ड मोडले. कारण दुसऱ्या रविवारी जिकडे तिकडे मूगच मूग तिने करून टाकला होता. सकाळी चहाबरोबर मुगाची उसळ, दहा वाजता मुगाची उसळ, जेवताना मुगाची उसळ, मुगाची आमटी, मुगाचा 'भात', मुगाची गोड उसळ, मूग, मूग, उसळ, उसळ, मूग, उसळ, उसळ, मूग. हे सारे पाहून मी उसळी खाऊन—मुगाची नव्हे—ओरडलो, "या पुढे मी हे मूग गिळून स्वस्थ बसणार नाही."

"अहो पण मूग हे प्रकृतीला फार चांगले असतात. नि 'माहेरवाशीण' या मासिकाच्या संपादिकेनं म्हटलं आहे की आजचा रविवार 'मुग्या रविवार' म्हणून साजरा करावा. भारतात तांदळाची टंचाई आहे ना, म्हणून मूग, उडीद यांचे खास दिवस साजरे करायचे अशी सूचना आहे त्यांची."

"पण मला हे मुळीच खपायचं नाही. अग हे असले उपदेश नि सूचना वाचायच्या आणि सोडून द्यायच्या असतात. खुद्द त्या संपादिकेच्या घरीच जाऊन पाहिलंस, तर ती पांढरा भात, काळा भात, साखर भात यांच्यावर ताव मारीत असलेली दिसेल तुला. तुमच्या सारख्या बावळट बायका असलं काहीतरी 'मुग्या रविवार' नि 'उडद्या शनिवार' वाचतात आणि ते सारं खरं मानून तसाच स्वयंपाक करतात. मी समस्त पुरुष वर्गातर्फे तुला इषारा देतो की हे असंच चालू राहिलं तर महाराष्ट्रातल्या संसारांची काही धडगत नाही. 'मुग्या घटस्फोट' आणि 'उडद्या घटस्फोट' घ्यावे लागतील तुम्हा बायकांना." मी करारी वाण्याने सांगितले. इतकंच नाही, तर आणखी पांच वर्षे मी मुगाला स्पर्श सुद्धा करणार नाही असा निर्वाणीचा इषारा मी दिला. यापुढे बायकांची मासिके घरात आलीच, तर त्यांतल्या फक्त गोष्टी किंवा प्रवासवर्णनं वाचायची अशीहि अट मी घातली. त्यातले परिचयसुद्धा बरेचसे काल्पनिक असल्याने आणि संपादकांना आलेली पत्रे पूर्णपणे काल्पनिक असल्याने तीहि वाचण्याची परवानगी मी विद्याला दिली.

आश्चर्य असे, की तिने माझ्या सर्व अटी मान्य केल्या. तेव्हा मी प्रसन्न होऊन म्हणालो, "बस्. आता तुला काय हवं ते माग."

डोळ्यात शक्य तेवढा लाडिकपणा आणून ती म्हणाली, "बरं किनई गडेऽऽऽ. 'आर्या' नांवाचं एक स्त्रियांचं नवं मासिक निघालं आहे, ते सुरू करावं गडे आपल्याकडे!"

आता 'तथास्तु' म्हणण्याशिवाय मला काहीच गत्यंतर उरले नव्हते!


"I had the hardest assignment [illegible] and I am alive and kicking in [illegible] correspondent Mr. [illegible] an exclusive [illegible]

You have [illegible]

[illegible] generation of journalists [illegible] up [illegible] to make it more disciplined" he said through his [illegible] rather a [illegible] at the fire-pl[illegible] understood the reason at once.

This is an entirely [illegible] fabrication from beginning to end. Not a word of it is true. Publishers and [illegible] note
G. Bernard Shaw
12/10/1949

--वसंत देशमुख



# मुकाबला! बर्नार्ड शॉ यांचेशी!!

दुसरे महायुद्ध १९४५ साली संपलं. माझ्या मस्तकात एक वेगळंच युद्ध चाललं होतं. युद्धाची तयारी करण्यास अवधी लागतो. मीसुद्धा तब्बल तीन वर्षं घेतली. १९४८ साल उजाडलं. पत्रकारांना मिळणारा लंडन स्कूल ऑफ ज्यर्नालिझमचा डिप्लोमा घ्यावा हा बेत पक्का झाला. अठरा धड्यांचा शिक्षणक्रम! पण लंडन स्कूलचा दर्जा उत्तम! एका वेळी दोनच धडे! ते इंग्लिश स्टँडर्डला येईपर्यंत पुढचा मिळतच नसे! त्यातले दोन धडे जरा आगळेच होत. मृत किंवा हयात असलेल्या अत्यंत नामवंत अशा दोन प्रतिभासंपन्न साहित्यिकांच्या दोन संपूर्ण काल्पनिक मुलाखती घ्यायच्या! साहित्यिक कुठलाहि निवडावा! त्याला निर्बंध नव्हता.

मी निवडले शेक्सपीअर आणि शॉ! शेक्सपीअरची मुलाखत घेण्यास 'वरती' जाण्याचं प्रयोजन नव्हतं! मी जे प्रश्न विचारले (अर्थात काल्पनिक मुलाखतीत!) त्यांची उत्तरं शेक्सपीअरसाहेबांना मुक्तछंदातच मी त्यांना, त्यांच्या विशिष्ट ढंगासह द्यावयास लावली. ही काल्पनिक मुलाखत लिहीत असताना हा जगद्वंद्य नाटककार, हॅमलेटच्या पिशाच्चासारखा माझ्या मागं उभा राहून, मी काय लिहितो ते वाचत तर नाही ना, अशी विचित्र शंका येऊन मी दोनचारदा मागं वळून पाहिलं देखील! स्ट्रॅटफर्डचा शाहीर काही दिसला नाही!

शॉचा 'इंटरव्ह्यू' मी जरा कसूनच लिहिला. खरोखरीच जर का त्यांची मुलाखत घेतली असती तर त्यानी आपल्या स्फोटक पद्धतीनं उत्तरांचे तडातड वायवार कसे काढले असते हे लक्षात घेऊन मी दोन पानी मुलाखत लिहिली होती. लंडनच्या त्या स्कूलच्या पत्त्यावर ती पाठवून सुटकेचा निःश्वास मी टाकल्याचं मला स्मरतं!

त्याला दोन तीन महिने झाले असतील. एके दिवशी एक खाकी रंगाचा लिफाफा माझ्या नांवे आला. मोठ्या ठळक अक्षरात माझं नांव नि पत्ता वर लिहिलेला होता. अक्षर मुळीच ओळखीचं नव्हतं! घसमुसळेपणानं (नेहमीच्याच!) मी ते पाकीट टर्कन् फोडलं!

आत दोन पानी मुलाखत होती! काल्पनिक! शिक्षकांनी काय कोरडे ओढले आहेत, ते समजण्यास मन अगदी उतावीळ झालं! पत्राची घडी उलगडली!

लालभडक शाईनं लिहिलेला चार ओळींचा मजकूर पहिल्याच पानावर खरडला होता कुणीतरी! मला संताप आला होता! छे! हॅ! काय पद्धत झाली! शेरा मारायचा तो असा काय? मी







अनुक्रमणिका

खालच्या सहीकडे पाहिलं नि अगदी स्तिमीत झालो! माझा माझ्या डोळयांवर विश्वासच वसेना! मी डोळे चोळले! चांगले विस्फारले! माय गॉड! खुद्द जॉर्ज बर्नार्ड शॉनी आपल्याच हस्ते ह्या चार ओळी खरडल्या होत्या!

"This is an impudent fabrication from Beginning to End. Not a word of it is authentic. Publishers and Editors please note.

—G. Bernaurd Shaw
12-10-1949"

हे (ही काल्पनिक मुलाखत!) अथपासून इतिपर्यंत बनावट आहे. एक शब्दहि विश्वासार्ह नाही. प्रकाशकानी अन् संपादकांनी कृपया नोंद घ्यावी!

जी. बर्नार्ड शॉ.
१२–१०–१९४९

शॉसाहेवांची ती कडक नि उर्मट प्रतिक्रिया वाचून मीहि भडकलो! चांगलाच भडकलो! हूँ! लेकाचा शॉ झाला म्हणून काय झालं? हे–हे असं भलतं सलतं लिहायचं काय?

हां! पण लंडन स्कूलच्या टीचरकडं पाठविलेली मुलाखत शॉकडं गेलीच कशी? हे कोडं मात्र मला उलगडेना! रागारागानं मी त्या टीचरला पत्र खरडलं. माझा संताप मी अर्थातच व्यक्त केला होताच. पण ती मुलाखत शॉकडं गेलीच कशी ह्याचं स्पष्टीकरण करण्याबद्दल मी त्यांना ठणकाविलं होतं. शॉनं रक्ताळलेले ओरखडे काढलेल्या त्या मुलाखतीचे दोन कागद त्या पत्राला मी जोडले. ते पाकीट त्यात घट्ट वंद केलं अन एअरमेलचा भुर्दंड भरून आदळलं एकदाचं त्या लाल पेटीत! ते खाली पेटीत पडल्यावर टचकन् जो आवाज झाला त्यामुळे शॉसाहेवांची दाढीच खेचल्याचा आसुरी आनंद मला झाला.

आठवड्याच्या आतच टीचरचं पत्र आलं. सोवत ते दोन सुप्रसिद्ध कागद! शॉनं ओरबाडलेले! टीचरनं लिहिलं होतं......



लाजवंतीचा वसंत

अर्धचंद्र मिळताहि मला गे
सदा××ला चकोर भुलला
नि जून हो त्या मुडुपामागे
लाजवंतीचा वसंत फुलला

—कोंडवा

"प्रिय देशमुख!

आपल्या पत्रातून शॉसंबंधी उफाळणारा संताप वाचून माझी इकडं भरपूर करमणूक झाली. करमणूक अशासाठी की आपल्याला जो हा एक अमोल ठेवा मिळाला आहे त्यामुळं हर्षोफुल्ल होण्याऐवजी भडकलाच, हे वाचून मी थक्क झालो! अहो! शॉसाहेवांना हजारो पत्र जगाच्या कानाकोपऱ्यातून येत असतात. ती वाचायलाहि त्यांना वेळ पुरत नाही! तुमची ती मुलाखत... अरे. हो!

ते सांगायचं राहूनच गेलं. तुमची ती काल्पनिक मुलाखत मी वाचली. अगदी काळजीपूर्वक वाचली! फारच आवडली वुवा ती आपल्याला! शॉची नि माझी चांगलीच गट्टी आहे गट्टी! म्हणून मीच ती त्यांच्याकडं पाठविली. त्यानी ती वाचली! अन् खरं सांगू त्यांनी असा अर्वाच्य शेरा कां लिहिला तो? ते चांगलेच डिवचले गेले. त्यांच्या दर्जालाच तुम्ही आवाहन केलत? त्यांच्या वौद्धिक मग्रुरीला तुम्ही हिसकाच दिलात क्षणभर! त्यामुळं ते खवळले. विशेषत: हा भाग त्यांना विशेष झोंवला असावा!

"Do you believe in God, Sir?"

(आपला परमेश्वरावर विश्वास आहे काय?" मी दवकतच विचारलं?)

"I do!" (होय! त्यांचं उत्तर कडक आलं!)

"Why Sir?" (कां? कां बरं? माझी पृच्छा!)

(कां? कारण तो तर तुमच्याच समोर बसला आहे की!" मिस्किलपणे दाढी कुरवाळीत ते म्हणाले) शॉच्या अफाट व्यक्तिमत्वाचं सार ह्या चार छोट्या वाक्यात आपण आणलं आहे असं मला वाटतं! आपण शॉचा शेरा वाचून रागावलात! संतापलात! हूँ! त्यामुळंच तर माझी करमणूक झाली! चांगलीच! अहो! त असं कुणाला कधी लिहीत नाहीत! ज्याना हे असं मिळतं ते खरंच भाग्यवान! त्यांची लिहिण्याची, बोलण्याची पद्धतच ही अशी तिरकस, किंचित् शिवराळ आहे! पण तो महाभाग आहेच तसा खमंग! त्याला कोण काय करणार?

म्हणून म्हणतो मि. देशमुख! रागावण्यासारखं त्यात काहीच नाही! त्यात उलट आपला गौरवच आहे! जपून ठेवा! नीट जपून ठेवा! फारच मोलाचा ठेवा आपल्याला मिळाला आहे बरं! शुभेच्छा!

आपला.
जे. के. टी. जॉन्सन.

पत्र वाचल्यावर माझ्या मनातला राग क्षणातच वितळला! हंसू फुटलं नि चर्या एकदमच खुलली. आयुष्यात एका जगद्विख्यात व्यक्तीची अगदी नकळतच ही असली कुरापत काढली याची जाणीव होऊन अंतर्मन बालिश आनंदानं कारंज्यासारखं थुईथुई उसळ्या घेऊ लागलं!

मोठ्या व्यक्तींच्या सह्या वगैरे घेण्याचा मला तिटकारा! आत्यंतिक घृणा! पण शॉची स्वाक्षरी नि त्याची जळजळीत मानसिक प्रतिक्रिया ही अशी माझ्या घरी साता समुद्रापलिकडून माझा पत्ता काढीत काढीत, धडपडत आपसूकच आली!

शॉ हे एक जागतिक आश्चर्य होतं! साहित्यावर जीवापलिकडं प्रेम करणारी माझ्यासारखी व्यक्ती कशावरहि तिलांजली सोडेल! पण त्या काल्पनिक मुलाखतीवर कुठल्याहि परिस्थितीत नाही!

●●●

अनुक्रमणिका





अनुक्रमणिका







[पान १७ वरून—सोन्या बागलाणकर]

"लेझीम बिझीम लावून ! मरू दे ते. तो अहवाल वाच. आमचा जो बुर्जा उडाला त्याचा पूर्वार्घ त्यात आहे. उत्तरार्घ नंतर ऐक."

आणि मग मी तांवडे गुरुजींनी लिहिलेला अहवाल वाचायला सुरवात केली. हे सगळे गुरुजी लोक जांभळ्या शाईत कां लिहितात देव जाणे. अक्षर सुवाच्य होतं. पण पहिल्याच वाक्यावर ठेच लागली.

"ब्राझ्या वित्रानो आडि बराठी भाषेवर प्रेव करडारानो– कुठल्या भाषेत आहे रे हे ?"

"सर्दीने नाक चोंदलेल्या मराठीत ! तो तांवडेगुरुजी इतका इरसाल असेल अशी कल्पना नव्हती."

". . . आज आपल्या लावडगांवात ही वोली बोठी वुक लेहदारी बादसं आली.... अरे भानगड काय ही सोन्या !"

"अरे त्या स्वागताध्यक्षाला झाली होती ज्याम सर्दी. तो जसं बोलत होता तस्सं 'जे मुखी ते लेखी' ह्या न्यायाने तांवडे गुरुजीनी आणि त्यांनी तांकीद दिल्यामुळे त्यांच्या हाताखालच्या इतर चिल्लर गुर्जी आणि गुर्जिणींनी लिहून काढलं."

". . . ह्या सगड्याच बी स्वा आ आ आ छी : (इथे स्वागताध्यक्षाला आलेली शिकही– तांवडे गुरुजींनी लेहून कहाडली होती.)"

सोन्या माझ्यापुढे कघी नाही तो हताश होऊन बसला होता. मघूनच 'अंवुजादेवी–अंवुजादेवी...लंवुजा देवी...' असे प्रासही जुळवीत होता. सोन्या वास्तविक भलता संस्कृतवाला. पण अंवुजादेवी आजरेनामक कन्येपुढे आमचा हा 'यति वेडाऊनि गेला!' (खरं म्हणजे तीच ह्याला वेडावून गेली.) थोडक्यात म्हणजे भलत्या घोड्यावर खेळला. मी तो 'बोलावे तसे लिहावे' तत्त्वाबरहुकूम बनवलेला अहवाल वाचून ओळी-ओळीत ठेचकाळत होतो.

"हे रे काय सोनबा ?– स्वाआज्य मिळाल्या नंतअ भाअतात निन्निआळया पकाअच्या सुधाअणा कआयच्या ठीवून–अरे हे आमच्या पालीसारखं वाटतं—"

"ते प्रोफेसर गुंडगोळकराचं भाषण असेल. याला र म्हणता येत नाही—"

मग मी त्या मराठी साहित्य संमेलनाच्या वृत्तात्तांतून, आल्यागेल्याचं, वायावापड्यांचं, शेजाऱ्यापाजाऱ्यांचं, असं नाना तऱ्हेचं मराठी शोधायला लागलो. मराठी भाषा जर इतक्या प्रकारानी नटायला लागली तर तिचा अवतार हजार धांदोट्यांचा परकर नेसलेल्या कडकलक्ष्मीसारखा दिसेल याची खात्रीच पटली. वायावापड्यांच्या मराठीत झालेला मराठी नाट्यावरचा परिसंवाद तर भलताच नामी होता. आमच्या विद्वान मंडळीनी हे लोकाभिमुख मराठी इतक्या झटक्यात पचवलं असेल अशी कल्पनाही नव्हती. म्हणजे वर्षापूर्वी 'आत्माविष्करण–अभिव्यक्ति, आकृतिबंध, गोचर, आगळे, प्रकटीकरण असल्या खडकाळ वाटेने जाणारी माणसं एकदम भलती देशी होऊन गेली होती. एका प्राध्यापकाने तर मराठी नाट्याचा सगळा इतिहास चावडीवर बसून तंबाकू चोळीत सांगितल्यासारखा सहजी सांगितला होता.

"म्हणजे वरं का भिडूंनो– किर्लोस्कराचा अन्ना होता वरं का? मुलकी खात्यात. साहेबाच्या जमान्यात त्यानं राव दुष्यंतराजानं शकुंतलेशी गंघर्व लावला का कणवबावाच्या फारिष्टातल्या आशर्मात त्याच्यावर जाम शेदीडशे गाणी-विणी घालून नाटक केलं. त्याचा घंदा जमला तशी साहजिकच चार छंदी फंदी घावले. म्हणाले असतील, लाईन बरी आहे. किर्लोस्कराचा अण्णा चांगला उच्चापुरा. देखणा. गोरापीट. आपल्यासारखे घा गाण्या-वजावण्यातले पोरं न् बाप्ये जमवले. दुसरं नाटक काढलं. सुभद्रेच्या लग्नाचं. घो घो चाललं राव. गाणी तर एकावर एक फायन्‌बाज. अजून देखील पापिलर. मग देवलमास्तर आले. त्यानं एक नाटक काढलं वहिमी स्वभावाच्या नवऱ्याचं. ही मजा. सौशयकल्होळ. म्हणजे हिचा त्याला न् त्याचा ह्याला नुसता वहीम. सगळी मज्जा नुसत्या फोटूवर बर का– गड्यानो. त्यातली गाणीसुद्धा हिट् गेली. म्हणतानी म्हाताऱ्या नवरदेवाचा फार्स काढला. न् नाव ठेवलं शारदा. एवदुश्या न्हात्याघुत्या पोरीचं लगीन जमवलं म्हाताऱ्याशी. भटं पैशाची लोभी न् म्हातारा लग्नाच्या घाईला आलेला. मग एक कोदंड असतो तो त्या म्हाताऱ्याचा करतो बावचा... अशी मजे मजेची नाटकं. आन् मग गडकरीमास्तर झाले. वरेरकर मास्तर झाले. हे मूळ पोष्टमस्तर मागून नाटकांत तालीम मास्तर झाले. आन् मग अत्रेमास्तर आले. हे आघी मास्तर मग नाटकात आले. त्यांनी जी नाटकं लिहिली माणसाच्या हासून हासून भुकना पडायचा." मी पानं उलटली अहवाल



अनुक्रमणिका






चालूच होता. प्राध्यापक गरूडानी नाटकाचं मूळ भांडणात असतं असं सांगितलं. "म्हणजे काय सांगू माझ्या दोस्ताहो—नाटक होतं कशातून. संघर्ष म्हणजे काय दोन पाटर्यात जुपली पाहिजे. बापलेक म्हणा. नवराबायको म्हणा—कुणाची तरी लेक आन् कुणाचा तरी ल्योक म्हणा—पण आधी त्यांची झडवायची आणि हाळू हाळू बेताबेतानं गुमतीगमतीनं मिटवायची आणि लगीन लावायचं. असल्या नाट-काला पूर्वीची—उगीचच स्वताला शाह्यणी समजणारी माणसं 'सुखा-न्तिका' म्हणायची आणि समजा लगीन नाही जमलं किंवा त्यातलं कुणी तरी मयत झालं तर 'दु:खांतिका' म्हणायचे. आता हे सुखांतिका न् दु:खांतिका कुणाला कळायचं ? आपल्या बायाबापड्यांच्या मराठीत जिथं सगळ्यांचं भलं होऊन नाटक संपतं त्याला आपण सगळ्याना कळेल अशा भाषेत गोड नाटक म्हणू आणि दुसरं असतं त्याला खरं नाटक म्हणू. म्हणजे खारं जेवण जसं जरा मिरची जास्त झाली आणि नाकाडोळ्यातून पाणी आलं तरी आपल्याला आवडतं तसं— स्टेजा-वरचे दुसऱ्या लोकांचे हाल बघणं आवडतं. अणि गोडं तर सगळ्यानाच आवडतं. आज आपल्या भाषेत गोडी नाटकं फार. अबून मबून थोडी खारी नाटकंही हवीत."

बाकी 'गोडी नाटकं-खारी नाटकं' असल्या भाषेत मराठीतले विद्वान लिहायला लागले की माजघरातलं मराठी, सैपाकघरातलं मराठी असल्या मराठीत लिहिलेल्या पुस्तकानी वाचनाची भूक वाढली न वाढली तरी साधी भूक वाढेल याची मला तरी खात्रीच पटली.

आणि तेवढ्यात सोन्या म्हणाला—

"आता सांग. हे लेखक विचारतील की नाही? मराठी गोष्ट पाहिजे? नाटक पाहिजे—कविता पाहिजे ? ठीक आहे. कुठल्या मराठीतली बनवून देऊ ?— थांब." असं म्हणून सोन्याने पिशवीतून एक वर्तमानपत्राचा अंक काढला. 'वाचा आता हा बायाबापड्यांच्या मराठीतला अग्रलेख." मी वाचायला सुरवात केली. 'व्हेटनामची हाणामारी आणि जान्सनसाहेब' असा मथळा होता. आणि पहिलं वाक्यच ऐशा ठसक्यात होतं— "आता हा अमेरिकेचा जानसन! आता लेका कुठं तुझं गांव आन् कुठे व्हेटनाम. सांगाबर पेपेर वाचना-रानो. गप पडाव आपली पाव भिस्कुट खात का नाही? नाही त्या उचापती करायची गरज आहे का बाबा. वर तुला काय कमी आहे. दावजोर पैसा लेकाहो तुमच्याकडं. चड झाला अनला तर आमच्या देशाला धाडा. बांबगोळ्यापायी उगच लुसकानी करायची. ज्येचं ते आपल्या कर्मानी चडतय न् पडतय. तेव्हा आमचं आयका न् ही हाणामारी आणि बांबफेक आवरा. आणि गहू धाडताय आम्हाला. आम्ही काय नाही म्हणत नाही. पण जानसनसाहेब तुमचं ध्यान लढाईत गुंतलेलं पाहून तुमचे कोठावळे कसला कंडम गहू धाडतायत आम्हाला काही ठावकी आहे का आपणाला ? तुमच्याला द्यायच ते नीट सडून पाखडून द्यावं—"

"सोन्या अरे आंतरराष्ट्रीय विषयदेखील बायाबापड्यांच्या मराठीत आले. वा ! तुझा अध्यक्ष भलता जोरदार निघाला मित्रा. खरं पण त्याचं भाषण कुठे ?








"हे वाच !" सोन्याने एक चोपडं पुढे टाकलं.

"माझ्या लंगोटियारानो–मैंतर मैतर्णीनो आणि पोट्टे पाट्टे हो–"

'वा ! सोन्या तू काही म्हण पण बंधुभगिनीनो पेक्षा ह्यात नक्कीच जास्त सलगी आहे."

"पुढचं वाच."

"ह्या साहित्यसंमेलनाचा अध्यक्ष ह्या भूमिकेतून मी आपणासमोर भाषाविषयक मूलभूत सिद्धान्ताचं– विवेचन करणार आहे. माझ्या सौंगड्यानो, मानवी संस्कृतीच्या विकासात भाषेला परम महत्वाचं स्थान आहे. मानवी प्रगतीचा आलेख काढू गेल्यास, गड्यानो, विकासांतर्गत विरोधाचे आणि विरोधांतर्गत विकासाचे अद्‌भुत ताण कधी ढर का यार, काही विशिष्ट रीतीने प्रगत अथवा परागत अथवा उर्ध्वगत अथवा काय सांगू–गडे हो, अधोगतसुद्धा झालेले दृग्गोचर होतात..."

"सोन्या अरे हे रे कुठल्या बायावापड्यांचं मराठी ? ह्यात कुठे आहे जे मुखी ते लेखी ? ह्या मद्राशाच्या उप्पीटात मधून मधून शेंगदाण्याचे तुकडे सापडतात तसे गडे हो आणि सौंगड्यानो पेरले आहेत की— हे कोणाचं मराठी म्हणायचे ?"

"ह्याला अध्यक्षाचं मराठी म्हणतात !" सोन्या शांतपणाने म्हणाला आणि कॉफी आली, "त्यांचं ठीक आहे रे.. अध्यक्षाला हार झाले. टाळ्या झाल्या. आही मोरू. बोलावे तसे लिहावे म्हणून हे लिहिलं आणि त्याला हे उत्तर" एका टाचणीने जोडलेली दोन पत्रे सोन्याने माझ्यापुढे टाकली. बोली मराठीत. सोन्याने अंबुजा-देवीपुढे खिसा उलटा करावा तसं आपलं अंतःकरण उलटं केलं होतं.

"बास्. आपण तुमच्यावर जाम खूष. लग्नाबाबत बाटाघाटी कराव्या म्हंटो, तेव्हा बोला !"

सोन्या ह्या माणसाला चक्कल अ चव्हां के चणार ये देव जाणे. 'मुखी ते लेखी म्हणून असलं पत्र लिहायचं ? अंबुजादेवीनी चार ओळीत सोन्याला हा—हाणला होता !'

'मिष्टर बागलाणकर, आपण इतके आचरट असाल अशी कल्पना नव्हती. साहित्यसंमेलनाला इतकी असंस्कृत माणसं येत असतील हे माहीत नव्हते. आपल्यासारख्यानी एखाद्या मुंबईच्या मवाल्याला शोभेल असल्या भाषेत पत्र लिहिलेलं पाहून प्रथम संताप भाला आणि नंतर कीव आली. माझा विवाह ठरला आहे. योग्यवेळी निमंत्रण पत्रिका येईलच.'

"तुला सांगू सोन्या—" मी शोकसभेचा प्रस्ताव मांडायला सुरवात केली.

"कांही सांगू नकोस— ही तिची निमंत्रणपत्रिका—" सोन्या पिशवीतून जादूगार जसा गोटया, अंडी, ससे वगैरे काढतो तशा एकेक वस्तु काढीत होता.

"ती तरी बायावापड्यांच्या मराठीत आहे का ?"

"इंग्लिशमध्ये आहे !" सोन्या.

"सोन्या – तूं आमचं ऐकणार नाहीस पण सांगू का ? मराठी कानडी मद्रासी गुजराती कुठलीही भाषा असो – सगळयांना कळणारी भाषा एकच ?"

"कुठली ?"

"स्वतःच्या मतलबाची ! काय ?"

"यू आर राइट !"

"अरे आपण वर्जा उडवणारातले नव्हे. ज्यांचा उडतो त्यातले. कितीदा सांगायचं तुला ? कॉफी थंड होतेय् ! घे !"

सोन्याला तसं ते निमूट कॉफी पिताना पाहून, खरं सांगतो, माझा कंठ दाटला.

[ पान ३३ वरून--पाठमोरी ]

आम्ही एकमेकाचे होतो आणि एकमेकाचे नव्हतोही. असे हे विचित्र नाते होते. हे मुलुखावेगळे नाते जपताना मला काय यातायात करावी लागत होती त माझा मीच जाणे. असे हे जगावेगळे नाते फुलवताना मला काय सायास पडत होते ते माझे मलाच ठाऊक !

तशी ती रोज माझ्या दृष्टीस पडत होती. पण त्यात काही अर्थ नव्हता. कधी सूचकपणे हास्याची देवाणघेवाण करता येत नव्हती की कधी सलगीची भाषा वापरता येत नव्हती. कधी ती फार सुरेख दिसत असली तरी रसिकपणे ते तिला सांगता येत नव्हते की कधी तिचा चेहरा ओढलेला दिसला तरी काळजी व्यक्त करता येत नव्हती. कधी एखादे चाफ्याचे फूल वा सुरंगीची वेणी तिला बहाल करता येत नव्हती की कधी कॅडबरी वा साधी सुपारीची पुडी तिच्या बाजूला सरकवता येत नव्हती. अशी ही कोंडी होती. महिन्या-दोन महिन्यातून एखाद वेळेला ह्या कोंडीतून आमची सुटका होई. ऑफीसच्या बाहेर कुठेतरी आडरस्त्यावर आमची गाठभेट होई. माझ्या पाठोपाठ भीत भीत ती हॉटेलमध्ये येई. कितीतरी दिवसानी तो योग आज आला होता. फॅमिली रूममध्ये शिरल्या शिरल्याच ती म्हणाली, "कुणी पाहिलं नसलं म्हणजे मिळवली."

"इथं कोण येतंय पहायला!"

"ह्यांचे नातेवाईक कुठे कुठे फिरत असतात."

तिच्या मनावरचे दडपण कमी व्हावे म्हणून मी गंमतीने म्हटले,

"अरारा! सगळयांचीच फिरतीची नोकरी दिसते."

"चेष्टा नका हो करू."

"राहिलं" आणि उगाचच गंभीर चेहरा करून मी तिच्याकडे टक लावून पाहू लागलो. तिच्या ओठावर हसू उमल लागले तव्हा मी म्हटले, "तू हल्ली मलतीच सुंदर दिसतेस."

पण मला उत्तेजन न देता ती म्हणाली, "तुम्ही हल्ली एकसारखे माझ्याकडे पहात असता."

"तुला कसं कळलं?"

"मला नका विचारू." ती कमालीची लाजली. तिला अशी पाहून कधी नव्हे ती मला भुरळ पडली. तिचा हात हातात घेऊन तिला माझ्या बाजूला ओढल्यासारखी करीत मी म्हटलं, "दुर्गा—"

"अंऽहं" घाईघाईत माझ्या हातातून आपला हात सोडवून घेत तिने विचारलं, "आपलं काय ठरलं होतं?"

"वोटचेपेपणा करीत मी म्हटलं, "ठरवलेलं बदलता येतं."

"बघा हं. असं वागू लागलेत तर मी तुमच्या बाजूला फिरकणारसुद्धा नाही."

"राहिलं" आणि रंगाचा बेरंग होऊ नये म्हणून मी पडते घेतले. निरनिराळ्या विषयावर गप्पा मारून तिला खुलवू लागलो. पण मडपलेली कळी उमलली



नाही ती नाहीच.

वास्तविक मी असे वागावयास नको होते. पण भरतीच्या वेळी पोटातली खळ-वळ किनाऱ्यावर यावी तसे झाले होते. भावनेच्या भरात मी नको त्या विषयाला हात घातला होता आणि आता पस्तावत होतो. आधीच ऑफीसमध्ये तिची माझी गांठभेट होणे दुरापास्त होते, आणि आता माझ्या ह्या आगाऊ वागण्यामुळे ती नजर-भेटही टाळू लागली तर मात्र माझी खरोखर पंचाईत होती. ती दुराव्याने वागू लागली तर तिची कशी समजूत घालावी त्याचा विचार करीतच मी ऑफी-सला गेलो. आणि काय आश्चर्य! चकीत होण्याची पाळी माझ्यावर आली होती. केवळ माझ्या सेक्शनमध्येच नव्हे तर माझ्या शेजारच्या टेबलावर दुर्गा बसली होती. मी क्षणभर गोंधळलो. हे स्वप्न तर मी पहात नव्हतो! हे कसे शक्य होते! हे कसे झाले! मी माझ्या टेबलावर जाऊन बसलो आणि तिच्याकडे पाहिले तेव्हा ती गोड हसली. म्हणाली, "तुमच्या सेक्शनमध्ये माझी बदली झाली आहे".

"खरं?"

"अजूनही विश्वास बसत नाही—?"

विश्वास न बसण्यासारखेच सगळे घडले होते. दुर्गाची माझ्या सेक्शनमध्ये बदली झाली होती आणि अगदी माझ्या-शेजारचे टेबल तिला मिळाले होते. दैव इतक्या चांगल्या तऱ्हेने हसलेले माझ्या आयुष्यात मी कधी पाहिले नव्हते. आता आनंदाला तोटा नव्हता. सुख दारी आले होते. आता हा आनंद, हे सुख मी कसे पेलतो ह्यावरच सगळे अवलंबून होते. तिच्याकडे पहात मिस्किलपणे मी म्हटले, "माझ्या बाजूलासुद्धा तू फिरकणार नव्हतीस."

"फिरकणार नव्हतेही. पण नाईलाज झाला."

"वाईट वाटतं?"

"फार" आणि हुंसल्यासारखे करीत ती म्हणाली, "आता कामाला सुरुवात करा."

आताच तर खरी सगळ्या गोष्टींना सुरुवात झाली होती. धडपड संपली होती. झुरणे संपले होते. आनंदाचा ठेवा माझ्या हाताशी होता. महत्वाकांक्षेच्या मागे लागून मी नोकरी बदलली नाही त्याचे आज हे असे अचानक चीज झाले होते. आता मी अघूनमधून तिच्याशी बोललो किंवा ऑफीस सुटल्यावर इतरांच्या घोळक्यात तिच्याबरोबर बाहेर पडलो तरी कुणाला कसला संशय येणार नव्हता. धोरण राखून थोडेफार धिटाईने वागले तर आता सगळे झकास जमणार होते. दिवसभराच्या ह्या सहवासापोटी अनेक स्वप्ने होती. ती साकार करणे हे आता केवळ माझ्या चतुराईवर अवलंबून होते.

तशी माझी ठीक प्रगति होत होती. दिवसागणिक मी पुढे पुढे सरकत होतो. मनाने आम्ही जवळ येत होतो. माझी धिटाई ती कधी खपवून घेत होती. कधी मला दटावून गप्प करीत होती. कधी हुकत होते. कधी जमत होते. एखाद वेळेला अगदी अनपेक्षितपणे तीच मला उत्तेजन देत होती. एकदा ती म्हणाली,

"आज कँटीनमध्ये जाऊ नका."

"मग पोटाची सोय?"

"मी आहे ना!"

"तेवढं कुठचं माझं भाग्य!"

"आहे ते काही कमी नाही" हंसत ती म्हणाली, "तुम्हाला शिरा आवडतो. तुमच्यासाठी शिरा आणला आहे."

"वा!"

"मिटक्या नका मारू. अजून वेळ आहे."

"हरकत नाही. आपली थांबायची तयारी आहे."

"चावटपणा नका करू" पण तिचं बोलणं कानावर आलंच नाही अशी बतावणी करीत मी विचारलं, "शिऱ्याचं प्रयोजन?"

"सत्यनारायण."

"मग प्रसादाला घरीच बोलवायचं—"

"इथं छळता तेवढं पुरं आहे. घरा-पर्यंत नको पोचायला" आणि ती हसली. बोलण्यातले गांभीर्य दवडण्याकरता खळे-खळेच हसली. एवढ्यात लंच-टाईम झाला. आजूबाजूचे सहकारी उठून गेले आणि सेक्शन रिकामा झाला तेव्हा तिने शिऱ्याचा डबा माझ्याकडे सरकवला. मी म्हटले, "बरोबर खाऊ."

"नको."

"मग मलाही नको."

"किती हट्टीपणा करता! खा ना—माझ्यासाठी खा. तुम्ही खा. मी पाहते."

शिरा झकासच जमला होता. आधीच गोड त्यात तिच्या हातची गोडी. वा! अगदी मोहनभोग. मी चवीने खात होतो आणि ती तृप्त होऊन पहात होती. समा-धानाने फुललेला तिचा चेहरा पाहून मी विचारलं, "एवढं काय झालं?"

"ते तुम्हाला नाही कळायचं."

शिऱ्याचा रिकामा डबा तिच्याकडे सरकवीत मी विचारलं,

"देवापाशी काय मागितलंस?"

"घरच्या सगळ्यांना सुखी ठेव म्हणून सांगितलं."

"म्हणजे मला वगळलंस" ती प्रश्नार्थक दृष्टीने माझ्याकडे पाहू लागली तेव्हा मी म्हटलं, "मी कुठं घरचा आहे!"

"मनचे तर अहा" आणि ती गोड हंसली. ती आज खुशीत दिसत होती. पुढचे बोलणे करायला हीच वेळ योग्य आहे हे लक्षात येऊन मी म्हटले, "सोम-वारचे लक्षात आहे ना!"

"सोमवारी काय आहे?"

"आठव बघू"

आठवल्यासारखं करीत ती म्हणाली, "बरं बाई तुमच्या सगळं लक्षात राहतं."

"मग येणार ना?"

"बघू."

"असं मोघम नको."

"आजच नक्की कसं सांगू?"

"कां?"

घुटमळल्यासारखं करीत ती म्हणाली, "वाढदिवसाच्या दिवशी मी त्यांना हवी असते. नाटक किंवा सिनेमाला घेऊन जातात."

"समजलो."

अनुक्रमणिका






"असं रागवू नका. आपण मंगळवारी जाऊ."

मी तिला काहीतरी खरमरीत उत्तर देणार होतो पण तेवढ्यात लंचला गेलेले सहकारी परतले. बोलणे थांबले आणि कामाला सुरुवात झाली. शिरा खायला घालून तिने माझे तोंड गोड केले होते. गोडीची चव तोंडात रेंगाळत होती तोच तिने मला दुखावले होते. हे नेहमीचेच होते. गोड गोड बोलून फुलवायचा आणि मग फुललेला पिसारा छाटून टाकायचा! असे हे विचित्र वागणे होते. ती अशी मुद्दाम वागत होती की नकळतपणे हे घडत होते! मुद्दाम म्हणावे तर तसे वाटत नव्हते. कधी मला काही दुखले-खुपले तर ती दुःखीकष्टी होत होती. विव्हल होऊन चार चार वेळा चौकशी करीत होती. बरे, नकळतपणे ती अशी मला तोडून टाकीत होती म्हणावे तर हे असे वारंवार कसे घडत होते! भावनांचा गोफ गुंफून तो ती कशाकरता तोडीत होती! झोका देऊन ती दोऱ्या कशाकरता कापीत होती! आणि मग पुन्हा हळुवारपणे फुंकर कशाकरता घालीत होती! सगळेच गोंधळात टाकणारे होते. अथवा, माझेच तर काही चुकत नव्हते! की तिच्या वागण्याचा सोईस्कर अर्थ लावून मी माझ्या अपेक्षा उगाचच उंचावीत होतो! तसेच असावे. माणसाच्या मनाची सुद्धा मोठी गंमत असते. हाताशी काही नसते त्यावेळी हाती येईल त्यावर सुख मानायला ते वेडे राजी असते. पण थोडेफार हाती आले की मूठभर हाती यावे असे वाटू लागते. मग ही धाव थांबत नाही. धावत राहते. आणि पाठोपाठ वेदना आणि दुःख धावत येते. माझ्या बाबतीत असेच तर होत नसावे! तसेच असावे. ती भेटत नव्हती त्यावेळी नुसत्या नजरभेटीवर मी खूश होतो. पुढे गाठीभेटी होऊ लागल्या तेव्हा ती पुनः पुन्हा भेटावी असे वाटू लागले. नंतर तिची माझ्या सेक्शनमध्ये बदली झाली आणि ती अगदी माझ्या शेजारी बसू लागली तेव्हा हे अंतरही मला खुपू लागले. हे अंतर काटण्यासाठी मी मनाने आणि शरीराने धडपडू लागलो. आणि असा अडखळू लागलो. जिकीरीला आलो. वारंवार गोंधळू लागलो. हे मला कळत होते आणि नव्हतेही. पण कळत असले किंवा नसले तरी त्याला आता माझा काय इलाज होता! टाकू नये त्या वाटेवर मी पाऊल टाकले होते. चुकूनमाकून पडले नव्हते. जाणूनबुजून टाकले होते. अर्धी-अधिक वाट मी चालूनही गेलो होतो. आता परत फिरण्यात अर्थ नव्हता. परत फिरणेही शक्य नव्हते. एखाद्या उपरतीच्या क्षणी मोठ्या जिद्दीने परत फिरलो असतो तरी तो शरीराने! गुरफटलेले मन मात्र चालतच राहिले असते. असे होते तर शरीराने तरी परतीच्या वाटेवर येण्यात काय अर्थ होता! नाऊमेद न होता शांतपणे चालत राहिले म्हणजे झाले.

वाढदिवसाच्या दुसऱ्या दिवशी ती ठरल्याप्रमाणे भेटली तेव्हा मी अगदी शांत होतो. आदल्या दिवशी ती भेटली नाही त्याबद्दल अवाक्षरानेही बोललो नाही. उगाच प्रश्न विचारले नाहीत की तिच्या न भेटण्याला अवास्तव महत्वही दिले नाही. पण त्यामुळे तिलाच चुकल्यासारखे झाले. आपणहून ती म्हणाली, "काल मी तुला भेटायला हवे होते."

"तुलाही जबाबदारी आहे. सगळे सांभाळून धोरणाने वागावे लागते. एवढे तरी भेटता येते हे काय थोडे झाले!" माझा हा सूर तिला अनोळखी असावा. माझ्या ह्या शांतपणाने तिच्या अहंकाराला डंख केला असावा. काकुळतीला येत ती म्हणाली, "नको रे असा रागवू."

"माझ्या रागालोभाची तुला एवढी पर्वा!"

"उत्तम..." शब्द अडखळले आणि तिने माझ्या हातावर आपला हात ठेवला. शब्द अपुरे पडले आणि अगदी सहजपणे तिने स्पर्शाचा आधार घेतला. हजारो शब्दांनी सांगता येणार नाही ते ह्या स्पर्शातून तिने मला सांगितले होते. आयुष्यात प्रथमच तिने मला माझ्या नावाने हाक मारली होती. ही हाक नव्हती. हा हुंकार होता. एकमेकाचे हात हातात गुंफून आम्ही कितीतरी वेळ तशीच बसून होतो. रडवेली होत ती म्हणाली, "हे कसलं आयुष्य माझ्या नशिबी आलं! तिकडे त्याच्याशी मी एकनिष्ठ नाही आणि इकडे तुला धडपणे सुखही देऊ शकत नाही. त्याच्याशी तशी प्रतारणा आणि तुझ्याशी ही अशी! संसार करते त्याचा पण मनात असतोस तू. आणि तू भेटलास की मन विचार करतं त्याचा" बोलता बोलता तिने माझ्या हातावरची आपली पकड घट्ट केली आणि



अनुक्रमणिका

विचारले, "मी वेडी आहे का रे!"

तिच्या ह्या भावनेच्या उद्रेकाला माझ्यापाशी उत्तर नव्हते. स्वार्थ साधण्यासाठी तिला दुखावण्यात अर्थ नव्हता. डावपेचाने वागून ह्या भोळ्या जीवाला टांगणीला लावण्यात हंशील नव्हते. तिच्या हातावर हळुवारपणे थोपटल्यासारखं करीत मी तिला शांत केले. विषय बदलीत म्हटले, "दुर्गा तुला वाढदिवसाचं काय हवं!"

"तुझ्यामाझ्यात ह्या उपचारांची खरोखरच आवश्यकता आहे का रे!"

अडखळत मी विचारले, "गंगाघरने तुला काय दिले?"

"साडी दिली."

"त्यांने दिली आणि ती तू घेतलीस. आनंदाने घेतलीस. कदाचित् ती तू त्याला नेसूनही दाखवली असशील. मी मात्र काही देऊ केले तर उपचारांची भाषा करतेस."

"गेल्या खेपेला तूही साडी दिली होतीस."

"पण त्याचे रामायण झाले."

"ते माझ्या वेंधळेपणामुळे."

"म्हणूनच काय हवे म्हणून विचारतो आहे."

"तू हवास. जन्मजन्मांतरी तू हवास."

"पण मनाने——"

मने संवादी झालेली असताना माझे हे बोलणे तिला विसंवादी वाटले. माझ्या हातातला आपला हात काढून घेत ती म्हणाली,

"ह्या जन्मी तरी——"

"पुढच्या जन्माचे कुणी पाहिले आहे!"

"असा निराश कां होतोस?"

ह्या बोलण्याला अर्थ नव्हता. बोलायला आणि मनाचे फसवे समाधान करून घ्यायला ह्या गोष्टी ठीक होत्या. नाराज होत मी म्हटले, "ह्या सगळ्याचा मला आता कंटाळा येऊ लागला आहे."

"मलाही–" ती काय बोलत होती ते तिचे तिलाच कळत नसावे. उगाच भावनेच्या भरात ती काहीतरी बोलत होती. तिला कंटाळा यायला काय झाले होते! दोन्ही वेळेला चापून जेवणाऱ्या माणसाने मी भुकेला आहे म्हणून सांगण्यासारखेच हे होते. चिडीला येत मी विचारले, "तुला कंटाळा यायला काय झालं?"

"ते सांगून तुला केव्हाच कळणार नाही. सांगितले तरी तुला पटणारही नाही. नसता आला कंटाळा; नसता आला–मी निर्लज्ज असते तर—"

आमच्या भेटीची परिणती ही अशी होत होती. ओढीने आम्ही एके ठिकाणी येत होतो आणि अशी भांडून दूर होत होतो. प्रेम होते म्हणून एके ठिकाणी येत होतो. प्रेम होते म्हणून भांडत होतो. आणि प्रेम होते म्हणूनच पुन्हा एकेठिकाणी यायला घडपडत होतो. एकेठिकाणी येतही होतो. आणि मग जपून वागत होतो. जपून बोलत होतो. एकमेकांच्या भावनांची कदर करीत होतो. पण हे वागणे खोटे होते. वरवरचे होते. कालांतराने वागण्यातली ही झिलई झिजत होती. वर्ख उडत होता. गिलीट काळवंडत होते. एकदा बोलता बोलता ती म्हणाली, "ह्या पुढे आपल्याला जपून वागायला हवं."

"जपूनच वागतो आपण."

"अरे मी काय सांगते ते आधी ऐकून तर घे" ती काय सांगते ते ऐकण्याकरता मी तिच्याकडे प्रश्नार्थक दृष्टीने पाहू लागलो तेव्हा ती म्हणाली, "आपल्याविषयी ऑफीसात लोक कुजबुजतात–"

"एवढंच ना!"

"एवढंच नाही" थांबल्यासारखं करीत ती म्हणाली, "ह्यानाही कुणकुण लागलेली दिसते. तसं स्पष्ट बोलले नाहीत पण अस्वस्थ वाटले. तुझ्याविषयी विचारीत होते."

"मग तू काय सांगितलंस?"

"उडवाउडवी केली."

"कशाकरता?"

"वा रे!" एकदम उसळत तिने विचारले, "मग मी काय करायला हवं होतं? तुझे माझे हे असे संबंध आहेत हे त्याना सांगायला हवं होतं? माझ्या जागी तू असतास तर तू काय केलं असतंस?"

तिच्या ह्या प्रश्नाला माझ्यापाशी उत्तर होते. पण ते तिला रुचणारे नव्हते. कारण तिला तोही हवा होता आणि मीही हवा होतो. पण हे स्पष्ट बोलण्यात अर्थ नव्हता. त्यामुळे तिच्या प्रश्नाला माझ्यापाशी उत्तर नाही असे भासवीत मी पड खाल्ली आणि म्हटले, "माझ्यामुळे तुला त्रास व्हावा अशी माझी इच्छा नाही."

"रागावलास?" तिच्या प्रश्नाचे उत्तर न देता मी गप्प राहिलो. माझी समजूत घातल्याप्रमाणे ती म्हणाली, "थोडे दिवस जपून काढू. एकमेकाची ओळख नसल्यासारखे वागू."

"कसं शक्य आहे?"

"कां नाही?" तिच्या ह्या प्रश्नाला मात्र माझ्यापाशी उत्तर नव्हते. हा भावनेचा प्रश्न होता. इथे तिला काही पटवून देण्यासारखे नव्हते. गोष्टी अशा थराला आलेल्या असताना तिने फक्त स्वतःपुरता विचार करावा आणि स्वतःला सोईस्कर असा निर्णय घ्यावा ह्याचे मला आश्चर्य वाटले. मनातून मी खट्टू झालो. तिच्या ते लक्षात आले असावे. ती म्हणाली, "सुरवातीला काही दिवस त्रास होईल. पण मग आपोआप संवय होईल. तेवढ्याच करता काही दिवस मी रजेवर जाणार आहे. आपोआपच तुझ्या दृष्टीआड होईन."

"नको नको–"

"आता दुसरा इलाज नाही. त्यानी रजा घेतली आहे. त्यांच्यावरोबर गांवी जाण्याशिवाय आता दुसरे गत्यंतर नाही".

"किती दिवसाकरता जाणार?"

"थोडे दिवस. हा सोमवार जाऊन त्याच्या पुढच्या सोमवारी मी ऑफीसमध्ये ठेवलेली आहे."

"पत्र लिहशील?"

"वेडा का तू!"

तिच्यासाठी मी वेडा झालो होतो यात काही संशय नव्हता. हे वेड मर्यादेत रहावे आणि त्याचा बभ्रा होऊ नये म्हणून मुद्दामच ती दृष्टीआड झाली होती. पण त्याचा नेमका उलटा परिणाम होत होता. पावलोपावली तिची आठवण येत

होती. ती रजेवर गेल्या दिवसापासूनच तिच्या परत येण्याकडे मी डोळे लावून बसलो होतो. तिच्याशिवाय राहणे किती अवघड आहे हे घडी घडी लक्षात येत होते. एकेक दिवस कसातरी रेटीत होतो आणि सोमवारला आता किती दिवस राहिले त्याचा पुन:पुन्हा हिशोब करीत होतो. पण हा हिशोब चुकला. कबूल केलेला सोमवार उलटून गेला तरी ती आली नाही. मनात शंकाकुशंकांची गर्दी होत होती आणि मी अस्वस्थ होत होतो. एकीकडे तिचा मला राग येत होता आणि दुसरीकडे तिच्या दृष्टीसुखासाठी मी अधीरा होत होतो. वाट पहात होतो आणि निराश होत होतो. आजही असाच निराश होऊन कामाला सुरुवात केली होती. आणि काही ध्यानीमनी नसताना रेगेने येऊन ही धक्का देणारी बातमी सांगितली होती.....

गंगाधरची आणि माझी तशी साधी ओळखदेखील नव्हती. ओळख असलेली बरी असे दुर्गाने एकदोन वेळा म्हटले होते. पण तिच्या बोलण्याकडे मी लक्ष दिले नव्हते. मुद्दामच ओळख करून घेण्याचे टाळले होते. असे असले तरी मी त्याला ओळखीत होतो आणि तो मला ओळखीत होता. तिच्या तोंडून मी त्याच्याविषयी ऐकले होते आणि माझ्याविषयी लोकानी त्याला सांगितले होते. माझी ओळख पटल्यावर तो अस्वस्थ झाला होता. आणि माझ्याविषयी त्याने तिला विचारले होते. यात वावगे असे काही नव्हते. त्याने केले तेच बरोबर होते. बायकोच्या मित्राविषयी नवऱ्याने तिला विचारावयाचे नाही तर मग दुसऱ्या कुणी? त्याच्या जागी मी असतो तर मीही असाच वागलो असतो. किंवहुना त्रागा करून एकमेकांचे भेटणे बंद करून टाकले असते. तसा तर तो निश्चित वागला नव्हता. किंवहुना थोडाफार सौम्यच वागला होता. त्यामुळे त्याच्याविषयी माझ्या मनात राग नव्हता की आकस नव्हता. तिचा नवरा होऊन तो माझ्या सुखाआड आलेला असला तरी

(दीपा २३)

त्यात त्याचा काही दोष नव्हता. खरे तर मीच मधल्यामधे उपटलो होतो. त्याच्या काळजीचे कारण झालो होतो. त्याचे काही बरेवाईट व्हावे आणि माझा मार्ग मोकळा व्हावा असे चुकूनही माझ्या मनात कधी आले नव्हते. त्यामुळेच त्याच्या मृत्यूची वार्ता ऐकून मी गडबडलो होतो. गोंधळलो होतो. मटकन् खुर्चीवर बसलो होतो.

...आता सगळे संपले होते. अगदी अनपेक्षितपणे संपले होते. गंगाधरचे आयुष्य संपले होते आणि खऱ्या अर्थाने माझ्या आयुष्याला सुरुवात झाली होती. पोहायला म्हणून तो गेला होता आणि भोवऱ्यात सापडला होता. जणु मला तारण्याकरताच तो स्वत: बुडाला होता. जसे त्याचे हे मरणाचे वय नव्हते तसे आयुष्याची नव्याने सुरुवात करण्याचे माझेही हे वय नव्हते. पण विधीलिखीतच तसे होते. त्याच्या संपण्यानेच माझ्या आयुष्याची सुरवात व्हावी असा संकेत होता. पण त्याच्या ह्या अचानक शेवटाला मी मुळीच जबाबदार नव्हतो. सहकाऱ्यानी माझ्याकडे बोट दाखवले किंवा लोक कुजबुजले तरी त्यात अर्थ नव्हता. त्याच्या मृत्यूला त्याचा तो जबाबदार होता. वाईट एवढेच होते की त्याच्या शेवटामुळे माझ्या सुखाचा आरंभ होणार होता, हे मनाला डांचत होते. विनाकारण चोरट्याचारखे वाटत होते. केवळ त्यामुळेच तिला तोंड कसे दाखवावे हे मला कळत नव्हते. ती भेटल्यावर काय बोलावे ते समजत नव्हते.

ती मुंबईला माहेरी परत आल्याचे कळले तेव्हा दोघा चौघा सहकाऱ्यांबरोबर मीही तिच्या घरी गेलो. हे जाणे औपचारिक होते. असे इतरांबरोबर जाऊ नये असे वाटत होते. पण गेलो. केव्हा तरी धीर करून जायलाच हवे होते. तिच्याशी विशेष बोलणे-चालणे झाले नाही. तरी ती दृष्टीस पडेल असे मला वाटत होते. पण ती बाहेरच आली नाही. तिच्या आईपाशी आमच्या भावना व्यक्त करून आम्ही जायला उठलो. आतल्या खोलीतून हुंदक्यांचा आवाज कानावर आला आणि मी गडबडलो. क्षणभर पाय रेंगाळला. पण अशा स्थितीत मी तरी काय करू शकत होतो? जड पावलाने मी इतरांबरोबर खोलीबाहेर पडलो. तिची माझी भेट झाली असती तर तिचा दु:खभार मी थोडा तरी हलका करू शकलो असतो. पण प्राप्त परिस्थितीत ती वागली तेच बरोबर होते.

मध्ये काही दिवस मी जाऊ दिले आणि पुन्हा तिच्या भेटीला गेलो. माझे नक्ष

ऐकून तिच्या आईने माझ्याकडे रोखून पाहिले आणि लगबगीने ती आत गेली ते माझ्या दृष्टीतून सुटले नाही. पण मी तिकडे लक्ष दिले नाही. अशा बाबतीत आता फार हळवे राहून चालण्यासारखे नव्हते. तिची वाट पहात बैठकीच्या खोलीत बसून राहिलो. दुःखातून ती आता थोडी-फार तरी बाहेर पडली असेल अशी माझी कल्पना होती. तिला असं भेटायला येण्यात माझी काही चूक तर होत नव्हती? मी फार उतावळेपणा तर करीत नव्हतो? विचार करता करता भिंतीवरच्या हार घातलेल्या फोटोकडे माझे लक्ष गेले. तो फोटो गंगाधरचा होता ह्यात काही संशय नव्हता. सहजपणे मी उठलो आणि फोटोसमोर जाऊन उभा राहिलो. आणि अगदी अचानकपणे दबल्या आवाजातला हुंदका कानावर आला. मी चमकून मागे वळलो. गंगाधरच्या फोटोकडे ती टक लावून पहात होती. आणि केविलवाणा होऊन मी तिच्याकडे पहात होतो. विश्वास बसणार नाही इतकी ती वाळली होती. पांढरी फटफटीत पडली होती. तिच्या ह्या दशेकडे पाहून मलाच हुंदका येईल असे वाटले. शब्दांचा शोध घेत मी काही बोलणार तोच ती म्हणाली, "असं कसं झालं रे?"

"दुर्गा, असं काय वरं वेड्यासारखं!" आणि तिचं सांत्वन करताना मला एक-दम भरून आले. मूक होऊन तशीच किती तरी वेळ आम्ही बसून राहिलो. ती फार खचून गेली होती. वेळीच तिला सावरली नाही तर ह्याचा शेवट फार भयंकर होईल हे माझ्या लक्षात आले. कसेही करून ह्या दुःखाचा तिला विसर पडेल असे करणे भाग होते. आणि ते तावडतोब करणे फार आवश्यक होते. ती माझी होती आणि हर प्रयत्नाने तिला वाचवणे हे माझे काम होते. तिची समजूत घालीत मी म्हटले, "दुर्गा, झाली गोष्ट होऊन गेली."

"पावलोपावली त्यांची आठवण येते."

"साहजिक आहे. पण आपल्याकडून प्रयत्न करायला हवा—"

"करते रे. पण जमत नाही."

"जमेल. पण त्यासाठी—" क्षणभर घुटमळल्यासारखं करीत मी म्हटलं, "त्यासाठी तू घराबाहेर पडलं पाहिजेस. चारचौघांत मिसळलं पाहिजेस. आता पुढच्या खेपेला मी येईन तेव्हा आपण बाहेर जाऊ" माझ्या ह्या बोलण्या-वरची तिची प्रतिक्रिया जाणून घेण्यास मी अधीरा झालो होतो. पण एवढ्यात तिला भेटायला म्हणून कुणीतरी आले. नेमके नको त्या वेळी कुणीतरी येऊन ठेपले आणि आमचे बोलणे आपोआपच खुंटले. आता तिऱ्हाईताच्या देखत तिथे बसून राहण्यात अर्थ नव्हता. निरोप घेऊन मी उठलो तेव्हा ती दारापर्यंत आली. हेही काही कमी नव्हते. दारात घुटमळत मी तिच्याकडे पाहू लागलो तेव्हा तिने विचारले, "आता केव्हा येशील–?"

"केव्हा येऊ?"

"ते मी काय सांगू?" ती सामोरी आली होती. आणि क्षणात पाठमोरी झाली होती. हा तिचा नेहमीचा स्वभाव होता. किंबहुना तिच्या स्वभावाचे हे वैशिष्ट्यच होते. पण तिच्या ह्या वाग-ण्याने माझ्या मनाला किती यातना होतात ह्याची तिला कल्पना नसावी. गंगाधर होता त्यावेळी ती हे असं वागत होती ते ठीक होतं. ते मी समजू शकत होतो. त्यावेळी तिला मला तोडूनही टाकायचे नव्हते आणि फार जवळही येऊ द्यायचे नव्हते. पण आता गंगाधर गेल्यावरही तिने त्याच वागण्याचा अवलंब करावा हे विचित्र होते. तिचे माझे नाते आता ठरल्यासारखेच होते आणि तरीही तिने माझ्याशी असे वागावे हे विचित्र होते. स्पष्टपणे बोलावे असे मनात आले, पण कठीण बोलून तिचे मन दुखावण्याची ही वेळ नव्हती. त्यामुळे मी निलाजरे हसलो आणि तिचा निरोप घेतला. पण आता हे भेटीला जाणे आणि निरोप घेणे शक्य तितक्या लौकर बंद करून टाकायला हवे होते. तिच्या कलाने घेत राहिलो तर गोष्टी उगाच रेंगाळत राहतील आणि कालापव्यय होईल हे माझ्या लक्षात आले. तिच्या माझ्या भावी सुखाच्या दृष्टीने अधीरेपणाचा दोष पत्करूनही लौकरात लौकर तिच्याशी खुलासेवार बोलून सगळे नक्की करावयास हवे होते.

बोलल्याप्रमाणे मी तिच्या घरी गेलो तेव्हा दरवाजा उघडायला तीच पुढे आली. भेटीची सुरुवात तर छान झाली असे माझ्या मनात येते न येते तोच ती म्हणाली, "तू होय!"

"एवढं आश्चर्य वाटायला काय झालं?"

"काही नाही. काही नाही. पण—"

"पण काय?"

"परवाच तू येऊन गेलास—" तोंडात चपराक बसल्याप्रमाणे मी एकदम मागे झालो. तिच्या ते लक्षात आलं असावं. आणि मग झालेली चूक सुधारण्याकरता आवाजात खोटा खोटा मोकळेपणा आणीत ती म्हणाली, "अरे आत तर येशील. ये ना—"

केवढ्या अपेक्षा बाळगून मी आज तिच्याकडे आलो होतो. काय काय मनाशी ठरवलं होतं. तिला कशी खुलवायची आणि विषय कसा काढायचा ते सगळे नक्की केले होते. पण आल्याआल्याच तिने मला नाऊमेद केले होते. त्रयस्थाशी वागावं तशी ती माझ्याशी वागली होती. प्रियकराने प्रेयसीकडे किंवा प्रेयसीने प्रिय-कराकडे जाताना कोण किती वेळा कुणा-कडे आलं गेलं ह्याचा कुणी हिशोब ठेवतं! तिला हे सांगावं असं मनात आलं. पण मी गप्प राहिलो. मोकळेपणाने बोला-यला म्हणून मी आलो होतो आणि सला-मीलाच तिने मला फटकारले होते. काय बोलावे ते लक्षात येईना. तरीही धीर करून मी म्हटले, "मी तुला आज बाहेर घेऊन जायला आलो आहे. तयार होऊन ये."

"नको."

"का?" पण माझ्या प्रश्नाचे उत्तर न देता ती म्हणाली, "आपण इथंच

अनुक्रमणिका






बोलत बसू "

"माझी हरकत नाही. पण तू बाहेर आलीस की तुला मोकळं वाटेल. आपो-आप हंसती खेळती होशील."

"आता कुणासाठी मी हंसती खेळती होऊ?" तिचा प्रश्न ऐकून मी दचकलो. दु:खाने तिच्या मनावर काही परिणाम तर झाला नव्हता ! की औपचारिकपणे ती हे असे बोलत होती! पण हा औप-चारीकपणा माझ्यापाशी सांभाळायची काय गरज होती ! थोडाफार चिडीला आल्यासारखं दाखवीत मी म्हटलं, "दुर्गा, तुझं अजून आयुष्यात सगळं व्हायचं आहे."

"माझं आता काय राहिलं आहे?" प्रतिप्रश्न आला तेव्हा माझा शांतपणा ढळला. तिच्याकडे रोखून पहात मी म्हटलं, "तुझं राहिलं नसेल. पण माझं राहिलं आहे. असं वागून आणि बोलून मला दु:ख कशाकरता देतेस ?"

"उत्तम–" बोलता बोलता ती उभी राहिली आणि येरझारा घालीत म्हणाली, "माझं नशीवच असं आहे–माझ्या आयु-ष्यात येणाऱ्या प्रत्येकाला मी दु:खच देते रे! हा शाप आहे. उत्तम, हा मला शाप आहे ! !"

"दुर्गा, हे काय वेड्यासारखं बोलतेस?"

येरझारा घालता घालता ती अचा-नक माझ्या पुढ्यात थांबली. माझ्याकडे पहात तिने विचारलं, "खरंच काय रे मी वेडी आहे ?"

"दुर्गा––"

पुन्हा तिच्या येरझारा चालू झाल्या. तिला कशी आवरावी ते माझ्या लक्षात येईना. उठून उभे राहावे आणि तिला हाताला धरून खुर्चीत आणून बसवावे असा मनात विचार आला आणि मी पुढे झालो. पण तिने माझा हात झटकून टाकला–झटका बसल्याप्रमाणे ती म्हणाली, "मला स्पर्श करू नको. मी त्यांची आहे"

"त्याची होतीस––"

"नाही नाही. त्यांची नव्हते. तुझी होते. त्याच्या नावाने गळयात मंगळसूत्र बांधीत होते. पण मनाने तुझी होते. अष्टौप्रहर तुझा विचार करीत होते. फार मोठा विश्वासघात केला आहे मी त्यांचा. फार मोठा. ह्या विश्वासघाताचं मला प्रायश्चित्त घेऊ दे."

"मला दु:खी करून ?"

"उत्तम तुला आठवतं ?"

"काय ?"

काहीतरी महत्वाचे सांगायचे तिच्या मनात आले होते. पण तिने स्वत:ला आवरलं आणि म्हटले, "मला माफ कर. सगळं विसरून जा उत्तम."

ह्या मानभावीपणाने माझा एकदम तोल गेला. चिडीला येत मी विचारलं, "असं तोडून टाकायचं होतं तर नादी तरी कशाला लावलंस ?"

चवताळल्यासारखं करीत ती म्हणाली, "उगाच भलते शब्द वापरून तुझ्यावरच्या माझ्या प्रेमाचा असा अपमान नको करू. तुझ्यावर मी फार प्रेम केलं. करू नये तेवढं केलं. करू नये तेव्हा केलं. आता त्यांच्यावर मला प्रेम करू दे. त्यांच्या स्मृतीशी तरी मला एकनिष्ठपणे जगू दे." आणि माझ्याकडे पाठ फिरवून ती गंगा-धरच्या फोटोसमोर जाऊन उभी राहिली.

उठून उभे रहावे आणि चालू लागावे असे मनात आले. पण पायातली शक्ती पार निघून गेली होती. तरीही मी धड-पडत उभा राहिलो आणि अडखळत चालू लागलो. सगळे आता संपले होते. माझे आयुष्य संपले होते आणि गंगाधर-बरोबरच्या तिच्या आयुष्याला आता सुरवात झाली होती. • • •

---

[ पृष्ठ ३५ वरून––डोळे मोडीत राधा चाले ]

लागलीच स्पष्ट होतो. तमाशा पाहणाऱ्याला तमाशातील बाई श्रोत्याच्या कानाशी येऊन कुजबुजते, हे दृश्य अपरिचित नाही. याने अनेक गोष्टी साधल्या जातात. ज्याच्या कानाशी ती बाई लागते, त्याच्याकडे सर्वांच्या नजरा वळतात, त्याला त्या लोकात भलताच मोठेपणा प्राप्त होतो, त्या मोठेपणाची त्याला मस्ती चढते, कानाशी लागलेल्या बाईशी जवळीक निर्माण होते आणि तिच्या डोकीतील फुलांचाच नव्हे तर तिच्या केसांचा व अंगाचाही वास मस्तकात भिनून तो एकाएकी पेटून उठतो. स्त्रीच्या केसांचा गंध कसा उन्मादक असतो हे मुद्दाम सांगितले पाहिजे असे नाही. परंतु गाण्याच्याच संदर्भात कचपरिमलाचा जो निर्देश आला आहे तो उद्बोधक वाटावा. राम-भद्र दीक्षित यांच्या 'शृंगारतिलका'त 'गाणे ऐकल्यावर तू काय केलेस?' या मित्राच्या प्रश्नाला एका पात्राने पुढील उत्तर दिले आहे:

श्रुत्वा श्रुत्वा श्रवणसुभगं गानमस्या मृगाक्ष्या :
दृष्ट्वा दृष्ट्वा स्तनतटमपि व्यक्तमिन्दो : प्रभाभि :
घ्रायं घ्रायं कचपरिमलं मन्दवातोपनीतं
मग्नं हर्षाम्बुधिषु मनसा वा मया वा किमन्यत्

त्या मृगलोचनेचे गोड गाणे ऐकत ऐकत, चंद्राच्या प्रकाशात उजळ-लेली तिच्या स्तनाची कोर अनिमिष नेत्रांनी पाहात पाहात, वाऱ्याच्या झुळकीसरसा येणारा तिच्या केसांचा वास घेत घेत मनाने आनंद सागरात पोहत असताना, मी दुसरे काय केले असणार ?

## 'राजतरंगिणी'मधील राजा व नर्तकी

'किम् अन्यत्' या प्रतिप्रश्नातच त्याने मित्राच्या प्रश्नाला पुरेपूर उत्तर देऊन ठेवले आहे. ज्ञानेश्वरांनी वर्णन केलेल्या तामस-

दानाचा शेवटही 'किम् अन्यत्?' त्यानी त्या शेवटाचे वर्णन केलेले नाही; पण कल्हणाने लिहिलेल्या 'राजतरंगिणी' या काश्मीरच्या इतिहासग्रंथांत त्याचे साग्रसंगीत वर्णन आलेले आहे. ते विस्तृत असले तरी, लावणीची प्रेरणा व तिचे स्वरूप यांवर प्रकाश पाडणारे असल्यामुळे, त्याचे संपूर्ण मराठी भाषांतर देतो:

राज्य निष्कंटक केल्यावर राजा चक्रवर्मा हळुहळू गर्विष्ठ व उन्मत्त होऊन दुष्ट व घातकी कृत्ये करू लागला. आपल्या पराक्रमाची स्तोत्रे चर्वितचर्वण करीत विट, खुषमस्करे व भाट यांच्या तंत्राने चालू लागला. त्यांच्या स्तुतीला मोहून तो स्वतःला दैवतच मानू लागला आणि अविवेकाने वागू लागला.

या सुमारास रंग नावाचा डोंब जातीचा एक प्रख्यात परदेशी गवयी त्या नगरात आला. तो हीन जातीचा असल्याने, राजाने त्याची भेट बाह्य मंडपात घेतली. प्रतीहारींनी मंत्री व सामंत यांना यथोचित जागी बसविले. राजाच्या समोर जागा मोकळी सोडली होती. ती सभा अनेक दीपांच्या प्रभेने व बसलेल्या दरबाऱ्यांच्या शिरोभूषणानी प्रकाशित होऊन फणामणींनी उज्ज्वल अशा शेषशय्येसारखी दिसत होती. धम्मिलांतील फुलांच्या गजऱ्यात खेळत राहिल्याने सुगंधित झालेला संध्याकाळचा मंद व शीतल वायु घ्राणेंद्रियांना तृप्त करीत होता. नृत्यगीत पाहाण्यासाठी बसलेल्या अंतःपुरातील हरिणाक्षी राजस्त्रियांची मधुरमद्यसेवनाने सुवासित झालेली मुखकमले गोल वातायनांच्या रांगांना उज्ज्वलित करीत होती.

अशा त्या सभेत डोंब गवयाने प्रवेश केला. याच्या मागून त्याचे साथीदार आले. ते हार, कंकण, केयूर, पारिहार्य इत्यादि अलंकारांनी शोभिवंत दिसत होते. त्याच्या बरोबर हंसी व नागलता या नावांच्या त्याच्या दोन ललितलोचना कन्या होत्या. त्यांना पाहण्याकरिता कौतुकाने माना उंचावलेली ती राजसभा चित्रार्पितसी भासली. त्यांची विलासयुक्त हालचाल व चंचल नेत्रांची जीवघेणी क्रीडा यांनी त्या सभेत जणु परत एकदा पुष्कळशी फुलेच उधळली गेली.

त्या राजाच्या गुणवर्णनाचे गीत सुरू झाले आणि सभेत 'जय', 'जीव' या उद्गारांचा कोलाहल उठला. खालच्या सुरात सुरू होऊन उचितप्रकारे वर चढत चढत पंचमात संचार करणारा एक राग साथीदारांनी उभा केल्यावर, एका तालात शिरे हलवीत, भुवया उडवीत व डोळे मोडीत आणि एका सुरात गात हंसी व नागलता यांनी त्या गीताचा विस्तार केला. राजाचे तांबूलचर्वण थांबले, तो पुतळ्या-सारखा निश्चल झाला आणि गानलुब्ध होऊन कुरंगाप्रमाणे एकटक त्यांच्याकडे पाहात राहिला. त्याची ती अवस्था पाहून त्यानी विलास-स्मित विभ्रमांनी अधिकच मोहक झालेले मधुर गायन सुरू केले. राजा व त्याच्याशी एकदिल झालेल्या त्या पोरी केवळ स्वसंवेद्य अशा दृग्व्यापाराने आपसात संलाप करू लागली.

राजाची ही भान हरपलेली स्थिती ओळखून त्याच्या मर्जीतल्या एका विटाने प्रसंगानुरूप प्रणयवृद्धी करीत म्हटले, "महाराज, या सुंदर पोरींच्या कंठांत या गीताला कापराच्या पेल्यात ओतलेल्या मैरेय मद्याची लज्जत आली आहे. सभागृहाच्या नितळ हस्तिदंती स्तंभांत प्रतिबिंबित झालेल्या यांच्या प्रतिमा पाहून असे वाटते की, जणू चंद्रच त्या स्तंभांचे चुंबन घेत आहे. हाताच्या तळव्यावर गाल ठेवून गात असता आपल्या नेत्रकटाक्षांनी जणू आकाशातील वैमानिक देवानाच त्या मोहिनी घालताहेत. आपण तिच्याविषयीच बोलतो आहोत, हे ताडूनच जणू, ती पहा कसा असूयागर्भ कटाक्ष फेकते आहे! मान खाली करून कानातील कुंडले हलवीत गाणारी तर जणू काय विपरीतरतीच्या उद्रेकाचा आरंभ केल्यासारखीच शोभते आहे. ज्या कोणाच्या विरहाने व्याकुळ होऊन मोठ्या उत्सुकतेने निर्जन स्थळी स्त्रिया अशा सुरात गात असतील, त्यांचेच तारुण्य सफल झाले म्हणायचे. धार्मिक आचाराने मोहित होऊन ज्यांनी तर्काला सोडचिठ्ठीच दिली आहे, तेच एकत्र प्रवासाला निघालेल्या काफिल्या-तील एकाचा त्याग करतात. श्रोत्रांनी यांचा ध्वनी व नेत्रांनी यांचे रूप यांना स्पर्श करण्यात पाप नसले, तर अंगाने यांच्या अन्य कमनीय अंगांना स्पर्श करण्यातच कां पाप असावे?

स्वभावतःच लंपट असलेल्या राजाचा अभिलाषांकुर विटाच्या या भाषणाने शिंपला गेला आणि त्याला शंभर फांद्या फुटल्या. विटांना स्वभावतःच वर्णसंकराची भलतीच आवड असते. परंतु या हौसेच्या आड येणाऱ्या नीतिनियमांचे जोपर्यंत त्यांना उल्लंघन करता येत नाही तोपर्यंत जागच्या जागीच हे उद्धटपणे वडवडत असतात. एकदा का राजदरबारात त्यांना मान्यता मिळाली की, ते भूपालांना भुरळ घालून त्यांना एकाएकी भलत्या मार्गाला लावतात आणि त्यांचा

अध:पात साधतात. आकाशात गर्जना करणारे ढग सिंहांना विपयावर नेऊन त्यांना कड्याखाली उडी घेण्यास उद्युत करीत नाहीत काय ? तसेच हे विट ! कुतर्काच्या साहाय्याने अयोग्य गोष्टही योग्य वाटायला लावून जडबुद्धीच्या लोकांना मोह घालायला समर्थ, असे विट या जुगात नसते, तर नरक ओस पडून तेथे पशु चरू लागते. राधेय कर्णाप्रमाणे असत्पात्री दान करणारा तो राजा त्या डोंबांना हार, केयूर, कुंडलांनी संतुष्ट करून अंतर्गृहात गेला.

## पट्टराणीपद मिळविणारी ती हंसी

पदाच्या सुरुवातीला 'हिचा प्रियकर म्हणजे अखिल पृथ्वीचाच वल्लभ' असा राजाचा गौरव, पदाच्या अखेरीला अतिचंडतांडवयुक्त असा स्वत:चा नामोल्लेख आणि मध्ये काहीवाही गीतरचना, अशा पदांना काव्य मानून कीर्तीच्या हव्यासाने जे राजे अशा शाहिरांना विपुल धन देतात, त्या मूर्ख राजांचा धिःकार असो. वेश्यांचा अनुराग, इंद्रधनुष्याचे वैभव व हळदीचा रंग यांचे सौंदर्य क्षणभंगुर असते; वाढते नसते. तोच प्रकार उपांगगीताच्या माधुर्याचा.

त्या श्वपाककन्यांना पाहून उत्पन्न झालेले राजाचे प्रेम, त्यांच्या सतत दर्शनाने वाढतच गेले. त्याला त्यांच्याशिवाय चैन पडेनासे झाले. तो शय्येवर पहुडला असता त्या शेजारीच गात वसत. हळुहळू त्यांनी त्याला आपले चुंबन दिले आणि नंतर रतिसुखाचीही गोडी लावली. त्यांच्या नवनवीन, निर्लज्ज व विशोभित समागमामुळे तो हतवीर्य झाला, एवढेच नव्हे तर त्याला त्याची शरमही वाटेनाशी झाली. रतीनंतर त्याला खूप घाम सुटू लागला आणि त्याच्या द्वारे त्याच्या शरीरातील भाग्योष्मा जाऊन त्याला जडता आली.

त्या प्रणयांध राजाने हंसीला महाराणी केली. राजवधूंमध्ये तिच्यावर चवऱ्या ढळू लागल्या. ज्यांनी तिचे उच्छिष्ट खाल्ले, ते चक्रवर्म्याचे व त्याच्यामागून झालेल्या राजांचेही दरवारी वनले. डोंवाची चतुरपणे खुशामत करणारे मंत्री अभ्युदय पावू लागले आणि त्याना अक्षपटलादिकात अधिकारपदे मिळत गेली. मूर्खपणामुळे काही श्वपाक स्वत: मंत्री झाले नाहीत, तरी त्यांच्यातील व्यवहारचतुर होते, ते मंत्र्यांप्रमाणे राजकार्ये करू लागले. चोर मंत्री, श्वपाकी महाराणी आणि श्वपच राजमित्र अशा त्या चक्रवर्मा राजाला लोकोत्तर असे आणखी काय करायचे वाकी उरले होते ?

ती श्वपाकी राणी ऋतुस्नानानंतर आपली विटाळाने डागाळलेली वस्त्रे इनाम देई आणि ती पांघरून मंत्रिमंडळी मोठ्या डौलाने राजसभेत प्रवेश करीत. ज्या थोड्यांनी त्या वेळी राजाचे वैर पतकरूनही तिचे उष्टे खाल्ले नाही, ते सोमपान करणाऱ्या ऋत्विजांच्या योग्यतेचेच म्हणावयाचे !

त्या वेळी त्या काश्मीरमंडळात प्रखर दैवतांचा वासच नसावा, नाहीतर त्यांच्या मंदिरात श्वपाकीचा प्रवेश कसा होता ! तिलद्वादशीला हंसा राणी रणस्वामीच्या (शंकराच्या) दर्शनाला गेली. तेव्हा तिच्याबरोबर सामंतांपैकी स्वाभिमानी डामर मात्र गेले नाहीत.

राजकुलातील ओढ्यामुळे उन्मत्त झालेल्या डोंब लोकांचे हुकूम राजाज्ञेप्रमाणे अनुलंघ्य मानून तत्परतेने पाळले जात. राजाने रंग डोंवाला हेलू नावाचा गाव अग्रहार म्हणून इनाम दिला. (अग्रहार हा ब्राह्मणालाच दिला जाई म्हणून) त्याचे दानपत्र पट्टोपाध्याय लिहिना. तेव्हा अक्षपटलात पोचून रागारागाने आपल्या ग्राम्य भाषेत ताणीत रंग म्हणाला, "रांडलेका, रंगाला हेलू दिला, असे लिहून कां देत नाहीस?" तेव्हा रंगाच्या भ्रूभंगाला—दरडावण्याला—भिऊन त्याने ते कसेबसे लिहून दिले. स्वत: राजाच दुर्वृत्त झाल्यावर कोणचा म्हणून अनन्वित प्रकार घडल्यावांचून राहील!

## आणि राजाचा झालेला भीषण अंत

त्या पातकी राजाने विटांना अस्पृश्य स्त्रीशी गमन केल्याबद्दलचे प्रायश्चित्त विचारले, तेव्हा त्यांनी राजाकडून काही हास्यास्पद प्रायश्चित्ते करविली. हिमाने बधिर झालेल्या भागावर हिम चोळले असता त्याची बधिरता जाते, त्याप्रमाणे पापानेच पापाचा परिहार होतो, असा त्या पामराला त्यांनी सल्ला दिला. पवित्र स्त्रीशी गमन करून अस्पृश्यगमनाच्या पापाचे क्षालन करावे, या विचाराने महिनाभर व्रतस्थ व उपोषित राहिलेल्या विप्रपत्नीवर त्याने बलात्कार केला. तथापि त्याच्याकडून अग्रहार मिळविणारे आणि त्याच्याकडे भोजनास जाणारे पापी द्विजही त्यावेळी होते.

त्या पापी राजानेही पाशुपत तापसांना राहाण्यासाठी एका चक्रमठाचे काम चालू करविले. ते पुढे त्याच्या वधानंतर त्याच्या एका राणीने पुरे केले.

पुढे त्या श्वपाकीवल्लभाने आपल्यावर विश्वसून राहिलेल्या काही निरपराध डामरांना, त्यांनी पूर्वी केलेले साहाय्य विसरून, कपटाने मारविले. त्यावरून त्याच्या विश्वासातील काही दस्यू डामरांनीच त्याला मारण्याचा कट केला आणि त्यासाठी ते योग्य संधीची वाट पाहात राहिले. एका रात्री त्या श्वपाकीच्या शयनमंदिराच्या जवळच्या शौचालयात तो शौचाला बसला असतानाच, त्यांनी त्याच्यावर एकाएकी चोहीकडून अनेक तीक्ष्ण शस्त्रांचे घाव घातले. तळघाच्या काठावर शांतपणे झोपलेल्या एकाएकी तळयात पडावा, तसा झोपेने जड डोळे झालेला तो पुरा जागा झाला आणि भयानक ओरडला. अंगातून रक्ताच्या चिळकांड्या उडताहेत, मागे मारेकरी लागले आहेत, असा तो शस्त्राच्या शोधात वेगाने धावतच त्या शयनमंदिरात शिरला. त्याला शस्त्र सापडेना. ती चांडाली त्याला आलिंगन देऊन रडू आरडू लागली. तिच्या उन्नत कुचप्रांताला व पुष्ट जघनांना तो बिलगलेला असतानाच त्यांनी त्याला ठार केले. तो मरत पडला असतानाच त्याच्या राण्या तेथे पोचल्या आणि त्यांनी प्रोत्साहन दिल्यावरून त्या मारेकऱ्यांनी त्याचे गुडघे दगडानी ठेचून टाकले. याप्रमाणे शक ४८१३–इ. स. ९३७– या वर्षी ज्येष्ठ शुद्ध अष्टमीच्या रात्री तो श्वपाकींनी उपभोग घेतलेला राजा पायखान्यात चोरांकडून कुत्र्यांसारखा मारला गेला. (कल्हण 'राजतरंगिणी' ५.३५१–४१३)

(हे भाषांतर शब्दशः करण्यात आलेले नाही. उदाहरणार्थ: ३७८ व्या श्लोकात विट व मेघ यांचे वर्णन श्लिष्ट शब्दांनी केलेले आहे. भाषांतर बोजड होऊ नये या हेतूने भाषांतरात त्यातील श्लेष गाळलेला आहे. ३७० व ३८१ या श्लोकांचे R. S. Pandit व हवालदार यानी केलेले भाषांतर चुकीचे आहे. वरील भाषांतराशी तुलना केली असता त्यातील चुका स्पष्ट होतील.)

राजतरंगिणीतील हा उतारा वाचला की ज्ञानेश्वरीच्या ३ ऱ्या अध्यायातील कामक्रोधाचे पुढील वर्णन आठवते:

> सांध्वी शांति नागविली । माया मांगि श्रिंघारिली ।
> तिये करवि विटाळविली । इहीं साधुवृंदें ।।२४६।।
> इहीं संतोखवन खांडिलें । वैयंदुर्गं पाडिले ।
> आनंदरोप सांडिले । उपडूनियां ।।२४८।।





चक्रवर्म्याचा इतिहास १० व्या शतकातील, राजतरंगिणीचे लेखन १२ व्या शतकातील आणि ज्ञानेश्वरीची रचना १३ व्या शतकातील. ज्ञानेश्वरांनी याच इतिहासाला अनुलक्षून या ओव्या रचलेल्या नसतील ना ?

ज्ञानेश्वरांनी तामसदानाच्या संदर्भात लावणीसदृश गीतगायनाचे वर्णन केलेले असले, तरी त्या गीताचे नाव दिलेले नाही. कल्हणाने इतिहासाच्या संदर्भात तशाच स्वरूपाच्या गीतगायनाचे जास्त विस्ताराने वर्णन केलेले असले, तरी त्यानेही या गीतप्रकाराचे नाव सांगितलेले नाही. मात्र त्याने दिलेले दोन तपशील आपल्या दृष्टीने महत्त्वाचे आहेत. पहिला तपशील म्हणजे ३८१ व्या श्लोकात या पदांचे सांगितलेले काही विशेष. या पदात सुरुवातीला राजाच्या विलासाचा गौरव केलेला होता, अखेरीस डोंबाचा म्हणजे पदकर्त्याचा दर्पयुक्त नामोल्लेख होता आणि मध्ये काहीबाही गीतरचना होती. पेशवाईतील होनाजी बाळा, प्रभाकर–रामजोशी इत्यादिकांच्या लावण्या या बाबतीत वरील विशेषांशी तंतोतंत जुळतात. या शाहिरांनी बाजीरावाला उद्देशून ज्या लावण्या रचलेल्या आहेत त्यांची सुरुवात.

> जसा आकाशिं चंद्र तसा राजेंद्र पाहिला दिठीं
> सखे असे वाटते सखा कवळून मारावि मिठी

**–होनाजी**

> डुला खुला मधीं वसा झुल्यावर अहो सहस्रफणी
> सभोंवती आम्ही चपळ नागिणी

**–प्रभाकर**

> भीमककुमारी घेउन गेला द्वापारिं यदुपती
> कलिमधें हा कोण तरी संप्रती

**–प्रभाकर**

अशी बाजीरावाच्या विलासाचा गौरव करणारी आहे. बहुतेक लावण्यांच्या अखेरीस

कविराय चमकला हीर लोकजाहीर इतर शाहीर चमकती वांग

**–रामजोशी**

> प्रभाकराचें कवन सुलाखुन सरस्वतीने पाठविलें

**–प्रभाकर**

> अनंतफंदिचे छंद जसे कटिबंध जडन नवि झनानी
> लांगेलुंगे कवि ना ठरती जशा भोरड्या भनानी
> किंवा
> फंदी अनंताची कविता । सवाई सोटा रे सोटा

**–अनंतफंदी**

अशी शाहिरांची दर्पोक्ती आहे. "अशी सुरुवात व असा शेवट आणि मध्ये काहीबाही गीतरचना ! अशा पदांना उत्तम काव्य मानून जे महामूर्ख राजे कीर्तीच्या लोभाने या शाहिरांना मोठमोठी इनामे देतात, त्यांचा धिःकार असो," असे कल्हण म्हणतो. लावण्यांना उत्कृष्ट काव्य मानणाऱ्याने हे विचारात घेण्याजोगे आहे.

## महारमांगांनी जोपासलेली संस्था

कल्हणाच्या वर्णनातील दुसरा महत्त्वाचा तपशील म्हणजे, हे तमासगीर डोंब जातीचे होते, हा होय. फार पूर्वीपासून आजतागायत तमाशा ही संस्था महारमांगांनीच जोपासली आहे. मुक्तेश्वराच्या हरिश्चंद्राख्यानात हरिश्चंद्राचे सत्त्वहरण करण्याकरिता विश्वामित्र त्याच्याकडे नर्तकी पाठवितो त्याही मातंगकन्याच.

विश्वामित्रें मातंगकामिनी । गुणी, सुरूप, नाचणी । रायासमीप दोघी जणी देउळांगणीं प्रेरिल्या ।। ऋषि आज्ञेनें कामसरिता । लावण्यलतिका, गुणैकभरिता, । सालंकार, शोभिता । नृपनाथासन्मुख ।। येउनी नृत्यगायन करिती । आविर्भावें ताळ तोडिती । नयनेबाणें विंधिती । चित्तकुरंग रायाचा ।। त्यांचिया गायनाची विचित्र कळा । निर्झर पाझरती शिळा । पवन पांगुळे, गंगाकूळा । पूर तुंबोनी दाटती ।। सभे श्रवणा बैसले सादरें । नानाश्वापदजाती अपारें । वैर त्यागुनी परस्परें । मधुरस्वरें मोहिलीं ।। ऐसें देखोनि धरारमण । म्हणे, 'धन्य, धन्य चतुरानन । जेणें संगीतनिकेतन । कामिनीरूपें निर्मिलें'।। त्रिशंकुरायाचा नंदन । संगीतशास्त्रीं अतिप्रवीण । श्रवणें झाला सुप्रसन्न । करीचें कंकण काढिलें ।। अनेक रत्नें धरामौळीं । हाटककंकणा जडियेलीं । नाचणी पाचारुनी जवळीं । देता झाला तियेतेनें ।। येरी न घेवोनी बोले वचन । आम्हां ऋषिधर्में काय उणें । तव भोगालागी मनें । येथें आणिलें, नरेंद्रा ।। १ : १२३-१३१

हा प्रसंग राजतरंगिणीतल्या सारखाच आहे. तो शाहीदरबारात व हा रानात आणि चक्रवर्म्याने त्या मातंग कन्येची भोगेच्छा मानली व हरिश्चंद्राने ती अवमानली, एवढाच फरक. कल्हणाने केलेला डोंब जातीचा उल्लेख लक्षात घेण्याजोगा आहे, कारण हेमचंद्राने 'काव्यानुशासना'त (१२ वे शतक) गेयकाव्याच्या यादीत डोम्बिका गीतांचा निर्देश केलेला आहे. या डोम्बिका गीताची त्याने केलेली व्याख्या व त्यावरील भाष्यात केलेली चर्चा वाचली असता, हे गीत कल्हण, ज्ञानेश्वर व मुक्तेश्वर यानी वर्णिलेल्या गीतांशी आणि पेशवेकालीन लावणीशी पुष्कळसे जुळणारे आहे, असे आढळून येते.

## आचार्य हेमचंद्र यांची व्याख्या व लावणी

आचार्य हेमचंद्रांनी 'काव्यानुशासना'च्या ८ व्या अध्यायात प्रबंधात्मक काव्याचे प्रकार सांगितले आहेत. प्रबंधात्मक काव्याचे श्रव्य व प्रेक्ष्य असे दोन मुख्य भेद. श्रव्य काव्यात महाकाव्य, आख्यायिका, कथा, चंपू असे प्रकार येतात. प्रेक्ष्य काव्याचे पाठ्य व गेय असे भेद असून, पाठ्य प्रेक्ष्य काव्यात नाटक, प्रकरण, नाटिका इत्यादी १२ प्रकार आणि गेय प्रेक्ष्य काव्यात डोंबिका, भाण, प्रस्थान, शिगक, भाणिका, प्रेरण, रामाक्रीड, हल्लीसक, रासक गोष्ठी, श्रीगदित, रागकाव्य हे ११ प्रकार येतात. 'काव्यानुशासन' हा ग्रंथ सूत्रमय असून त्यात या प्रकारांची लक्षणेही सांगितली आहेत. डोंबिकेचे लक्षण पुढीलप्रमाणे—

छन्नानुरागगर्भाभिरुक्तिभिर्यत्र भूपते :
आवर्ज्यते मनः सा तु मसृणा डोम्बिका ।।

(डोंबिका म्हणजे प्रच्छन्नप्रेमगर्भ वचनांनी राजाची प्रीति संपादन करण्यासाठी म्हटलेले मृदुमधुर गीत.)

आचार्य हेमचंद्रांनीच 'काव्यानुशासन' ग्रंथावर 'विवेक' नावाची टीका लिहिली आहे. त्या टीकेत डोंबिका काव्यासंबंधी निरनिराळे प्रश्न उपस्थित करून बरीच चर्चा केली आहे. ती या काव्यप्रकारावर पुष्कळच प्रकाश टाकते. त्यांतील पहिला प्रश्न असा—

ननु डोम्बिकाशिङ्गकादौ अन्योन्यानुचितत्वं वाक्यानां तत्रश्चनन्वये कथं रंजकत्वम ?

(डोंबिका, शिगटक इत्यादींतील वचनांचा परस्परांशी तर्क फारसा संबंध नसताना मनोरंजन कसे होते ?)

याला उत्तर पुढीलप्रमाणे—

देवतास्तुतेः स्त्रीपुंभावममाश्रयस्य च शृङ्गारस्य सर्वत्रानुगमात् ।

(डोंबिकादी काव्यात देवतांची स्तुती असते. पण तिचा आविष्कार स्त्रीपुरुषभावाच्या आश्रयानेच होत असल्यामुळे त्यात प्रामुख्याने शृंगाराचाच आविष्कार होतो आणि म्हणून तो रंजक होतो.) यावरून डोंबिकागीतात देवतांची स्तुती असून तिचा आविष्कार शृंगारिक पद्धतीनेच होत असे, हे स्पष्ट आहे. या शृंगाराचा रोख देवतेकडे नसून राजाकडेच असे आणि स्तुती करून देवतेला प्रसन्न करून घेण्याऐवजी, त्या स्तुतीच्या निमित्ताने उन्मादक नृत्य करून, राजाला कामातुर करून, त्याला चौर्यसुरताला प्रवृत्त करणे, हाच डोंबिकेचा उद्देश असे. याला आधार म्हणून आचार्यांनी 'चूडामणिडोम्बिके'तील एक प्राकृत द्विपदी उद्धृत केली आहे. ती अशी—

हेट्ठे वि डोम्बी णव्वमिसहिइ होमि हउं ।
चोरियमिहुण हं वंमहसार कहेमि तउ ।।

(मी डोंबी होऊन तुला चौर्यमिथुनाचे मन्मथसार सांगते.)

दुसरा प्रश्न स्पष्ट विचारलेला नसला तरी आचार्यांनी दिलेल्या उत्तरावरून अनुमानिता येतो. तो असा असावा—

अस्पृश्य जातीच्या डोंबीने प्रत्यक्ष भूपतीला चौर्यसुरताला उद्युक्त करणे, हे कितपत योग्य ?

या प्रश्नाला आचार्यांचे उत्तर असे—

डोम्बिकादौ तु कामस्यैव प्रच्छन्नानुरागपरमरहस्योपदेशात ।
'यद्वामाभिनिवेशित्वम्' इत्यनेन मन्मथसारत्वेनाभिधानात् ।











पुरुषार्थस्यैवोपदर्शनात ।

काम हा धर्म, अर्थ, काम व मोक्ष या चार पुरुषार्थांपैकीच एक असल्यामुळे त्याचा उपदेश अयोग्य कसा ? चोरटेपणामुळे अयोग्य मानावा, तर चोरट्या प्रेमातच कामविकाराचे परमरहस्य असते. डोंबी हीन जातीची म्हणून तिच्याशी संबंध निषिद्ध मानावा, तर स्त्री जेवढी दुष्प्राप्य तेवढी प्रणयाची माधुरी अधिक. चोरट्या व निषिद्ध प्रेमाच्या गौरवाला आधार म्हणून आचार्यांनी 'यद्वामाभिनिवेशित्वम्' या भरतमुनींच्या वचनाचा निर्देश केला आहे. तो संपूर्ण श्लोक पुढीलप्रमाणे आहे:

यद्वामाभिनिवेशित्वं यतश्चैव निवार्यते ।
दुर्लभत्वं च यंत्रार्याया : सा कामस्य रतिः परा ॥

नाटचशास्त्र २२ : १९३.

(जेव्हा प्रीति वाममार्गी असते, जेव्हा 'हा नाद सोड, सोड' असा प्रेमिकाला परावृत्त करण्याचा प्रयत्न होतो, जेव्हा हवी हवीशी वाटणारी स्त्री दुष्प्राप्य असते, तेव्हाच कामविकाराची उत्कटता प्रत्ययास येते.)

तिसरा प्रश्न असा –

अथ पाठ्यस्य गेयस्य रूपकस्य को विशेषः ?

(नाटकादिकांसारखे पाठ्य रूपक आणि डोंबिकादिकांसारखे गेय रूपक यांत भेद कोणता ?)

त्याला आचार्यांचे उत्तर असे—

पाठ्ये हि अङ्ग् गीतं चेत्युभयमप्रतिष्ठितम् । गेये तु गीतमङ्ग् च द्वयमपि स्वप्रतिष्ठम् ।

(पाठ्यात अंग व गीत या दोहोनाही प्रतिष्ठा नाही; गेयात या दोहोनाही स्वयंभू प्रतिष्ठा आहे.)



गीत म्हणजे गायन, पण अंग म्हणजे काय ? चैतन्य देसाई म्हणतात, 'अंग म्हणजे आंगिक अभिनय' (पहा 'नृत्यनाट्य व गेयनाट्य', 'छंद' व. ५ अं. ३) पण नाटकादिकात आंगिक अभिनयाला स्थान नसते, हे म्हणणे उघडच चुकीचे आहे. ग. त्र्यं. देशपांडे 'अंग'चा अर्थ 'नृत्य' असा करतात. (पहा 'संस्कृत नाटकांतील संगीत' छंद' व. २ अं. ३) परंतु या अर्थाला त्यांनी कोणताही आधार दिलेला नाही, आणि शोधूनही तो सापडत नाही. वेमभूपालाने 'सङ्गीतचिन्तामणी'त पाट, अंगपाट व अंग यांची लक्षणे पुढीलप्रमाणे दिली आहेत—

१. पाटः स्यात्केवलैः पाटैः क्रियते यत्र वादनम् ॥
२. सान्द्रैश्च सरसैः पाटैर्यतिर्यत्र च वाद्यते
सोऽङ्गपाटप्रवन्धस्तु वाद्यज्ञैः परिकीर्तितः ॥
३. व्यापकैरक्षरैः सान्द्रैरपाटैश्च विनिर्मितम् ।
यत्या च शुद्धया युक्तमङ्गमङ्गीकृतं बुधैः ॥

(मृदंग, ढोलकी, डफ यासारख्या वाद्यांवर आघात करून केलेले वादन म्हणजे पाट. अशा वाद्यांवर वाजवलेली लयतालाची मनोरम व सुरस बंदिष म्हणजे अंगपाटप्रबंध. हीच बंदिष जेव्हा धा धिक इत्यादी तालवाचक अक्षरांनी बांधली जाते, तेव्हा तिला अंग म्हणतात.)

अंग म्हणजे तालवाचक अक्षरांनी बांधलेली लयतालाची बंदिष आणि गीत म्हणजे गायन, हे अर्थ लक्षात घेतले की नाटकादी पाठ्य काव्यात अंग व गीत यांना प्रतिष्ठा नसते आणि डोंबिकादी गेय काव्यात स्वभावतःच असते, या विधानांचा नीट उलगडा होतो. नाटकाचा भर अभिनयावर असल्यामुळे तालाची बंदिष किंवा गायन यांना त्यात महत्त्व नाही. नाटकातील पात्रांच्या हालचाली नृत्याच्या तोड्यासारख्या बांधीव व्हायला लागल्या किंवा नाटकातील श्लोक गायकी ढंगात गायिले जाऊ लागले की अभिनय संपलाच. परंतु डोंबिका हे गेय काव्य असल्यामुळे त्यात गायनाची स्वाभाविकच अपेक्षा असते. शिवाय ते नृत्याच्या संगतीनेच गायिले जात असल्यामुळे, त्यात नृत्याचे तोडेही येतात. डोंबिकेसंबंधी आचार्य पुढे म्हणतात—

क्वचिन्नृत्त प्राधान्यं यथा डोम्बिलिकादिप्रयोगानन्तरं हुडुक्काराद्यवसरे।

(डोंबिका प्रयोगानंतर जेव्हा हुडुक्कादी वाद्यांचे वादन होते तेव्हा नृत्तास प्राधान्य असते.)

नृत्त म्हणजे रसभावविहीन शुद्ध नाच. कथ्थक किंवा भरत नाट्यातील तिरुमनम इत्यादी नृत्य प्रकारात हे पहावयास मिळते. हुडुक्का हे डमरूच्या आकाराचे एक हात लांबीचे चर्मवाद्य असून ते डाव्या खांद्यावर वरून उजव्या हाताने वाजविले जाई. डोंबिका हे गेय काव्य असले तरी सुरुवातीच्या नर्तनयुक्त गायनानंतर शुद्ध नृत्ताचा प्रयोग होत असे, असे वरील वचनावरून कळून येते. पुढे आचार्यांनी नृत्त प्रधानभावं गीतं च उपसर्जनभावं नयन्ती (नृत्ताला प्राधान्य व गीताला गौणत्व देत) असे जे नर्तकीचे वर्णन केले आहे, त्यावरून ही डोम्बिका प्रयोगाच्या अखेरीस नृत्तालाच प्राधान्य येत असे, हे स्पष्ट आहे अंगाला म्हणजे तालाच्या बोलांना महत्त्व येई ते यावेळीच. आजच्या तमाशातही लावणी गाऊन झाल्यावर ढोलकीच्या साथीवर शुद्ध नृत्ताचा प्रयोग होत असतोच.






## पाठ्यकाव्य व गेयकाव्य यांतील फरक

पाठ्य-प्रेक्ष्य-काव्य व गेय-प्रेक्ष्य-काव्य यातील दुसरा भेद आचार्यांनी सांगितला आहे, तो असा—

साक्षात्कारकल्पत्वाध्यवसायगोचरीकार्यत्वं च पाठ्यस्य प्रधानोंऽशः।
डोम्बिकादेर्न नटस्येवालौकिकरूप प्रादुर्भाविनया।

(साक्षात्काराच्या स्वरूपाचे संपूर्ण तादात्म्य दाखविणे हे पाठ्य-काव्याचे प्रधान कार्य. डोंबिकादी गेय काव्याचे नाही. डोंबिकादीत प्रादुर्भाव होतो तो जणू नटाच्या अलौकिक रूपाचा.)

पाठ्य-प्रेक्ष्य-काव्य व गेय-प्रेक्ष्य-काव्य यातील दुसरा पण महत्त्वाचा भेद म्हणजे नाटकादी पाठ्य काव्यात प्रेक्षकांना पात्राचा साक्षात्कार घडावा, अशा प्रकारचे नटाचे नाटकातील पात्राशी तादात्म्य होत असते आणि डोंबिकादी गेय काव्यांत तसे होत नाही. नाट्यात एखाद्या अभिनय कुशल नटीने राधेची भूमिका केली, तर प्रेक्षक राधा पाहात असतात; नटी नव्हे. परंतु डोंबिकेत एखादी डोंबी जेव्हा राधेचा अभिनय करते, तेव्हा प्रेक्षक राधा पाहात नाहीत, तर डोंबीचे राधेचे सोंग पाहात असतात. तमाशात अभिनयाला संपादणी वा बतावणी म्हणतात, ते यामुळेच. नटाचे वा नटीचे लौकिकरूप, नटाचे वा नटीचे अलौकिकरूप व साक्षात्काराच्या स्वरूपाचे अलौकिक रूप, असे भेद आचार्य करतात. नाट्यगृहाबाहेरील नटीचे रूप हे तिचे लौकिकरूप, तमाशात राधेची बतावणी करणाऱ्या डोंबीचे रूप हे तिचे अलौकिक रूप, कारण यात तादात्म्य किंवा अध्यवसाय संपूर्ण नसतो आणि नाटकात तादात्म्याने वठविलेली राधेची भूमिका हे अलौकिक रूप. डोंबिकेत नर्तकीने कितीही वेगवेगळ्या प्रकारच्या बतावण्या केल्या तरी ती ज्याला भुलविण्याकरिता हा डोंबिका-प्रयोग करीत असते, त्या राजाला ती स्वतःच्या लौकिक रूपाचा कधीही विसर पडू देत नसते, कारण त्यामुळे राजाला भुरळ पाडणे हा तिचा मूळ उद्देशच विफल व्हावयाचा. आचार्यांनी डोंबिका प्रयोगाचे विस्ताराने वर्णन केले आहे. ते म्हणतात—

सैव डोम्बिका, नरपतिपरितोषाकार्याभिधायिवचननिष्ठेन गीतेन वाद्येन नृत्येन च राजानमुनुरंजयितुं गृहीतोद्यमा, वक्रीत्वेन पूर्वस्थिता, मध्ये काचिदीदृशी चौर्यकामुककेलिलासमानसा, काचित्पुनरेवंविधा, कश्चिदेवंभूतश्चौर्यकामुकः, कोऽप्येवंभूतः, तत्र काचिदेवं प्रौढदूती, इत्येवमादि राजपुत्रहृदयानुप्रवेशयोग्यं, तत्प्रसादेन धनाद्यर्जनोपायमभिदधती, तमेव राजपुत्रं परत्वेन तथैव वा समुद्दिश्य, अन्यदपि चेष्टितमभिधाय, अन्ते डोम्बिकाकृत्यमेवोपसंहरति।

ती डोंबिका राजा खूष होईल अशा आशयाच्या गीताने, वाद्याने वा नृत्याने त्याचे अनुरंजन करण्यासाठीच प्रवृत्त झालेली असते. सुरुवातीला ती (आपल्या शरीराचा डौल दाखविण्याकरिता) कमरेत वाकून त्रिभंग ठाणात उभी राहते. मग (गीत गात असता) कधी चौर्य-सुरताला आसुसलेल्या स्त्रीची, कधी चौर्यकामुक राजाची, तर कधी (हे जमवून आणणाऱ्या) प्रौढ दूतीची वेगवेगळ्या प्रकारे बतावणी करते. (हे सर्व करीत असता) ती राजपुत्राच्या हृदयाचा ठाव घेतील आणि त्याची मर्जी संपादून धन मिळवून देतील, अशी वचने कधी गीतातील व्यक्तीला तर कधी खुद्द त्यालाच उद्देशून गाते. (हे सर्व त्यालाच उद्देशून आहे हे स्पष्ट करण्याकरिता) ती त्याच्या अन्यचरिताचेही (मधून मधून) वर्णन करते. अशा रीतीने ती डोंबिकाकार्य संपविते.



डोंबिकेचे गीत—बतावणी कुणाचीही असली तरी— प्रत्यक्षात राजालाच उद्देशून असते आणि तिचे सर्व हावभाव लौकिक जगतल्या-सारखेच— नाट्यशास्त्राच्या भाषेत लोकधर्मीच असतात हेही आचार्यांनी स्पष्ट केले आहे. ते म्हणतात—

त्वां प्रत्येवमहमुपश्लोकितवतीति तन्मध्यवर्तिगायनमुखसंक्रमितनिजवचना———— लौकिकव्यवहारगतहस्तभ्रूकर्मरोमाञ्चाक्षिविकारतुल्ययोगक्षेमतयैवाङ्गविकारादिसंभवमभ्याक्षिपति।

'मी तुलाच उद्देशून हे स्तोत्र गात आहे, अशा आशयाचे आपले वचन मध्यवर्ती गायनात गोवून, लौकिक व्यवहारात हात, भुवया, रोमांच, डोळे इत्यादिकांचे जे विकार प्रीती जोडण्यास व जपण्यास साहाय्यभूत होतात, तसलेच विकार आपल्यात स्वाभाविकपणेच उद्भूत झाल्याचे ती सूचित करते.)

आचार्यांनी केलेले हे डोंबिकेचे वर्णन वाचीत असता कल्हणाने 'राजतरंगिणी'त केलेले हंसीनागलतांच्या नृत्यगायनाचे वर्णन आठवते. "राजा व त्याच्याशी एकदिल झालेल्या त्या पोरी केवळ स्वसंवेद्य अशा दृग्व्यापाराने आपसात संलापच करू लागली— आपण तिच्या-विषयीच बोलतो आहोत हे ताडूनच की काय, ती पहा कशा असूया-गर्भ कटाक्ष फेकते आहे. मान खाली करून, कानातील कुंडले हलवीत गाणारी तर जणू काय विपरीतरतीच्या उद्रेकाचा आरंभ केल्यासारखीच शोभते आहे." हे वर्णन आठवले की आचार्यांच्या डोळ्यासमोर असलेली डोंबिका ती हीच, याबद्दल संशय राहात नाही. आता त्याच्याच जोडीला स. आ. जोगळेकर यांनी 'वारियानें कुंडल हालें' या कथेत केलेले तमाशाचे वर्णन वाचल्यास आजची लावणी व १०व्या शतकातील डोंबिका यांतील परंपरेचा धागा सहज लक्षात येईल.

"पेटीवाल्याने मुखडा वाजवला, तबलजीने ताल धरला. बकुळाने गवळण सुरू केली:

वारियाने कुंडल हाले
डोळे मोडित राधा चाले !

सारे साथीदार रंगात आले. त्या सर्वांची ती आवडती गवळण होती; त्यांची आणि श्रोत्यांचीही. शिवाय आज गोकुळाष्टमी !

काय चमत्कार पहा. त्या दिवशी कमळाने खरोखरीच कुंडले धारण केली होती.

कुंडले डोलवीत व डोळे मोडीत राधा चालू लागली. नूपुरांचा झणत्कार करीत आणि लग्नबगीने. नितंबांचे स्पंदन करीत आणि ऊर्ध्वांगाला हेलकावीत. कासोटयाचीं पट्टी उडवीत आणि पदराचा र्लफफेदार समला फडकावीत ! चालता चालता ती एकाएकी थबकली. तिने डोईवरून पदर घेतला आणि मान जराशी कलती करून डोळा मोडला.

आभाळात भराऱ्या मारणाऱ्या ससाण्याने भक्ष्यावर लक्ष केंद्रित करून एकाएकी झेप घ्यावी, तसे त्या दृष्टिक्षेपाने मला घायाळ केले. मी जागच्या जागी जरासा डगमगलो. माझा कणा एकाएकी वितळलासे मला वाटले. मी आजूबाजूला पाहिले. हे काय ? मी अजून तिथेच उभा आहे. मी भानावर आलो, मागे वळून पाहिले. माझा गोंधळ उडाला–हे पाहून प्रेक्षकांनी टाळ्या पिटल्या व कोणी शिट्ट्या फुंकल्या. तल्लीनतेचे समर्थन करण्यासाठी मी पुन्हा खिशात हात घातला आणि नोटांचा आणखी एक चुरगळा बाहेर काढून वर केला.

कमळा पुन्हा पुढे आली. ते मानधन मी तिच्या हाती दिले. इच्छिले होते पण कल्पिले नव्हते, ते त्या क्षणी झाले. तिने स्वयंस्फूर्तीने माझ्या हाताला हात मिळविला !

प्रेक्षकांनी पुन्हा टाळ्या पिटल्या, शिट्ट्या फुंकल्या. मी परतलो व खुर्चीवर येऊन वसलो.

पुन्हा गवळणीचे धृवपद सुरू झाले,

वारियाने कुंडल हाले
डोळे मोडित राधा चाले !

राधा पुन्हा कुंडल डोलवीत चालू लागली. पावला पावलाच्या गतीचीं धर्तीं बदलीत जागोजाग डोळे मोडू लागली.

तबला खणखणू लागला. बकुळाचा सूर चढला. कमळाचा नूर खुलला. गवळण कशी ठासून, घोळून सुरू झाली.

कमळाची वारी संपल्यावर आम्ही बाहेर आलो. भिवबा गाडीतच झोपला होता. बंडोबाने त्याला उठवले व बाजूला नेले. त्यांचे काय बोलणे झाले, ते मला ऐकू आले नाही.

थोडक्याच वेळाने तो एकटाच परत आला व गाडीच्या चाकावर बसला. गाडी जवळच्याच एका बोळात उभी करून तो मला म्हणाला, "अप्पासाव, तुम्ही जरा पडा सतरंजीवर, मी हा आलोच".

बराच वेळ झाला तरी तो आला नाही, म्हणून मी जरा कलंडलो. रात्र बरीच झाली होती. मला जरा डुलकी लागली.

गाडीच्या हादऱ्याने मी जागा झालो. अजून रात्रच होती. शेजारी गरम गरम, नरम नरम असे काहीसे भासले, गजऱ्याचा व घामाचा सुगंध आलासा वाटला.

मी खिशातल्या विजेरीचा चाप दाबला– माझ्या शेजारी कमळा होती !

प्रकाशाचा झोत मी समोर आणला. बंडोबाच्या खांद्यावर मान टाकून बकुळा पडली होती.

आणि गाडी भरधाव चालली होती."

## लावणी खुलते ती माहेरीच–तमाशात !

आजच्या तमाशाचे हे वर्णन व पर्यवसान आणि कल्हणाने 'राजतरंगिणी'त व आचार्य हेमचंद्राने 'काव्यानुशासना'च्या टीकेत केलेले डोंबिकेचे वर्णन व पर्यवसान यात फारसा भेद नाही. असलाच तर 'राजतरंगिणी' व 'काव्यानुशासन' यात डोंबिकेचे लक्ष्य राजा हे आहे, तर या कथेत 'अप्पासाहेब' हा ठेकेदार व 'बंडोबा' हा गुळाचा व्यापारी एवढाच. पण राजा व्यतिरिक्त इतर दानशूर आपल्याला 'ज्ञानेश्वरी'च्या १७ व्या अध्यायात भेटलेले आहेत. धनोपार्जन हेच डोंबिकेचे उद्दिष्ट असल्यावर डोंबीने राजाचाच हट्ट धरण्याचे कारण नाही. खुद्द हेमचंद्राच्याच टीकेत सुरुवातीच्या राजाचा पुढे राजपुत्र झालेलाच आहे. दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दीत राजाची जागा पेशव्याने व त्याच्या सरदारांनी घेतली, ब्रिटीश अमदानीत गावच्या पाटलाने, दुसऱ्या महायुद्धाच्या काळात ठेकेदारांनी व व्यापाऱ्यांनी आणि आजच्या लोकशाहीच्या काळात सर्वसामान्य पाव्हण्यांनी. पण डोंबिकेचा ढंग व उद्देश बदलला नाही. शृंगारिक गीत, वाद्य व नृत्य यांच्या साथीने गायचे आणि कामुक हावभावांनी व बतावणीनी प्रेक्षकांना पेटवून धन कमवायचे हाच, डोंबिकेचा काय की तमाशाचा काय, परंपरेने आलेला ढंग व उद्देश. कालमानाने लक्ष्य बदलले एवढेच.

तमाशातील लावणी एकनाथाच्या काळात भारुडात शिरली आणि 'वारियाने कुंडल हाले' अशा गवळणी भजनात गायिल्या जाऊ लागल्या, पेशवाईत ती कीर्तनात शिरली आणि कीर्तनकार 'तुजवर आम्ही फिदा बोल एकदा पद्मलोचने' अशी पदे कृष्णाला उद्देशून गाऊ लागले, दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दीत ती बैठकीत शिरली आणि लावणीला ख्यालगायकीचा रंग चढला, संगीत नाटकाच्या जमान्यात ती नाटकांत शिरली आणि तिला नाटयगीताचे रूप प्राप्त झाले, चित्रपट बोलके झाले, तेव्हा लावणी चित्रपटात शिरली आणि तिला रजतसृष्टीचा साजशृंगार [illegible], आणि











आता ती रेडियोत शिरल्यामुळे तिचे भावगीतात रूपांतर होऊ लागले आहे. लावणीने अशी विविध रूपे घेतली असली तरी आपल्या माहेरी, म्हणजे तमाशात, जशी ती खुलते तशी इतरत्र खुलत नाही. कारण तिचा जन्महेतू केवळ तमाशातच सफल होऊ शकतो; इतरत्र नाही. भारुडात करमणुकीच्या द्वारे अध्यात्म्याची शिकवण असते, कीर्तनात भक्ती व बैठकीत गायकी. या तिन्ही गोष्टी लावणीच्या हेतूस पोषक नाहीत. नाटकात लावणी गायिली गेली तर ती नाटकातील पात्रास उद्देशून असते; प्रेक्षकास नव्हे. लावणी गाणारी प्रेक्षकाकडे पाहात डोळे मोडू लागली तर नाट्याचा विचकाच होईल. चित्रपटात तर जिवंत स्त्रीच नसते मग तिचा प्रेक्षकांशी संवाद कसा होणार ? आणि रेडियो तर पूर्ण अशरीरी; त्याच्या संगतीत तिला कोणते सुख लाभणार ?

कीर्तन, नाटक, चित्रपट, रेडियो व तमाशा या संस्थामधील हा महत्त्वाचा भेद लक्षात न आल्यामुळे श्री. नामदेव व्हटकर यांनी 'तमाशा' या पुस्तकात एक विलक्षण तक्रार केली आहे. ते लिहितात–

"चित्रपटातील काही गाणी तशीच जर तमाशाच्या संगीत बारीत म्हटली तर वघे 'अर्रर्र, हिच्या कोणत्या चिचा पाडाला आल्या?' म्हणून शिट्ट्या घालतात. 'रसाळ आंबेवाली'चे गाणे तमाशात नाची म्हणते तेव्हा 'हां दिसले, आंबे दोन आहेत,' असा कुठून तरी आवाज यतो. प्रतिष्ठितांच्या घरी ह्या ध्वनिमुद्रिका पोराबाळांनी मिटक्या मारीत ऐकल्या पण त्याच तमाशात अश्लील झाल्या. 'कुणी ग बाई केला, कसा ग बाई झाला– राधे तुझा सैल आंबाडा' हे 'भाव' गीत वुद्रुकांनी माना डोलवीत ऐकले असेल. तमाशात तेच आले की, 'त्या'-नंतर ती केस ठाकठीक करून सुद्धा आली नाही, असा अर्थ प्रेक्षकांनी घऊन हो हो करून शिट्ट्या घालायच्या. कालिदासाच्या मालविकाग्निमित्र नाटकात अग्निमित्र राजा मालविकेच्या कमरपट्ट्याला हात घालतो असे वर्णन आहे. ते सारे चालते पण तमाशात तसेच म्हटले की ओंगळ, अश्लील !" ('तमाशा' पा. ९७)

तक्रार चुकीची आहे पण वर्णन बरोबर आहे. तमाशाला ओंगळ, अश्लील म्हणणारे 'वुद्रुक' शिट्ट्या घालीत नाहीत; ते मुळी तमाशाला जातच नाहीत. जातात व शिट्ट्या घालतात ते तमाशाला ओंगळ, अश्लील म्हणत नाही; त्यांना तो तसाच हवा असतो. तमासगिरांचाही प्रेक्षकांच्या या वर्तनावर आक्षेप नसतो; त्यांनाही हाच प्रतिसाद अपेक्षित असतो. नाची प्रेक्षकाकडे पाहून डोळे मोडते आणि प्रेक्षक उल्लू होतात. तिच्या सवालाला प्रेक्षकाकडून जबाब मिळतो, कारण तो त्यांनाच उद्देशून असतो. या संदर्भात एक घडलेला प्रसंग आठवतो. तो उद्बोधक ठरावा.

## कुठवर पाहू वाट सख्या मी ?

सहासात वर्षांपूर्वी महाराष्ट्र राज्य–महोत्सवाला मुख्य मंत्री यावयाचे होते. त्याना यायला भलताच उशीर झाला आणि त्यांच्या अनुपस्थितीतच संगीत बाऱ्या सुरू झाल्या. तास-दीड तासाने मुख्य मंत्री आले. त्यवेळ

कुठवर पाहू वाट, सख्या मी,



माथ्यावर चंद्र किरे ढळला,
येण्याचा वखुत किरे टळला

ही लावणी चालू होती. गायिकेने मुख्य मंत्र्यांना येताना पाहिले मात्र आणि त्यांच्याकडे बघून असा काही आविर्भाव केला की, जणू काय ती त्यांचीच वाट पाहात होती. आणि नाट्यगृहात कडाडून टाळी पडली. नाटकात हा प्रकार झालाच नसता आणि कोणी अचरट नटी करती तर प्रेक्षकांचा बेरंग झाला असता.

• • •

['काव्यानुशासन' व 'राजतरंगिणी' हे ग्रंथ समजून घेण्यास एल्फिन्स्टन कॉलेजच्या संस्कृतच्या प्राध्यापिका डॉ. गुलाब दवणे यांनी जी मदत केली, त्याबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहे.]








( पान ९ वरून-भेट )

"नको ! थँक्यू !!"

"कुठे निघालात ?"

"देशपांडेबाईकडे !"

"पायी-पायीच ?"

"पायानासुद्धा काही काम हवं ना ?"

"तेही खरंच ! देशपांडेबाईंकडे आपल्या सहज निघाला होतात ना ?"

"सहज नाही ! तसंच काही घडलं आहे. तुम्ही ऐकलंच असेल !'

"ऐकलं आहे उडत उडत !"

"दामिनीबाईची लिलू म्हणे घरातून नाहीशी झाली !"

"ऐकलं आहे !"

"मग चलणार ? भेटायला पाहिजे !"

"नको !"

"कां हो ?"

"खरं सांगू छबूताई ? मला दु:ख आणि दु:खी माणसांची 'अॅलर्जी' आहे. माझ्याने त्यांना भेटवतच नाही !"

"वा : ! दु:खाच्या वेळीच तर माणसाना अवश्य भेटायला पाहिजे. त्यांना धीर द्यायला पाहिजे. दु:खाची वाटणी करायला पाहिजे."

"खरं ! पण मला ते जमत नाही !"

"हा एक प्रकारचा पळपुटेपणाच आहे, नाही का ? निर्दयपणासुद्धा आहे !"

"असेल ! पण दु:खाचा वास आल्याबरोबर गुळाकडे धावणाऱ्या डोंगळ्याप्रमाणे मला धावता येत नाही. काही काही माणसाना मात्र दुसऱ्याचं दु:ख पाहूनच मोठं सुख होतं !" बोलता बोलता रेवाबाईंचा स्वर तिखट झाला. छबूताईंकडे त्यानी एकदा रोखून पाहिलं. आणि गाडी सुरू केली. तेवढ्यात छबूताई त्यांना म्हणाल्या,




"तुमच्या हाताचा इसब अजून तसाच दिसतो आहे !"

"तसाच आहे !" रेवाबाईनी झटक्यात उत्तर दिलं. त्यांचा चेहरा लाल झाला.

"आणि तुमच्या यजमानांच्या हाताचा इसब कसा काय आहे ?" तोच विषय छबूताई खाजवीत राहिल्या.

"तोही तसाच आहे !" रेवाबाईंचा चेहरा अधिकच लाल झाला. त्या चेहऱ्याकडे पाहून छबूताईंच्या पोटात एक उसळी आली. आणि त्या साळसूदपणे म्हणाल्या,

"इसब म्हणजे तसा फार चिकट रोग. पण पर्वा आमची सुमा-आली होती. तिनं मला इसबावर एक रामबाण औषध सांगितलं. सांगू तुम्हाला ?"

"आता नको!" रेवाबाईनी तुटक्या स्वरात उत्तर दिले आणि फर्रकन त्यांची गाडी चालू लागली. छबूताईंच्या पोटात आनंदाच्या आणखी एक-दोन उकळ्या उठल्या... ह्या एरवी सुरेख असलेल्या रेवाबाईंच्या हातावर इसब होता ! आणि तिचा इसब तिच्या नवऱ्यालाही लागला होता म्हणे ! प्रेमलग्न केलेल्या [illegible]घांच्या हस्ता-





वरचा इसब आठवून छबूताईंना पुष्कळदा हसायला येत असे. कल्पना करा, दुष्यंत आणि शकुंतलेला इसब झाला आहे ! शकुंतलेचे हस्त दुष्यंताने हातात घेतले आणि बापड्या दुष्यंतालाही घाणेरडा इसब झाला ! ह्या राजीव वर्देंचे तस्से आहे. ही रेवाबाई हिंडते हातात हातमोजे घालून ! पण शेवटी रोगट ती रोगट ! आपल्या मात्र नखातसुद्धा रोग नाही. अडतीसच्या वयात आपण अठ्ठावीसच्या दिसतो, असं सारं जग म्हणतं. आपले यजमानसुद्धा म्हणतात ! पण ह्या रेवाचं दैव कसं आहे पहा! तिच्या रूपावर दैवानं हा घाणेरडा डाग लावला. तिशीच्या आतच तिला हा रोग झाला. आणि वर सद्बुद्धीने कुणी औषध सांगितलं तर रागावते ! दुःखाची म्हणे हिला 'अॅलर्जी' आहे... पण ह्या दुःखण्याचं काय ? खरोखर आपण भाग्यवान् आहोत. जन्मात कसलाही रोग आपल्याला ठाऊक नाही. कुठलं तरी दुखणं घेऊन जगात हिंडायची वेळ आली, तर त्या पैशाचा उपयोग काय आणि मोटरीचा उपयोग ! इसबावर जेव्हा जेव्हा एखादं औषध ऐकण्या-वाचण्यात आलं तेव्हा तेव्हा छबूताईंनी ते रेवा वर्देला न चुकता सांगितलं. कधी कात्रणं दिली, कधी वैदू पाठविले, त्याचाच तिला फणकारा आला. म्हणतात ना, ज्याचं करायला जावं बरं... !

छबूताई ह्या निष्कर्षाप्रत आल्या आणि सरासरी त्याच क्षणी दामिनीबाईंच्या घरात घंटा वाजू लागली. बाहेरच्या गुंडीवर छबूताईंनी बोट दाबून धरले होते. बराच वेळ बाहेर कुणी आलंच नाही. तेव्हा छबूताईंना चुकल्यासारखं वाटलं. तेवढ्यात जड पावलं टाकत कुणीतरी आलं. आत कांकणं वाजली. आणि दार उघडलं गेलं.

"या !" देशपांडेबाई म्हणाल्या. त्यांचा चेहरा उतरलेला होता. डोळे लाल दिसत होते. छबूताई देशपांडेबाईंकडे पाहून हसल्या आणि म्हणाल्या,

"कसं काय दामिनीबाई ?"

दामिनीबाईंच्या पापण्या एक दोनदा लवल्या. मग त्या म्हणाल्या,

"ठीक आहे !" आणि त्या हसल्या. त्यांचे ते हसणे रडण्यापेक्षाही वाईट होते. काय बोलावे ते छबूताईंना कळेना. लिलूचे काय झाले ते ऐकण्याला त्या फार उत्सुक होत्या. पण लिलूचा विषय दामिनीबाईंशी एकदम काढायचा कसा ? काहीतरी भांगडे झाले होते हे निश्चित. आणि त्या "काहीतरी"च्या कल्पनेने छबूताईंना पोटात पीस फिरल्यासारखे वाटत होते. तसे त्याना दामिनीबाईंचा उतरलेला चेहरा पाहून वाईट सुद्धा वाटले. दामिनीबाईंचे नेहमीचे शब्दाशब्दाला हसणे पार मावळले होते. त्यांचा तोरा उतरल्यासारखा दिसत होता. अर्थातच त्या दयेला पात्र होत्या. आणि छबूताईंना त्यांची दयासुद्धा वाटत होती. एका मानी, गर्विष्ठ आणि तशा चांगल्यासुद्धा असलेल्या बाईवर हा प्रसंग आलेला पाहून कुणाला दया वाटणार नाही ? दयेचे, सहानुभूतीचे, सांत्वनाचे शब्द बोलायला छबूताई उत्सुक होत्या. पण प्रारंभ कसा करावा तेच त्याना कळेना. म्हणून त्या नुसत्याच खाकरल्या आणि म्हणाल्या,

"प्रकृति बरी आहे ना ?"

"उत्तम आहे !" दामिनीबाई एक सूक्ष्म उसासा सोडून म्हणाल्या, "तुम्ही मजेत आहात ना ?"

"मजा कशाची कर्माची !" छबूताई सांगू लागल्या, "तीन दिवस सारखी पाहुण्यांची वर्दळ होती. तुमच्याकडे येईन येईन म्हणत होते, पण जमतच नाही ! खरं म्हणजे यायला पाहिजे होतं." छबूताई क्षणभर दामिनीबाईंकडे पहात राहिल्या. दामिनीबाईंचा चेहरा ताठ होता. त्यांचा चेहरा इतका ताठ असावा, हे छबूताईंना बरे वाटले नाही. त्या ईर्षेने बोलू लागल्या, "आमचे जावई आणि सुमा दोघंहि आली होती. कोर्डीला गेली होती सुमा नवऱ्यावरोबर. दोघानाहि तुमच्याकडे आणणार होते. पण. . . ." कोपऱ्यात गाठलेल्या सावजाकडे शिकाऱ्याने पहावे, तशा छबूताई देशपांडेबाईंकडे पुन्हा पहात राहिल्या. पण देशपांडेबाई शब्द बोलल्या नाहीत. त्यांचा चेहरा अधिकच ताठ झाला. तेव्हा छबूताई खांकरून म्हणाल्या, "सुमा लिलूची आठवण काढत होती. फारा दिवसात भेट झाली नाही म्हणत होती."

"अस्सं !" दामिनीबाई उद्‌गारल्या. त्यांच्या स्वराना धार होती. ती धार छबूताईंना बोचली. त्याना वाटले, अद्याप ह्या बाईने रडू नये म्हणजे काय ? आपल्या गळ्यात गळा घालून अद्याप हिने आपले मन मोकळे करू नये ? अद्याप हिने एवढा ताठा बाळगावा ? नेहमी भेटणाऱ्या मैत्रिणीशी अद्याप हिचे हे वर्तन ! आणि हा विचार मनात येताच फट्‌कन् छबूताईंनी प्रश्न केला,

"लिलू दिसत नाही कुठे ?"

"नाही दिसत !" दामिनीबाईंनी दोन शब्दात उत्तर दिले.

आता अगदी घाईला येऊन छबूताईंनी विचारले, "म्हणजे कुठे बाहेर का गेली आहे ?"

(दीपा. २५)

"गेली असेल !" पुन्हा दोनच शब्दांचे उत्तर आले. ह्यावर काय बोलावे ते छबूताईंना सुचेना. ह्या विषयाचा मूळ गाभा घोळवायला त्या उत्सुक होत्या. आणि तिथवर दामिनीबाई त्याना येऊच देत नव्हत्या. प्रास्ताविकातच फार वेळ चालला होता. हा विलंब छबूताईंना असह्य वाटत होता. तेवढ्यात दारावरची घंटा वाजली, दार उघडले. आणि घाईघाईने गोदूताई आत आल्या. आल्याबरोबर त्यानी दामिनीबाईंना प्रश्न केला,

" लागला का हो लिलूचा काही पत्ता ?"

"नाही !" दामिनीबाईंनी मान हलविली.

"चार दिवस होऊन गेले, आणि अजून पोरीचा पत्ता नाही ?" गोदूताई घाप टाकत उद्गारल्या.

"नाही !" पुन्हा दामिनीबाईंनी मान हलविली आणि त्यांच्या डोळ्यात पाणी आले. त्यासरशी छबूताई खळाळून रडल्या आणि म्हणाल्या,

"हे मी काय ऐकते आहे, दामिनीबाई ? खरंच का लिलू नाहीशी झाली आहे ? अहो एवढी तरणीताठी पोर ! ऐकलं तेव्हा मला खरंच वाटेना !" ह्यावर दामिनीबाई काहीच बोलल्या नाहीत तेव्हा छबूताई डोळे टिपत म्हणाल्या 'मग मला फोन नाही का करायचा? मी कुणी परकी का आहे ? सुमा, तिचा नवरा, हे सगळे धावून आलो असतो ह्या प्रसंगाला !" छबूताईंचे डोळे ओथंबले. तरी दामिनीबाई स्तब्धच राहिल्या. पण गोदूताई पुटपुटल्या,

"आम्ही शेजार-पाजारची सगळी माणसं करवेल तेवढी धावाधाव करतोच आहोत की ! तिचे प्रत्यक्ष वडील तिला शोधायला गेले आहेत."

गोदूताईंच्या बोलण्याकडे फारसे लक्ष न देता छबूताई दामिनीबाईंकडे कनवाळूपणे पहात म्हणाल्या,

"तिचा तो गायन मास्तर कुठे आहे. त्याचा शोध घेतलात का पण? आणि तिच्याबरोबर टेनिस खेळणारा तो चॅटर्जी–तो आहे ना जागेवर? अप्पांनी सारी चौकशी केली असेलच तिला शिकविणाऱ्या त्या प्रोफेसरचा काय पत्ता आहे ? आणखी वर्तमानपत्रात विज्ञापन दिलंत का ?"

"वा: !" गोदूताई निषेधाने मान हलवीत म्हणाल्या, "वर्तमानपत्रांत विज्ञापन देऊन जगभर डंका का वाजवायचा तिच्या नांवाचा? अजून लिलूचं लग्न व्हायचं आहे म्हटलं !"

लिलूचं अजून लग्न व्हायचं आहे. पण आपल्या सुमाचं मात्र लग्न झालं, ह्या कल्पनेनं छबूताईंना उचंबळून आल्यासारखं वाटलं व म्हणाल्या, "तेहि खरंच !"

तेवढ्यात दारावरची घंटा पुन्हा वाजली आणि टपालवाला तार घेऊन आला. त्याने समोर धरलेल्या कागदावर स्वाक्षरी करताना दामिनीबाईंचा हात थरथरत होता. तारेचे पाकीट त्यांच्याने फोडवेना. तेव्हा छबूताईंनी ते पाकीट घाईघाईने वांचून घेतले, फोडले व अक्षरांवरून भराभर डोळे फिरवीत त्या मोठ्याने वाचू लागल्या, "Lilu and self reaching Home Tomorrow evening. No worry – Appasaheb" (लिलू आणि मी उद्या सायंकाळी घरी येत आहोत. चिंता नसावी–अप्पासाहेब.)

तारेतील शब्द वाचत असताना छबूताईंचा चेहरा भराभर टला आणि त्या म्हणाल्या, "सुटलात हो दामिनीबाई ! प्रत्यक्ष अप्पा लिलूला आणताहेत ! तार भोपाळहून केली आहे. आता निश्चित रहा."

हे शब्द ऐकल्यावर मात्र दामिनीबाईंच्या मनाचा बांध ढासळला. त्या स्फुंदून स्फुंदून रडू लागल्या. छबूताईंनी त्यांची आसवे टिपली. त्यांच्या पाठीवरून हात फिरविला व त्या सांत्वनाचे शब्द बोलल्या, "दु:ख काही कुणाला चुकत नाही." त्या म्हणाल्या, "मग तो कुणी राजा का असेना ! हा संसार म्हणजेच मुळी एक सुखदु:खाचा खेळ आहे. पण माणसानं सारं दु:ख धीरानं पचवलं पाहिजे. आल्या प्रसंगाला तोंड दिलं पाहिजे. घरात वाढलेली मुलगी असणं म्हणजे गोष्ट सोपी नव्हे. तशात ती मुलगी शिकलेली असली तर बोलायलाच नको. तिचं आपण लग्न करावं तर कठीण, करू नये तर त्याहून कठीण. पण ह्यातून मार्ग हा काढायलाच पाहिजे. लोकांची तोंडं कोणालाच धरवत नाहीत. पण लिलूच्या जीवाला काही अपाय झाला नाही, हे काय थोडं आहे ? ह्यातच आनंद मानला पाहिजे...!" वगैरे वगैरे. मनाचे पूर्ण समाधान होईपर्यंत छबूताईंनी बोलून घेतले. गोदूताईंनी करून आणलेली कडक कॉफीहि त्यानी घेतली. आणि मग, "येईनच मी लिलूला भेटायला. जमलं तर स्टेशनवरच येईन." असे आश्वासन देऊन त्यानी दामिनीबाईंचा निरोप घेतला.

पुन्हा छबूताई वाट कापू लागल्या. त्यांचे पोट भरल्यासारखे झाले होते. तरीहि अद्याप एक-दोन ठिकाणी जाऊन यावे असे त्याना वाटतच होते. कुठे जावे विचार करीत होत्या. तेवढ्यात त्याना समोरून दिसली

उत्तरा त्यांच्या सुमाची मैत्रिण होती. उत्तरा स्कॉलर होती. अविवा-हित होती. सुंदर नव्हती. ती फाडफाड बोलणारी म्हणून प्रसिद्ध होती. उत्तराच्या मध्यस्थीने म्हणजे श्रीमंत देसायांच्या मनोहरशी, सुमाचे लग्न जमविण्याची छबूताईनी खूप धडपड केली होती. पण दादा देसायांनी–आणि मनोहरनेसुद्धा–सुमाला नाकारले होते. तरीहि खेळाडू वृत्तीने छबूताईनी श्रीमंत देसायांकडे जाणे-येणे चालूच ठेवले होते. आणि उत्तरालाहि त्यांनी तोडले नव्हते. कां तोडायचे ? शक्य तेवढे उत्तराने सुमासाठी केले होते. त्यात तिला यश आले नाही. आणि सुमाचेहि मनोहरविना काही अडले नाही. उत्तराविषयी छबूताईंच्या मनात काही अडले नाही. उत्तराविषयी छबूताईंच्या मनात काही राग नव्हता, पण दादासाहेब देसायांविषयी आणि विशेषतः मनोहरविषयी एक वळकट अढी त्यांच्या मनात राहून गेली होती. गर्भश्रीमंताचा मुलगा झाला म्हणून त्याने सुमाला नाकारण्याइतका मस्तवालपणा करावा? छबूताईना ती गोष्ट लागून गेली होती. उत्तरा भेटली म्हणजे मनोहरविषयी व्यंगार्थाने काहीतरी बोलल्याविना त्याना चैन पडत नसे. आताहि त्यांचा तोच विचार होता. पण उत्तरेचे त्यांच्याकडे लक्ष नव्हते. ती कसल्या तरी तंद्रीत चालत होती. म्हणून छबूताईंनीच तिला हाक मारली व त्या म्हणाल्या,

"काय उत्तरादेवी, आमच्याशी बोलायचं नाही का ?"

"…" उत्तराने छबूताईंकडे पाहिले व भानावर येत ती म्हणाली, "न बोलायला काय झालं?"

"पण बोलली नाहीस ?– कसल्या विचारात गुंगली होतीस ?" छबूताईनी प्रश्न केला.

"असंच आपलं !" उत्तरा उद्गारली.

"तरी पण ?" चिवटपणे छबूताईनी पुन्हा प्रश्न केला.

"माणसाच्या सुखदुःखाचा विचार करीत होते." उत्तरा खिन्न स्वरात म्हणाली.

"एवढा गंभीर विचार सुचायला मला काही एक झालेलं नाही. पण मी आताच हॉपिटलमध्ये मनोहरला भेटायला गेले होते म्हणून विचार सुचले...."

मनोहरचे नांव ऐकताच छबूताई चमकल्या आणि म्हणाल्या,

"मनोहर हॉस्पिटलमध्ये कशाला गेला आहे ?"

"तो भाजला आहे, छबूताई !" कापऱ्या स्वरात उत्तरा म्हणाली.

"काय म्हणतेस काय ?"

"हो, त्याचे हात, पाय, तोंड सारं भाजलं आहे. त्याच्या चेहऱ्याकडे अगदी पाहवत नाही." बोलता बोलता उत्तराचे अंग शहारले. छबूताईनाहि अनपेक्षित धक्का बसल्यासारखे झाले व त्या उद्गारल्या,

"त्याच्या जीवाला तर काही धोका नाही ना ?"

"नाही असं डॉक्टर म्हणतात. पण काही दिवस काळजीचे जाणार. आणि त्याचा चेहरा पूर्वीसारखा कधीच होणार नाही."

मनोहरचा सुंदर पुरुषी चेहरा छबूताईंच्या डोळ्यासमोरून फिरून गेला ! त्या म्हणाल्या,

"कधी ? … गं हे वेगळं ?"

"आता दोन तासापूर्वी." उत्तराने आवंढा गिळला व ती म्हणाली, "जाते. एकदा घरी डोकावून पुन्हा इस्पितळात जायचं आहे !"

उत्तराने पाय उचलला तशी उतावीळपणे तिचा हात धरून छबूताई म्हणाल्या,

"जरा थांब तर ! हे सगळं कसं झालं ते तर मला सांगशील."

"मग सांगेन केव्हातरी !"

"नाही आता सांग. देसाई मंडळींवर केवढा प्रसंग आला हा ! कसं गं झालं हे ?" छबूताईनी उत्तराचा हात चिवटपणे तसाच धरून ठेवला. उत्तरा एखाद्या पुतळीसारखी ताठ झाली. तिचा चेहरा पालटला. मग उपरोधिक स्वरात ती म्हणाली,

"दुःखाच्या डोंगरातूनच सुखाची खाण शोधण्याची कला कुणाकुणाला सापडलेली असते. अशा माणसांच्या सुखाला काही तोटाच नाही. कारण जगात दुःखच दुःख भरलेलं आहे. जगातलं दुःख जितकं मोठं, तितकं ह्या माणसांचं सुख मोठं ! पण अशा भाग्यवान् माणसांपैकी देसाई मंडळी नाहीत की मी नाही. दुःखानं आम्हाला दुःखच होतं, सुख नाही." उत्तरेचे हे जरासे गूढ वाटणारे बोलणे छबूताई लक्षपूर्वक ऐकत असताच त्यांच्या हाताला झटका बसला व उत्तरा तीरासारखी चालू लागली. तिच्या बोलण्याचा अर्थ छबूताईना कुठवर कळला देव जाणे. त्या मनोहरचे भाजलेले हातपाय व विद्रुप चेहरा कल्पनेने रंगवीत बसल्या होत्या.

अन्य विचाराना त्यांचेपाशी थारा नव्हता. त्यांना वाटत होते....

केवढा अभिमान होता मनोहरच्या आईवडिलाना आणि मनोहरला त्याच्या चेहऱ्याचा ! त्या चेहऱ्यामुळेच सुमा ह्या मंडळींनी नाकारली. आणि आता मुळी त्याचा तो चेहराच विद्रुप झाला ! काय देवाघरचा न्याय आहे पहा ! आता मनोहरला एकाद्या सुंदर मुलीने पत्करलेच

तर ती केवळ त्यांच्या श्रीमंतीचा विचार करणार ! त्याचे रूप गेले ! पैसाहि असाच जाऊ शकतो. ह्या विचारासरशी छबूताईंच्या पोटात पुन्हा पीस फिरल्यासारखे झाले व त्या चालू लागल्या. कुठे जायचे, ते आता स्पष्टच होते. देसाई मंडळींची विचारपूस करणे आता त्यांना प्राप्तच होते. मनोहरला भेटणे प्राप्त होते. तो कुठल्या इस्पितळात होता हे शोधून काढणे काही तेवढेसे कठीण नव्हते. थोड्या चौकशीने ते कळले असते. परंतु हे सगळे तांतडीने आटपायचे म्हणजे एखादे वाहन शोधणे अवश्य होते. एखादी टॅक्सी किंवा रिक्शा ! म्हणजे मग सारे काही आटोपून बंडू शाळेतून येण्यापूर्वीच त्यांना घरी पोहोचता आले असते. घरी आल्याबरोबर लहानग्या बंडूला त्याची आई लागत असे. त्याची वेळ त्या कधीहि चुकवीत नसत. बंडूच्या आठवणीनेही छबूताईंचे काळीज हुरखले. त्याच्या इवल्याशा हातांचा विळखा ह्या क्षणीहि त्यांना जाणवला. त्यांची दृष्टि वाहन शोधतच होती. देसाई मंडळींच्या दुःखाचा विचार त्या करीतच होत्या. सांत्वनाचे शब्द त्यांच्या मनात आकार घेतच होते. तेथे होणाऱ्या आपल्या गंभीर व दुःखी चेहऱ्याचा मुखवटा त्यांचा त्यांनाच दिसत होता. तोच दुरून एक स्वयंप्रेरिका भरधाव येताना त्याना दिसली. क्षणार्धात् त्यांच्या ध्यानात आले की ही आपलीच नवी गाडी आहे. छबूताईंच्या हृदयाने आनंदाने उडी घेतली. आता भाड्याच्या वाहनाने देसायांकडे जाण्याचे काही कामच नव्हते. आपल्या नव्या गाडीनेच तिथे जायचे !



सारथ्याने बहुधा छबूताईना पाहिले. गाडीची गति मंदावली व "करंर"असा ध्वनि करीत गाडी त्यांच्या शेवटीच थांबली. छबूताईंच्या कपाळाला आठ्या पडल्या. गाडी अ[illegible] प्रकारे थांबविणे त्याना अगदी मान्य नव्हते. गाडीत कोणीच नव्हते. चा[illegible] बसलेल्या शामरावला तिरसट स्वरात त्यांनी विचारले,

"काय रे शामराव ?"

"साहेवानी आपल्याला एकदम घरी बोलावले आहे." ओठावरून जीभ फिरवीत शामराव म्हणाला.

"आधी आपल्याला देसायांकडे गेले पाहिजे !" शुष्क स्वरात त्या उत्तरल्या "मग घरी जाऊ !"

"जशा असाल तशा या असा आपणाला साहेबांचा निरोप आहे." शामराव कावराबावरा होत म्हणा[illegible] फडफडत छबूताई गाडीत बसल्या. शामरावने फाडकन् दार बंद केले तेहि त्यांना आवडले नाही. त्यांच्या कपाळाला आठ्या पडल्या.

गाडीने वेग घेतला. वेग वाढत चालला. विष्णुपंतानी आपणाला एकाएकी [illegible] कां बोलावले ह्याची त्यांना कल्पनाच करता येईना. परंतु राईचा पर्वत कर[illegible] संवय छबूताईना ठाऊक होती. क्षुल्लक गोष्टीसाठीहि ते बायकोला बो[illegible]वणे धाडीत. हे सारे ठाऊक असूनहि छबूताईना घराकडे निघावे लाग[illegible] शामराव गाडीचा वेग वाढवीतच होता. तेव्हा काहीशा चिडक्या स्वरात छबू[illegible] म्हणाल्या,

"कशी गाडी चालवतो आहेस, शामराव ?"

"वेळ तशीच आहे बाईसाहेब !" शामरावाने उत्तर दिले. त्याचा स्वर घोगरा येत होता. त्या स्वराने छबूताई चमकल्या व म्हणाल्या,

"म्हणजे झाले आहे तरी काय ?"

"फार वाईट गोष्ट झाली आहे, बाईसाहेब ?" शामरावने उत्तर दिले. त्याचा स्वर कापत होता. आता मात्र छबूताई घाबरल्या.

"काय झालं आहे ते तर सांगशील?" त्यांनी विचारले, "हे ठीक आहेत ना? त्यांच्या छातीत तर नाही ना दुःखायला लागलं ?"

"नाही."

"बंडू घरी आला का ?"

"हो."

"तो ठीक आहे ना ?"

"मला काही सांगायला सुचत नाही बाईसाहेब !" शामरावचे वाक्य हुंदक्यात बुडाले. गाडी छबूताईंच्या घरासमोर थांबली. छबूताई घाईने खाली उतरल्या. आवारात पांच-पंचवीस माणसे गोळा झाल्याचे छबूताईनी पाहिले. छबूताई वेगाने घरात शिरल्या. कुणाचा तरी हंबरडा छबूताईंच्या कानावर आला. स्वप्नातल्या आक्रोशासारखा तो स्वर छबूताईंच्या कानात घुमला. स्वप्नात दिसावेत तसे अनेक चेहरे गरगरताना त्याना दिसले. आणि स्वप्नात असल्याप्रमाणे छबूताई समोरच्या कोचाकडे पहात राहिल्या. कोचावर बंडूचा ओला गच्च देह झोपला होता. त्याच्या अंगात अद्याप [illegible] गणवेश होता. तोहि ओलाचिंब झालेला होता. बंडूचे केस [illegible]ले होते. [illegible]ळे मिटलेले

होते. नाक रक्ताळलेले होते... तो झोपल्यासारखा दिसत होता. पण हे झोपेत नव्हता. काळझोपेत होता–गेलेला होता !

"...बुडला. शाळेच्या हौदात !" कुणीतरी म्हणत होते.

सुन्नपणे छबूताईंचे मन आक्रंदत होते– हौदात ? हौदात ? नदीत नव्हे, समुद्रात नव्हे– एका निरुपद्रवी हौदाने बंडूचा बळी घेतला ? त्या निपुत्रिक झाल्या. फटक्यासरशी त्यांचा एकुलता एक मुलगा गेला ? हौदात बुडून गेला ! दिवसाढवळ्या, इतकी माणसे सभोवार वावरत असता, हा इवलासा जीव हौदात गुदमरून मेला ? कुणीहि त्याच्या सहाय्याला जाऊ शकले नाही? तो काळसर्प हौद खवळलेल्या समुद्रापेक्षाहि भयानक ठरला? आणि हे आपले असहाय, हतबल, कोवळे पाडस हौदाच्या गुडघाभर पाण्यात बुडाले ? काय देवाघरचा न्याय आहे ? आपण जिवंत असताना हे घडले ? ह्या मुलाचा बाप ह्या जगात असताना हे घडले ? ती काळवेळ आली तेव्हा ह्या चिमण्या जीवाला हात द्यायला आपणांपैकी कुणीसुद्धा जवळ नसावे? हौदाने बंडूला गिळावे ? हौदाने बंडूला मारावे ? केवळ तीन-साडे-तीन वर्षांचे हे मूल. एका हौदात बुडून मेले? एवढ्यासाठीच का आपण त्याला जन्म दिला ? वाढविले ? त्याच्यावर प्रेम केले ? एका हौदात बुडून मरण्यासाठी. . . .

छबूताईंच्या डोळ्यांसमोर मात्र काळ्या रेषा उमटल्या. दाट काळोखात त्या बुडून गेल्या. त्यांच्या तोंडून शब्द फुटेना. त्या बेशुद्ध झाल्या आणि शुद्धीवर आल्या. अकल्पित दुःखाचा तोच भीषण आघात त्यांच्यावर पुन्हा पुन्हा झाला. दुःख आज प्रथमच त्याना आपल्या अतिभयंकर परिवेषात भेटायला आले होते. हे दुःख दुसरे नव्हते. परक्याचे नव्हते. त्यांच्या अगदी मर्मापर्यंत जाणारे हे दुःख होते. त्या दुःखाने छबूताईंच्या चेहऱ्यावरची टवटवी व जीभेवरचे शब्द पाहता पाहता पुसून टाकले. माणसे रडत होती. धीराचे शब्द बोलत होती व छबूताईंचे सांत्वन करण्याचा प्रयत्न करीत होती. परंतु हे दुःख सांत्वनापलिकडचे होते. जन्मभर पुरणाऱ्या त्या अपार दुःखात छबूताई बुडून चालल्या होत्या. बंडूचे आयुष्य काही क्षणात संपले, पण छबूताईंचे दुःख कधीहि संपणारे नव्हते. छबूताईंच्या सुखी आयुष्यातील शोक-पर्वाला आज प्रारंभ झाला होता. खरोखरीचे जळते दुःख आज त्याना भेटायला आले होते.

* * *

---

(पान १० वरून – वैफल्य)

त्याच्या जवळचे फुलपाखरांचे सारे रंग काय संपून गेले होते ? नि या पानात लपून

> दीपावली – दिवाळी अंकासाठी आत्मीयतेने आपले साहित्य पाठविणारे सर्वश्री वि. वा. पत्की, भास्कर उत्तरवार, डॉ. बाळ गांगल, ना. व्यं. देशपांडे, उत्तम शिरवळकर वसंत कुंभोजकर, प्रभाकर अत्रे व डॉ. सरोजिनी बाबर यांचे उत्तम साहित्य पानांच्या मर्यादेमुळे दिवाळी अंकात जाऊ शकले नाही याबद्दल अत्यंत दिलगीर आहोत.
>
> ते सर्व साहित्य दीपावलीच्या येत्या काही अंकातून अगत्याने प्रसिद्ध केले जाईल.
>
> –संपादक

बसण्याची सक्ती त्यानं आमच्यावर कां करावी ? कितीदा मनात येतं, गरुड जसा पंखांची वल्ही मारीत वरच्या निळ्या समुद्रात—'

परमेश्वर खाली मान घालून पुढे चालू लागला. गरुड भेटताच त्याने मोठ्या उल्हासयुक्त स्वराने विचारले,

'बेटा, तू तरी आहे सुखी आहेस ना ?'

विचित्र चीत्कार करीत गरुड ओरडला, 'डोंगरांच्या कडेकपारीत राहण्यात कसलं आलंय् सुख ? कुठं तरी उंच शिखरावर जायचं नि आकाशातील ही वाटोळी दिवटी पहात बसायचं ! यात कसला आलाय् प्रभू आनंद ? म्हणे गरुडाने पूर्वी स्वर्गातनं अमृत आणलं होतं. साऱ्या थापा ! या जगात स्वर्ग नाही नि अमृतही नाही ! देवानं मला असला वैराण जन्म देण्यापेक्षा चिमणं फुलपाखरूं केलं असतं तर–'

पश्चात्ताप करीत हौसेने निर्माण केलेल्या आपल्या जगाकडे पाठ फिरवून परमेश्वर चालू लागला.

* * *





अनुक्रमणिका



**वसंत पुरुषोत्तम काळे**

# सुवर्णतुला



**नारायण! नारायण!!**
**पुन्हा एकदा कृष्णराव**
**कलियुगात [illegible]ज्यात सापडले ....!**

**ना**रायण रमाकांत दनायत, हा गृहस्थ चालता चालता एकाकी थवकला. समोरच्या वसच्या रांगेकडे लक्ष गेलं म्हणूनच तो थांवला. रांगेकडे म्हणण्यापेक्षा रांगेतल्या एका वाईकडे पाहून! – खात्री करून घेण्यासाठी त्याने परत पाहिलं आणि तो पुटपुटला, "हे काय ? सत्यभामावहिनी ? आणि बसच्या रांगेत ?– नारायण... नारायण..."

—सत्यभामेकडे जाण्यासाठी दनायत रस्ता क्रॉस करायला लागला, पण एकीकडे तो स्वत:शीच वोलत होता, "सत्यभामा बसने कां जाते ? परवाच तर कृष्णरावांनी कॅडिलॅक घेतली. रुक्मिणीला जाताना आपण प्रत्यक्ष पाहिलं. आता जर हे सत्यभामेला माहितच नसेल, तर ती रागावणार. अगोदरच ती आपल्याला 'नारद' म्हणून हाक मारते. कारण काय ?—तर आपल्या नावाच्या आद्याक्षरांपासून नारद नाव तयार होतं म्हणून !– आता एक वरोवर आहे. आपण कळलावेपणा करीत नाही असं नाही, पण त्यापायी कुणाला दु:ख होणार नाही ना, कुणाचा तोटा – नुकसान होणार नाही ना, हेहि आपणच पहातो. आता आपण समोर जाऊन उभे राह्यलो की सत्यभामावहिनी म्हणणार मोठ्यांदा, या नारदवुवा."

—दनायतचा अंदाज खरा ठरला. सत्यभामेनं त्याला पहाताच ती मोठ्यांदा म्हणाली,

"—या नारदमुनी."

सत्यभा[illegible]समोर [illegible] दनायत म्हणाला,

"नारा[illegible]ऽऽ नारायण. – आज तुम्ही उन्हातान्हात बससाठी कशा काय ?"

"[illegible] पहिल्यांदा का जात्येय? नेहमीच जाते बसने.

"नारायण—नारायण, असंच का शेवटी?"

"कां, काय झालं ?"

"नाही, नाही, तसं काही नाही." दनायत त्याच्या नेहमीच्या मानभावीपणाने म्हणाला. पण सत्यभामेला तेवढं पुरेसं होतं शंका यायला. ती म्हणाली,

"काय झालं ?"

"छे छे, व्हायचंय काय ?—तो कृष्णा तुम्हाला बसने जायला सांगतो आणि तुम्हीहि आनंदानं उन्हात, बससाठी उभ्या रहात आहात, मग मी कशाला काही वोलू ? – मी आपला जातोच कसा. उगीच कळलावेपणाचा आरोप नको."

"थांबा. मी तुम्हाला अशी जाऊ देणार नाही. गेलात तर शपथ आहे."

"नारायण, नारायण, सत्यभामे, अशी शपथ घालून तू मला नको ते बोलायला लावणार आहेस. असं होतं. तुम्हा बायकांना भांडणाची आवड असते. पण भांडण्यासाठी तुम्हाला नेहमी कारण सापडलंच असं नाही. मग तुम्ही वायका माझ्यासारख्या शांतताप्रिय माणसाला शपथा घालून आडवता आणि एकमेकींशी भांडण्यासाठी कारणं मिळवता."

"आता विषय बदलू नका, काय ते सांगा.'

[illegible]भामे आता कसं सांगू?– आपले कृष्णराव किती चतुर म्हणून सांगू ?– त[illegible] तुझ्यावरच जीवापाड [illegible] आहे ना ?

[illegible] फुशारू[illegible] म्हणाली, [illegible]तच."

"तो नेहमी" जवळ बस, जवळ बस, म्हणतो ना ?"

"इश्य. . . ."

"म[illegible] तर. जिला नेहमी" जवळ बस, जवळ बस, तिच्या नशीवी ही अशी 'बसच.'

"मी नाही समजले, भावजी."

"भोळी ग तू भोळी."

जवळ वसवुनी [illegible]

तिलाच [illegible] ण, तिला दुसरी [illegible] परांची [illegible]

तिलाच चोरून दे गिरिधारी कॅडिलॅक गाडी."

"सांगता काय [illegible]ी ? तुमचं काव्य नको. नीट सांगा."

[illegible]नारायण."

"खरं सांगा ?"

"आणखीन् काय सांगू ?"

"फसवलं हो. मला."

"हां हां, सत्यभामे, अशी झोपडीत राख घालू नकोस."

"झोपडीत ?"

"–तर काय ?– ते डोक्यावर केसांचं झोपडीसारखंच काहीतरी केलंस ना ?"

"ती हेअर-स्टाइल आहे."

"नारायण, नारायण."

"थांबा. पुन: विषय बदलू नका. ह्यांनी [illegible]घेतली ?– कधी ? आणि मला कसं नाही कळलं ?"

"तू भोळी म्हणून. तुला एखादी गोष्ट आणून दिली की तू हुरळून जातेस, आणि त्या कपटनाटक करणाऱ्या आमच्या कृष्णरावांचं फावतं. मी आता बोलणार नाही असं ठरवलंय म्हणून, नाहीतर तुला सांगणार होतो की प्रत्येक बाबतीत तू फसतेस म्हणून."

"कशी काय ?"

"आता तू सांगायला भाग पाडतेस म्हणून. पण परवा[illegible] [illegible] घे. तू हट्ट केलास म्हणून कृष्णरावांनी रेडिओग्रॅम आणला."

"हो मग. त्यांचं आहेच माझ्यावर प्रेम."

"अशीच तू फसतेस."

'ह्यात काय माझी फसवणूक झाली?"

"अग तो रेडिओग्रॅम नावाचा तुझा आहे. गाणी तर सगळी रुक्मिणीच्या ब्लॉकमध्ये ऐकू येतात."

"खरंच का ?– फसले हो फसले मग."

"नारायण – नारायण."

"काय करू मी आता, भावोजी ?"

"रेडिओग्रॅमचं एक सोडून दे. त्यात कृष्णरावांची फारशी चूक नाही. आवाज [illegible] पसरतोच. त्यावर त्यांना ताबा ठेवता येणार नाही. पण फोनच्या बाबतीत मात्र तुझी पंचाईत झाली असेल."

"छे छे, फोनहि त्यांनी माझ्याचसाठी घेतला."

"अग पण, त्याचं मुख्य कनेक्शन रुक्मिणीच्या ब्लॉकमध्ये, आणि सगळे फोन तिलाच तर येतात. तुझ्या ब्लॉकमध्ये नुसतं खोकं."

–तेवढ्यात समोरून कॅडिलॅक गाडी गेली. आत रुक्मिणी बसलेली सत्यभामेनं अणि दनायतनं त्याच वेळी पाहिलं. त्याबरोबर गडबडीनं दनायत म्हणाला,

"बरंय् सत्यभामे, निघतो आता. माझी आता ऑफिसची वेळ झाली. मी जातो. हो पण सत्यभामे, जाण्यापूर्वी एक सांगतो,

आवर आपुला राग भामिनी, विसर उपेक्षा क्षणी,
आठव श्रीहरी, प्रेम तयाचे - हेच उचित ह्या क्षणी.
वैभव पैसा, दोन क्षणांचा – मोह सोडूनी द्यावा
एक श्रीहरी भजा तयाला, तोच चिरंतन ठेवा.

–दनायत एवढी कळ लावून गेला, मग सत्यभामेचं मार्केटिंगमधे लक्ष कसं लागावं? –ती तशीच आपल्या ब्लॉकवर परतली. कृष्णारावांची स्वारी घरी परतली म्हणजे कसं रागवायचं, कसं रुसायचं हे तिनं ठरवून ठेवलं होतं. पण त्या ठरवून ठेवलेल्या सगळ्या गोष्टी फुकट गेल्या होत्या. कारण कालपासून स्वारी घरी फिरकलीच नव्हती; त्यामुळे सत्यभामेच्या रागाला आणि व्यथेला आणखीनच धार चढली होती. एकतर आपल्याकडे ते आले नाहीत ह्याचं दु:ख, आणि त्याहिपेक्षा मोठं शल्य कोणतं असेल तर ते रुक्मिणीकडे गेले असतील ह्याचं. रुक्मिणीकडे ते असतील ह्या विचारापायीच सत्यभामेला रात्रभर झोप नव्हती. अं[illegible] ती रागानं फुलली होती. पण आ[illegible]न् एक नाईलाज म्हणजे कृष्णरावांची स्वारी घरी आल्याखेरीज हा राग दाखवायचा तरी कुणाला ?– इच्छा असो वा नसो, ते घरी परत येईतो, हा राग असाच संभाळायला हवा.

* * *

घंटी वाजवण्याच्या पद्धतीवरूनच रुक्मिणीनं दनायत आला आहे हे ओळखलं. ती नोकराला थट्टेनं म्हणाली,

"जा, दार उघड. 'नारद' भावोजी आले आहेत."

–"या, तुमचं स्वागत असो."

दिवाणवर बसेतो दनायतनी सगळ्या ब्लॉकवर नजर टाकली.

"रंग नवीन दिसतोय."

"होय."

"कोणता आहे ?–ऑईलपेण्ट ?"

"नाही, प्लॅस्टिक इमल्शन."

"वा वा छान. बाकी छान काय ?- कृष्णरावांसारख्या रसिकाची ही निवड, त्यात बोट ठेवायला जागा नसणार. ठीक, ठीक. बरं, देवीजी, सगळं काही कुशल आहे ना ?"

"हो."

"हो म्हणतेस पण चेहरा मात्र उतरलाय तुझा."

"तो ह्यांच्या काळजीनं."

"कां बरं ?"

"काल रात्रभर 'ते' ह्या घरी आले नाहीत."

"एवढंच ना ?– अग ह्या घरी नसतील तर त्या घरी असतील."

"हरकत नाही तिकडे [illegible]ले तरी. पण तिकडेहि ते नसणार, कारण [illegible]यानी



अनुक्रमणिका

आल्याबरोबर मला फोन केला असता."

"हां हा, देवी, फोन केला नाही ह्याचा अर्थ ते तिकडे आलेच नसतील असं मात्र नाही. कारण फोन जरी असला तरी तो असणार सत्यभामेच्या बेडरूममध्ये."

"कृष्णराव कुठेहि असोत, सुखरूप असोत म्हणजे झालं. बरं पण ते राहू दे, आपण काय घेणार ?– गार की गरम ?"

"मला फक्त गार पाणी दे. एकदम गार. फ्रीज असेलच तुझ्या घरी."

"फ्रीज नाही, पण माठ आहे."

'काय हे ? फ्रीज नाही ?–अजब आहे. मला वाटलं कृष्णरावांनी त्यादिवशी एकदम् दोन फ्रीज घेतले असतील."

मधे भिंत नावाला. माझा तर्क खरा ठरला." घेऊन काय करायचं ?– सत्यभामेचं घर आणि हे घर एकच. तुम्हाला आत्ता मी तिकडून गार पाणी मागवून देते."

"नको वहिनी, तू वृथा कष्ट घेऊ नकोस. मला पाण्याची गरज नव्हतीच. तुम्हा दोघीत आमचा हा 'नंदकिशोर' भेदभाव करतो का, एवढंच मला पहायचं होतं. माझा हेतू सफल झाला आहे. तो नक्कीच प्रतारणेनं वागतो आणि म्हणूनच दोघींचे संसार तो व्यवस्थित चालवतो आहे. एकाच इमारतीत, चोविसाव्या मजल्यावर त्या कृष्णरावांनी दोन ब्लॉक्स शेजारी शेजारी घेतले, तेहि असे की एकीच्या ब्लॉकचा जिना पूर्वेकडे तर एकीचा पश्चिमेकडे

"भावजी, एकाच घरात दोन [illegible]" –दनायतचं हे बोलणं चाललेलं असताना रुक्मिणी [illegible] होती.

"भावजी," तुमचा कळ [illegible] फसला आहे. मला कशाचाहि खेद वाटायचा नाही, की मनात विकल्प यायचा नाही."

"नारायण, नारायण, नाव कानफाटचा पडलं की असं होतं. असो. देवी, मी आता सत्यभामेकडे जातो आहे."

"आपण व्हा पुढे. श्रीहरी तिकडे आले होते का, हे पहायला मीपण तिकडेच येते

(समोर [illegible] दनायत [illegible])

# हौज S S दॅट? 'आउट' कोण?

## ते वाचकांनीच ठरवायचे आहे व तीन बक्षिसे मिळवायची आहेत

यंदाच्या दिवाळी अंकातील ज्या साहित्यिकाचे साहित्य सर्वोत्तम वाटेल त्यांना नाबाद ठरवा!

**कूपन**

१ सर्वोत्तम कथा ________

२ सर्वोत्तम लेख ________
(विनोदी, ललित इत्यादि) ________

३ सर्वोत्कृष्ट कविता ________

४ सर्वोत्कृष्ट रंगीत कलाकृती ________

५ सर्वोत्कृष्ट व्यंगचित्र ________

नाव ________

संपूर्ण पत्ता ________

योजनेच्या सर्व अटी मला मान्य आहेत.

स्वाक्षरी ________

● दीपावलीच्या वाचक-ग्राहकांची आवड-निवड अजमावून त्या प्रकाशात पुढील वाटचाल करण्याचा प्रयत्न करण्याचा हेतु ह्या 'निवडणुकी'मागे आहे. ● 'दीपावली' साहित्याची चोखंदळ निवड करतेच करते, पण वाचकांची व संपादकांची निवड कितपत जुळते हे ह्यातून तपासता येईल. ● हा 'आरसा' लेखकाना आपल्या 'सौंदर्य-प्रसाधना'त उपयुक्त ठरेल हाही एक फायदा ! !

वाचक ह्या योजनेला योग्य सहकार्य देतील अशी आशा आहे.

१ सोबत विनामूल्य कूपन दिले आहे. ते १० डिसेंबर १९६७–पर्यंत भरून पाठविणारांचीच 'मते' मोजली जातील.

२ आपल्याला आवडलेल्या साहित्याची नोंद (लेखकांच्या नावासह) करावयाची आहे.

३ पाचही कलाप्रकारात ती आवड नोंदविणे बंधनकारक आहे.

४ बहुसंख्येने अंतिम निवडीची अचूक नोंद असलेल्या कूपनांच्या प्रेषकास १०० रु. चे पहिले पारितोषिक देण्यात येईल. त्यानंतर ७५ व ५० अशी दोन पारितोषिके राहतील. एक चुकीस दुसऱ्या क्रमांकाचे व दोन चुकीस तिसऱ्या क्रमांकाचे पारितोषिक देण्यात येईल. अचूक नोंदणीची कूपने एकाहून अधिक आल्यास रक्कम विभागली जाईल. ह्यात प्रेषकानी नोंदविलेला गुणक्रम महत्वाचा मानला जाईल.

५ कोठल्याही कारणाने एखादे कूपन रद्द ठरविण्याचा अधिकार संपादक मंडळाला राहील. रद्द कूपनांबद्दल कोणताही पत्रव्यवहार केला जाणार नाही.

६ या बाबतीतला अंतिम अधिकार–संपादक मंडळाचा !

७ स्पर्धेचा निर्णय 'दीपावली'च्या जानेवारी १९६८ च्या अंकास प्रसिद्ध केला जाईल.

**आपली कूपन्स दि. १० डिसेंबर १९६७ चे आत 'दीपावली' कार्यालय, ४०–४२ केनडी ब्रिज, मुंबई ४ ह्या पत्त्यावर पाठवावीत**


